# 'अभिनव चीन'



लेखक—विनायक महादेव भुस्कुटे

( आवृत्ति पहिली )

१९४८ ] [ किं. ४ रुपये

#  अनुक्रमणिका

# प्रस्तावना

अभिनव चीनचा जनक डॉ. सन्यत्सेन याचे चरित्र हें माझें पुस्तक दीड वर्षापूर्वी प्रकाशित झालें. त्या वेळीं स्वाभाविकच ' अभिनव चीन ' हें पुस्तक लिहावें, असा संकल्प मी केला. संकल्पाप्रमाणें पुस्तक लिहून तर झालें पण आजकालच्या सर्व प्रकारच्या महागाईच्या काळात पुस्तकाच्या प्रकाशनाचें काम किती तरी महिने मागे पडले. पण शेवटीं स्वतःच ते प्रकाशित करण्याचे मी ठरविलें व त्याप्रमाणें थोड्याच दिवसात ते महाराष्ट्रीय वाचकाना सादर करता आले, याबद्दल मला आनंद होत आहे.

अभिनव चीनच्या इतिहासाला डॉ. सन्यत्सेनच्या लोकशाही क्रांतीनंतरच वास्तविक सुरुवात होते. पण या इतिहासाची भूमिका लक्षात येण्याकरता जुन्या चीनचा, चीनवरील परक्या व पाश्चात्य आक्रमणाचा व अभिनव चीनच्या निर्मितीला प्रत्यक्ष कारणीभूत झालेल्या चीनी लोकशाही क्रांतीचा इतिहास मी थोडक्यात दिला आहे. आशियातील इतर देशाप्रमाणें चीन देश पाश्चात्याच्या संपूर्ण आहारीं जावयाचा व परतंत्र व्हावयाचा पण ही गुलामगिरीची आपत्ति त्याच्यावर का कोसळली नाहीं व परकीय पाश्चात्य राष्ट्राच्या परस्परस्पर्धेचा फायदा चीनला कसा मिळाला, याची कल्पना वरील इतिहासावरून येण्यासारखी आहे. १९११ सालीं डॉ. सन्यत्सेननें चीनमध्यें लोकशाही क्रांति घडवून आणली. राष्ट्रीयत्व, लोकशाही व लोकोपजीवन या तीन तत्वावर ही क्रांति स्थिर राखून तिचे कार्य पूर्ण करण्याचा कार्यक्रमही त्याने आखून दिला. डॉ. सन्यत्सेनला आपल्या हयातींत हे कार्य पूर्ण करता आलें नाहीं. १९२५ नंतर म्हणजे त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षांत चीनमधील यादवी युद्धाला जी सुरुवात झाली तें युद्ध अद्यापही मिटलेलें नाहीं. या दीर्घकालीन यादवीचा इतिहास म्हणजेच मुख्यतः अभिनव चीनचा इतिहास होय. " युद्धस्य कथा रम्या " ही म्हण रूढ झाली त्यावेळीं युद्धाचें स्वरूप निराळें होते. कुरुक्षेत्राच्या पलीकडच्या रानात शेतकऱ्याचीं आउतें बिनबोभाट चालत असत. युद्धाची प्रत्यक्ष काल-मर्यादाही अगदीं अल्प होती. पण अलीकडच्या युद्धकथा रम्य राहिलेल्या नाहींत आणि चीनमधील दोन दोन पिढया चाललेल्या आपसातील युद्धाच्या

कथा तर मुळींच रम्य नाहींत. तथापि चीनमध्यें अपरिहार्यपणें सुरू झालेल्या या युद्धात एकजूटीकरता प्रयत्न करणाऱ्या व युद्ध टाळूं पाहणाऱ्या पक्षाला आपल्या ध्येयसिद्धीकरता किती पराकोटीचा स्वार्थत्याग करावा लागला, किती अपरिमित प्राणहानी सोसावी लागली, किती असह्य कुकटांना तोंड द्यावें लागले व जगानें आश्चर्यानें थक्क व्हावें अशीं पराक्रमाचीं कृत्येंही त्यानें कशी केलीं, हा इतिहास अगदीं रम्य नसला तरी अंतःकरणाच्या वृत्ति उचंबळून सोडणारा, उद्बोधक व मार्गदर्शक आहे. या इतिहासातील पल्लेदार दौड व चिआङ काई शेकची अटक व सुटका वगैरे प्रकरणें एडगर स्नोच्या "Red Star over China" या पुस्तकाच्या आधारानेंच मुख्यतः लिहि- लेलीं आहेत. एडगर स्नोनें इंग्रजी वाचकाकरता हें सत्यप्रकाशनाचें धाडसाचे काम हालअपेष्टाची पर्वा न करता केलें. महाराष्ट्रीय वाचकानाही या सत्य- कथेची ओळख व्हावी म्हणून हीं प्रकरणे मी थोडीशी विस्तृतपणें दिलीं आहेत. याशिवाय या पुस्तकाकरता ज्या ग्रंथाचा मी आधार घेतला त्याची यादी शेवटीं दिली असून त्या सर्व ग्रंथकाराचा मी अर्थात् आभारी आहे.

चीन आपल्या शेजारचे राष्ट्र आहे. अत्यंत उच्च संस्कृतीचे राष्ट्र म्हणून प्राचीनकालीही त्याची प्रसिद्धी होती. अर्वाचीन कालीं एका निराळ्या दृष्टीनें का होईना चीनने आपला हा पुढारीपणा कायम ठेवला आहे, ही गोष्ट अभिनव चीनच्या निर्मितीकरता त्या राष्ट्रात घडत असलेल्या इतिहासावरून दिसून येण्यासारखी आहे. शेजाऱ्याकडे पाहिलें म्हणजे त्याच्याबरोबर स्वतःची तुलना करण्याची बुद्धि सहजच होते. पण हें काम वाचकावरच सोपविणें चांगलें.

माझ्या कुवतीप्रमाणें या विषयावर जेवढीं पुस्तकें व सामुग्री मला जमा- वता आली व पुणे नगर वाचन मंदिर, भारत सेवक समाजाचें ग्रंथसंग्र- हालय व केसरी मराठा ग्रंथसंग्रह या संस्थातून मला जीं पुस्तकें वाचा- वयास मिळालीं त्याच्या आधारानें हें पुस्तक मी लिहिलें आहे. या मदती- बद्दल वरील संस्थाचा विशेषतः केसरी मराठा ग्रंथ संग्रहाच्या चाल- काचा मी अर्थात् आभारी आहे.

२५०/२ सदाशिव पुणें नं. २
२८।७।१९४८

वि. म. भुस्कुटे

# अभिनव चीन

## ऐतिहासिक परिचय

**विषय प्रवेश**—डॉ. सन्यत्सेननें १९११ सालीं चीनमध्यें क्रांति घडवून आणली. परकीय मॅन्च्यू घराण्याची चीनवरील सत्ता नष्ट करणें व चीन सर्वतोपरी स्वतंत्र करणें हा या क्रांतीच्या मुळाशीं एक मुख्य हेतू होता पण त्याबरोबरच चीनमध्यें पूर्ण लोकशाही प्रस्थापित करणें आणि चिनी जनतेच्या जीवनातही क्रांति घडवून आणणें, हे हेतूही या क्रांतीच्या मागे होते. १९११ सालीं क्रांतीचा शेवटचा उठाव यशस्वी झाला. यानंतर १४ वर्षांनीं, १९२५ मध्यें, डॉ. सन्यत्सेन निधन पावला. क्रांतीनंतर मिळालेल्या चौदा वर्षांच्या कालात राष्ट्रीयत्व, लोकशाही व लोकोपजीवन या तीन लोकतत्वांपैकीं संपूर्ण राष्ट्रस्वातंत्र्य व लोकशाही या पहिल्या दोन तत्वांची अमलबजावणीदेखील त्याला संपूर्णपणें करता आली नाहीं. मॅन्च्यू घराण्याच्या सत्तेचा संपूर्ण नाश त्यानें आपल्या कारकीर्दींत केला होता. त्यानंतर ठिकठिकाणीं निर्माण झालेल्या सुभेदारशाह्यांचेंही निर्मूलन करण्याचे प्रयत्न त्यानें केले होते आणि हें सर्व करीत असताना क्रमाक्रमानें चीनमध्यें लोकशाही कशी प्रस्थापित करावी व जनतेचें जीवन सुखी करण्याच्या दृष्टीनें या लोकशाहींत सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक योजना कशा अंमलात आणाव्या याचा स्पष्ट कार्यक्रम डॉ. सन्यत्सेननें आंखून ठेवला होता. विशेष महत्वाची गोष्ट ही कीं, डॉ. सन्यत्सेनचा हा कार्यक्रम

त्याच्या पुढच्या अनुयायांनीं पूर्णपणें मान्य केला व तो अमलात आणण्याचा कसोशीनें प्रयत्नही केला. डॉ. सन्यत्सेनच्या मरणापूर्वी चार वर्षे, १९२१ सालीं, चीनमध्यें प्रस्थापित झालेल्या चिनी कम्यूनिस्ट पक्षानें तर डॉ. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वाना वेदवाक्याप्रमाणें मानले, या तीन लोकतत्वातील रहस्य समजून घेतले व ते शब्दशः अमलात आणले. डॉ. सन्यत्सेनच्या अनुयायाच्या एकनिष्ठेमुळेंच अभिनव चीन निर्माण झाला. डॉ. सन्यत्सेनला अभिनव चीनचा जनक असें संबोधण्यात येतें तें याच अर्थानें होय.

अभिनव चीनची निर्मिति कोणत्या तत्वांवर झाली पाहिजे हे डॉ. सन्यत्सेननें आपल्या मृत्युपत्रात* स्पष्टपणें दाखवून दिले होते.

---

* **डॉ. सन्यत्सेनचें मृत्युपत्र**—राष्ट्रीय क्रांतीच्या कार्याला गेलीं चाळीस वर्षे मी स्वतःला वाहून घेतलें. जगातील राष्ट्रांमध्ये चीनला स्वातंत्र्याचा व समानतेचा दर्जा प्राप्त करून द्यावा, असा त्यांत हेतु होता. चाळीस वर्षांच्या अनुभवानें मला ही गोष्ट पटवून दिली आहे कीं, हें ध्येय साध्य करावयाचें असल्यास जनतेला जागे केलें पाहिजे आणि जे लोक आम्हाला बरोबरीच्या नात्यानें वागवितात त्या सर्व लोकानीं चालविलेल्या सामान्य लढ्यात आम्ही त्याच्याबरोबर सामील झाले पाहिजे.

क्रांति अद्याप संपलेली नाहीं. आमच्या पक्षाच्या पहिल्या राष्ट्रीय संमेलनानें प्रसिद्ध केलेला ' जाहीरनामा ' आणि ' तीन लोकतत्वें ' व ' राष्ट्रीय पुनर्रचनेच्या योजना ' या माझ्या लेखातून ग्रथित केलेल्या नियमाच्या व तत्वाच्या अनुरोधानें आमच्या सर्व दोस्तानीं कार्य करावें आणि ते पार पाडण्याकरता सर्व प्रकारचे प्रयत्न करून झटत राहावें. मुख्यतः चिनी लोकाचें राष्ट्रीय संमेलन भरवावें व असमानतेचे तह रद्द करण्यात यावे, असें मी अलीकडे जाहीर रीतीनें प्रतिपादन केलें आहे, त्याची अमलबजावणी शक्य तितक्या लवकर करण्यात यावी.

ही माझी अखेरची इच्छा, मृत्युपत्र आहे.

मार्च ११, १९२५. " सन यीन "

त्याचप्रमाणें या तत्वाची अमलबजावणी करण्याच्या कामांत मनापासून मदत करणारा सोव्हिएट रशियासारखा एक अत्यंत प्रामाणिक व जगातील शेतकरी कामकरी जनतेचा कनवाळू सखाही चीनी क्रांतिकारकाना त्यानें मिळवून दिला होता. १९१७ च्या रशियन क्रांतीनंतर लेनिनशीं पत्रव्यवहार करून सोव्हिएट रशियाशीं आपले स्नेहाचे संबंध त्यानें दृढतर केले होते. मरणाच्या दाराशीं असताना त्यानें सोव्हिएट यूनियनच्या मध्यवर्ती कमिटीला पत्र पाठवून क्रांतिकारक चीनला त्याच्या पदरात टाकलें व स्टॅलिननेंही डॉ. सन्यन्सेनची ही मदतीची हाक ऐकून ती पूर्ण करण्याचें आश्वासन दिलें

## सो. यू. च्या मध्यवर्ती कमीटीला पाठविलेलें पत्र

" जिच्यापुढें मनुष्याचें कांहीं चालत नाहीं अशा एका व्याधीनें मी ग्रस्त होऊन येथें पडून आहे, पण माझें मन तुमच्याकडे वेधलें आहे. माझ्या पक्षाच्या व माझ्या देशाच्या भवितव्याच्या कल्पनेनें तें ग्रासलें आहे.

" स्वतंत्र लोकराज्याच्या संघाच्या प्रमुख स्थानीं तुम्हीं आहा. हा संघ म्हणजे अमर लेनिननें जगातील दलित राष्ट्रांना उपयोगी पडावा म्हणून ठेवून दिलेला वारसा आहे. गुलामी, युद्धें व अन्याय हाच जिचा पाया आहे त्या आंतरराष्ट्रीय राजवटीपासून साम्राज्यशाहीला बळी पडलेल्या लोकांना या वारसाच्या साहाय्यानें अपरिहार्यपणें मुक्त होता येईल.

" माझ्यामागें मी एक पक्ष ठेवून जात आहे. हा पक्ष मला नेहमींच वाटणाऱ्या आशेनुसार चीन व इतर पिळल्या गेलेल्या राष्ट्रांना साम्राज्यशाहीच्या जोखडापासून कायमचें मुक्त करून त्यांना स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या कामीं तुमच्याशीं संबद्ध राहील. भवितव्यतेच्या इच्छेमुळें माझें कार्य मला अपुरें सोडावें लागत आहे व पक्षाच्या शिकवणुकीशीं व तत्त्वाशीं निष्ठावंत राहणाऱ्या खऱ्या अनुयायांच्या हातीं तें मला सोंपवावें लागत आहे.

" म्हणून साम्राज्यवाद्यांनीं अर्धवसाहतीच्या निकृष्ट दर्जाला पोंचविलेला चीन स्वतंत्र होईपर्यंत क्रांतिकारक राष्ट्रीय चळवळीचें कार्य पुढें चालू ठेवण्याची जबाबदारी मी कुओमिन्तांगवर सोंपवीत आहे.

" हा उद्देश लक्षात ठेवूनच माझ्या पक्षाने तुमच्याशीं नेहमीचे संबध ठेवावे, अशा सूचना मी त्याला दिल्या आहेत माझ्या देशाला तुम्ही आतापर्यंत दिलेला पाठिंबा असाच पुढें चालू ठेवाल, असा पक्का विश्वास मला वाटत आहे.

" तुमचा निरोप घेताना प्रिय दोस्तानों अशी आशा मी व्यक्त करतो कीं, सोव्हिएट रशिया ( यू. एस्. एस्. आर् ) प्रबल व स्वतत्र चीनचा दोस्त व सखा बनेल व दलित राष्ट्राच्या स्वातत्र्याच्या प्रचड लढयात विजय सपादन करीपर्यंत खाद्यास खादा लावून हीं दोन्ही दोस्त राष्ट्रें झगडत राहतील, असा दिवस लवकरच उगवेल."

डॉ. सन्यत्सेनच्या मरणानतर त्याच्या अनुयायात मतभेद निर्माण झाले. डॉ सन्यत्सेननें स्थापलेल्या कुओमिन्ताङ पक्षानें आपल्या हातातील सत्ता कायम राखण्याकरिता ' राष्ट्रीयत्व, लोकशाही व लोकोपजीवन ' या तीन लोकतत्वाची कसोशीनें व ततोतत अमलबजावणी करू पाहणाऱ्या कम्युनिस्ट पक्षाला नामशेष करण्याचा प्रयत्न केला तरी चिनी राष्ट्रीयत्वाला व स्वातंत्र्याला धक्का न लागेल अशी खबरदारी दोन्ही पक्षानीं घेतली. आपल्यातील यादवीला राष्ट्राची हानी होईल असे अनिष्ट स्वरूप प्राप्त होऊ दिलें नाहीं. जपाननें चीनवर आक्रमण केल्यानतर दोन्ही पक्षानीं एकजुटीची आघाडी निर्माण केली व जपानच्या आक्रमणाला आळा घातला आणि सर्वात महत्वाची गोष्ट ही कीं, जपानसारख्या बलाढ्य व सर्व अर्वाचीन युद्धसाधनानीं युक्त असलेल्या राष्ट्राशीं लढत असताच अभिनव चीनची निर्मिती केली. आपसातील रक्तपाताचे लढे, एकजुटीची अघाडी, जपानी आक्रमणाचा जोराचा प्रतिकार व अभिनव चीनची निर्मिति या परस्पर विरुद्ध घटना डॉ. सन्यत्सेनच्या मरणानतरही १९४५ पर्यंत म्हणजे जपानचा पूर्ण पराभव होईपर्यन्त एकसमयावच्छेदें करून चालू होत्या. अभिनव चीनच्या निर्मितीचा इतिहास या दृष्टीनेंच अत्यत मनोरजक, बोधप्रद व मार्गदर्शक झाला आहे.

**प्राचीन संस्कृति**—पण या इतिहासाची स्पष्ट कल्पना येण्यास ज्या पुरातन चीनच्या पायावर अभिनव चीनची निर्मिती करण्यात आली त्याची

सर्वांगीण माहिती असणें जरूरीचें आहे. अभिनव चीनच्या निर्मितीपूर्वी दोनशें वर्षे म्हणजे अठराव्या शतकात चीन मुख्यतः शेतकऱ्याचा व जमीनदाराचा देश होता. देशात उत्पन्न होणाऱ्या मालाची देवघेव करणारा व्यापारी वर्ग, लहान लहान धदे करणारे कारागीर याचे गट देशात निर्माण झाले होते. जमीनीशीं निगडित असलेली भूदासपद्धति नष्ट झाली होती. जमीनीबरोबरच विकला जाणारा गुलामाचा वर्ग नामशेष झाला होता. खिस्तशकापूर्वीच्या तिसऱ्या शतकात चीमनध्यें जें बादशाही घराणें प्रस्थापित झाले त्या घराण्याच्या राजवटींतच शेतकऱ्याच्या या गुलामी पद्धतीचा नायनाट झाला होता. या कालानंतर चीनवर सत्ता गाजविलेल्या अनेक बादशाही घराण्यानीं पुरातन कालची निखळ सरजाम शाहीपद्धति नामशेष करण्याचा जोराचा प्रयत्न केला. खिस्तपूर्व २००० वर्षापासून इ. स. २५० वर्षापर्यंतच्या या कालात चीनवर पाच बादशाही घराण्यानीं सत्ता गाजविली व त्यानतरच्या अठराव्या शतकापर्यंतच्या कालात अकरा बादशाही घराण्यानीं एकामागून एक चीनची राज्यसत्ता काबीज केली. प्रत्येक ब दशाही घराण्यातील पहिले एक दोन बादशहा कर्तबगार निघावे, मोडकळीस आलेल्या राज्य कारभाराची त्यानी सुव्यवस्था लावावी व त्याच्या वशातल्या पुढल्या चैनी व विलासी बादशहानीं आपले कर्तव्य विसरून जाऊन देशाच्या राज्यकारभारात गोंधळ व अव्यवस्था माजवावी, पुन्हा एकाद्या दुसऱ्याच घराण्यातील कर्तत्ववान् पुरुषानें पुढें येऊन सत्ता काबीज करावी व राज्यकारभाराला सुव्यस्थित स्वरूप द्यावें, असा इतिहासक्रमाला अनुसरून असलेला प्रकार चीनमध्यें अठराव्या शतकापर्यंत चालू होता. प्रत्येक सत्तापालट झाल्यानतर आलेला बादशहा चीनच्या एकीकरणाचा प्रयत्न करीत असे. मध्यवर्ती सत्ता दुर्बल झाल्याबरोबर प्राताप्रातावर नेमलेले सुभेदार स्वतंत्र होत व आपला सवता सुभा स्थापून मध्यवर्ती सत्तेला धाब्यावर बसवीत. पण नवा आलेला बादशहा असल्या सुभेदाराचें वर्चस्व प्रथम नष्ट करून टाकीत असे व सर्व देशाच्या राज्यकारभारात एकसूत्रीपणा निर्माण करीत असे. राजघराण्यातील लोकाना किंवा सरदाराना बाक्षिसादाखल मुलूख तोडून द्यावा व संस्थानें निर्माण करावीं, या हीन सरजामशाहीपद्धतीला चिनी बादशहांनीं कधींही

उत्तेजन दिलें नाहीं. चिनी बादशाही कारभारातील हा विशेष होता. बादशहानीं मोठमोठे सरजामदार व संस्थानिक निर्माण करावे, या संस्थानिकांनीं पुन्हा लहान संस्थानिक, इनामदार, वतनदार निर्माण करावे व या सर्वांनी मिळून शेतकरी समाजाची मन मानेल तशी पिळणूक करावी, या प्रथेला चिनी बादशाहाच्या वरील एकसूत्री कारभाराच्या धोरणामुळें मुळींच वाव मिळाला नाहीं. बादशहानें ठरविलेला जमीनीवरील कर देऊन चिनी शेतकरी मोकळा होई व पंच निवडून आपापल्या गावाचा कारभार स्वतंत्रपणें चालवी. बादशाहातर्फे नेमलेले ठिकठिकाणचे अधिकारी—मदारिन्—कर वसूल करताना शेतकऱ्याचा छळ करीत व सरकारने त्याच्याकरिता नेमून दिलेल्या कराच्या वाट्याचे प्रमाण स्वतःच ठरवीत. त्यावेळी मात्र ते या अधिकाऱ्याविरुद्ध बंड करून उठत असत. ' राजा कालस्य कारणम् ' या सिद्धांताला चीनमधील एकतंत्री राज्यकारभार अर्थातच अपवाद नव्हता " लोकाना भरपूर कपडा मिळत नाहीं, ते थंडीनें कुडकुडत राहतात. अन्न न मिळाल्यामुळें त्यांची उपासमार होते, असे असेल तर तो आपला दोष आहे. ' असे मानणारे थोर बादशहा चीनमध्येही होऊन गेले.

" न किलानुययुस्तस्य राजानो रक्षितु र्यशः ।
व्यावृत्ता यत्परस्वेभ्यः श्रुतौ तस्करता स्थिता "

" प्रजेचें रक्षण करण्याच्या बाबतींत इतर राजे त्याच्याइतकी कीर्ति मिळवू शकले नाहींत कारण त्याच्या कारकीर्दींत परधनापहरणापासून चौर्य निवृत्त होऊन त्याचें अस्तित्व केवळ कानानी ऐकण्यापुरतें नाममात्रच राहिलें होतें. "

असें कालिदासानें दिलीप राजाच्या राजवटीचें वर्णन केलें आहे. चीनमध्येंहि असे अनेक उदारधी थोर मनाचे, प्रजेला पुत्रवत् मानणारे, तिच्या सर्व सुखसोयींकडे लक्ष देणारे बादशहा होऊन गेले. पण अशी पर परा नेहमींच चालू राहत नाहीं, हाच तर एकतंत्री राजसत्तापद्धतींतील मोठा दोष असतो. चिनी संस्कृति अत्यंत प्राचीन व उच्च दर्जाची आहे. चीनमध्यें जे जे थोर बादशाहा होऊन गेले त्यांनीं चिनी कलेला, वाङ्मयाला उत्तेजन दिलें. मध्ययुगीन कालात चिनी शिल्पकला अत्यंत उच्च दर्जाला

पोंचली होती. स्थापत्य कलेच्या दृष्टीनें ईजिप्तमधील पिरामिडसूना मागे टाकील असा प्रचंड तट शी हुड ती बादशहानें बांधला. पंधराशे मैल लांबीचा व ५० फूट रुंदीचा असा हा तट आहे. १५ ते ३० फुटापर्यंत या तटाची उंची आहे. २०० यार्डांच्या अंतरावर ४० फूट उंचीचे बुरुज या तटावर बांधण्यांत आले आहेत. या प्रचंड तटाच्या आंत ठिकठिकाणीं लष्करी छावण्यांची व्यवस्था करण्यांत आली आहे. ओघाओघानें या ठिकाणीं हेंही सांगणें उचित आहे कीं, ज्या बादशहानें चीनभोंवतीं असा प्रचंड तट बांधून परकीय आक्रमणापासून चीनच्या संरक्षणाची तजवीज केली त्यानेंच चीनच्या प्रगतीला पदोपदीं अडथळा करणारा जुन्या विचारसरणीचा तट फोडून काढण्याकरतां ज्योतिष, वनस्पतिशास्त्र, वैद्यक व कृषिशास्त्र यावरील ग्रंथ बाजूला काढून बाकी सर्व जुन्या ग्रंथांची होळी करून टाकली. जुन्या व भूत कालाचें वैभव गात राहून नव्या प्रगतिकारक विचाराचा जनमनांत प्रवेशच होऊं द्यावयाचा नाहीं, अशा विचारसरणीच्या पुरातन रूढिप्रिय शास्त्री मंडळीविरुद्ध आज्ञापत्रें काढून त्यांचे वादविवाद व चर्चा बंद केल्या. प्रगतीला अडथळा करणाऱ्या जुन्याचा नायनाट करण्याच्या चिनी स्वभावामुळें प्राचीनकाळींही चीनची प्रगति होऊं शकली. आजच्या अभिनवचीनमध्येंसुद्धां प्रगतीकडे चिनी समाजाचें झपाट्यानें पुढें पाऊल पडत आहे, त्याच्या मुळाशीं हा हानिकारक जुन्याचा तिटकारा करणारा चिनीस्वभावच कारणीभूत झालेला आहे. मुद्रणकलेचा शोध चीननें सर्व जगांत प्रथम लावला. विद्येला समाजाच्या एका विशिष्ट धर्माची गुलाम न बनवतां समाजांतील सर्व थरांतील लोकांना ती हस्तगत करण्याची सुलभता प्राप्त करून दिल्यामुळें शास्त्रीय संशोधनाला चीनमध्यें चांगलाच अवकाश मिळाला. गणित, ज्योतिष, वैद्यक वगैरे शास्त्रांत चीननें अनेक शोध लावले. पहिलें होकायंत्र चीननें बनविलें. कागद तयार करण्याची कला चीननें शोधून काढली. रेशीम ही काय चीज आहे, हें चीननें जगाला प्रथम दाखवून दिलें. मातीचीं कौशल्ययुक्त व सुंदर भांडीं बनवून चीननें सर्व जगाचें लक्ष आपल्याकडे वेधलें.

**मॅन्च्यू राजवटी—** पण चीनच्या प्रगतीला उत्तेजन देणारी स्वदेशी

राजपरंपरा मात्र नष्ट झाली, विशेषतः सतराव्या शतकाच्या मध्यापासून चीन-वर प्रस्थापित झालेल्या परक्या मॅन्च्यू घराण्याच्या राजवटींत चीन झपाट्यानें सर्व जगाच्या मागे पडत चालला. मॅन्च्यू घराण्याचे बादशहा परकीय असल्यामुळें चीनबद्दल त्याना सहाजिकच आपलेपणा वाटत नव्हता. चीन-वर आपली सत्ता कायम कशी राहील, एवढयाच गोष्टीचा विचार ते करीत होते. अठराव्या शतकात युरोपियन राष्ट्रांनी चीनवर आक्रमण करण्यास सुरु-वात केली. परकीय मॅन्च्यू बादशहाची सत्ता चीनवर प्रस्थापित होण्यापूर्वी काही युरोपियन व्यापारी त्या वेळच्या बादशहाच्या दरबारीं गेले. त्यावेळीं "चीन स्वयपूर्ण आहे. दुसऱ्या रानटी राष्ट्रांतील लोकानीं तयार केलेल्या वस्तूची चीनला गरज नाहीं." अशीं सडेतोड उत्तरें या व्यापाऱ्याना चिनी बादशहा-कडून मिळत होतीं. गोऱ्या लोकाबद्दल चिनी समाजाला कधींच आदर वाटला नाहीं. या रानटी राक्षस लोकाशीं संबंध ठेवता कामाचा नाहीं, अशीच चिनी जनतेची सामान्य समजूत होती. पण मॅन्च्यू बादशहानीं गोऱ्या लोकाच्या चीनवरील आक्रमणाकडे लक्ष दिलें नाहीं. त्याना चीनमध्यें मन-मोकळेपणानें वावरू दिलें. गोऱ्या व्यापाऱ्यानीं या सवलतीचा फायदा घेत-लाच पण त्यापेक्षाही गोऱ्या मिशनऱ्यानीं आपल्या स्वभावाप्रमाणें याचा विशेष फायदा घेतला व चीनच्या कानाकोपऱ्यात प्रवेश केला. याचा आणखी एक परिणाम असा झाला कीं, मॅन्च्यू बादशाहाबद्दल चिनी लोकाना अगोदरच वाटणाऱ्या द्वेषात अधिकच भर पडली. या बादशहानीं आपल्या वर्चस्वाचें चिन्ह म्हणून पुरुषाना आपल्या पाठीवर वेण्याचे शेपटे सोडण्यास भाग पाडले होते. पाठीवर शेपटे सोडण्याचा हा जुलूम पुढें पुढें इतका जाचक झाला कीं, ज्याच्या पाठीवर शेपटा नाहीं तो इसम राजद्रोही व राजा-विरूद्ध कट करणारा, असें समजून त्याला शिक्षा देण्यात येऊं लागल्या. परदे-शात गेलेल्या व्यापाऱ्याना, विद्वान लोकाना व विद्यार्थ्यांना पुन्हा स्वदेशात यावयाचे असल्यामुळें आपल्या केसाची जोपासना ठेवावी लागे पण त्याच-बरोबर पाठीवर रुळणाऱ्या या गुलामगिरीच्या चिन्हामुळें परदेशात होणाऱ्या मानहानीलाही त्याना तोंड द्यावे लागे.

मॅन्च्यू बादशहाच्या कारकीर्दीत चीनला सर्वतोपरी उतरती कळा

लागली. चीनचा उद्योगधंदा व व्यापार परकीयांच्या हातात जाऊं लागला. गोऱ्या राष्ट्रांनीं चीनमधील रेल्वेवर आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें आणि परकीय गोऱ्या राष्ट्रांच्या आहारीं पडून त्यांचे गुलाम होण्याचा प्रसंग प्राप्त झाला.

चीनमधील उद्योगधंदे अद्याप वाढलेले नव्हते त्यामुळें क्रांतिप्रवण असा कामगार वर्गही चीनमध्यें निर्माण झाला नव्हता. पण चीनचे क्रांति-कार्य यामुळें अडून राहिलें नाहीं. क्रांतीला परिपक्व अशी परिस्थिति चीन-मध्यें निर्माण झाली होती. तेव्हा देशात जी काय सामुग्री असेल तिला संघ-टित स्वरूप देऊन क्रांति घडवून आणण्याच्या प्रयत्नाना चिनी क्रांतिकारक पुढाऱ्यानीं हात घातला व देशातील बहुसंख्य शेतकरी जनता ध्येयाची स्पष्ट कल्पना व योग्य नेतृत्व मिळाल्यावर क्रांति घडविते, हें चीननें जगाच्या निदर्शनास आणून दिले. ज्या शेतकरी जनतेने डॉ. सन्यत्सेनसारख्या पुढा-ऱ्याच्या नेतृत्वाखालीं चीनमध्यें क्रांति घडवून आणली, ती टिकविली व जपानसारख्या बलाढ्य राष्ट्राशीं झुजून आपल्या प्रगतीचा मोकळा करून घेतला त्या जनतेची यावेळची परिस्थिति कशी होती व एकंदर चिनी समा-जाची रचनाही कशी होती, ते आता आपण पाहूं.

**चिनी शेतकरी**— चीन हा शेतकऱ्याचा देश होता त्याचप्रमाणें तो जमीनदाराचाही देश होता. ज्या शेतकऱ्याना स्वतःच्या मालकीच्या जमीनी होत्या ते शेतकरी आपल्या कुटुंबाच्या उत्पन्नात भर टाकण्याकरता दुसऱ्याच्या मालकीच्या जमीनी खंडानें करीत. सावकारीमुळें किंवा इतर कांहीं कारणामुळें जे लोक जमिनीवर ताबा मिळवीत त्याना जमिनीच्या पूर्ण कबजाचा हक्क कधींच प्राप्त होत नसे. जमिनीवर मेहनत मशागत करणारा व जमीन कसणारा शेत-करी हाच जमिनीचा खरा धनी समजण्यात येई. जमिनींत उत्पन्न झालेल्या मालापैकीं कांहीं हिस्सा खंड म्हणून घेण्यापुरताच त्याचा जमिनीवरील माल-कीचा हक्क मान्य करण्यात येत असे. बाप मरण पावल्यावर त्याच्या मुलात जमिनीची वाटणी होई. कुटुंबातील प्रमुख म्हणून वडिल मुलाला थोडा जास्त भाग मिळत असे.या पद्धतीचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. जसजशी

लोकसंख्या वाढत चालली तसतसे जमिनीचे अधिकाधिक लहान तुकडे होत गेले आणि हे एकाच माणसाच्या मालकीचे लहान लहान तुकडे इतस्ततः पसरलेले असल्यामुळें जमिनीच्या उत्पन्नावर कुटुंबाचा उदरनिर्वाह होणें मुष्किलीचें होऊ लागलें.

चीनच्या उत्तर भागात ज्वारी, गहूं, बाजरी पिकते. याङत्सी नदीच्या खोऱ्यातून व दाक्षिणेंतील भागात तांदूळ हें मुख्य पीक आहे. जमीनीच्या मालकाला द्यावयाचा खंड चिनी शेतकरी धान्याच्या रुपातच देतो. उत्तर भागात लोकरीची पैदास मोठ्या प्रमाणात होते. याङत्सी खोऱ्यात व दाक्षिणेंत रेशमाचें व कापसाचे उत्पन्न मोठ्या प्रमाणावर होतें. जमीनीच्या लहान लहान तुकड्यावर केलेली शेती केव्हाही फायदेशीर होत नाहीं. पुरेसें बीं मिळत नाहीं. शेतीचीं कामें करणाऱ्या जनावराची कमतरता पडते. औतें मिळत नाहींत आणि त्यातल्या त्यात दुष्काळ पडला कीं, शेतकऱ्याचे हाल कुत्राही खाईनासा होतो. अशा परिस्थितींत चिनी शेतकऱ्याला साहजिकच सावकाराचें घर पहावें लागत होतें. काढलेलें कर्ज तो कधींही फेडू शकत नव्हता. अर्थात् सावकार शेतकऱ्याच्या जमिनी विकत घेत होता व शेतकऱ्याला सावकाराचें कूळ बनावें लागत होतें. चिनी शेतकऱ्याचे हाल एवढ्यावरच मिटत नव्हते. जमिनीच्या मालकाना धान्याच्या रूपानें तो खंड देत होता. कुटुंबाच्या खर्चाकरता फारच थोडें धान्य त्याच्याजवळ शिल्लक रहात असे. पोटाखेरीज इतर खर्च भागविण्याकरता यापैकींच कांहीं धान्य तो विकावयास काढी त्यावेळीं सावकार व शहरातले व्यापारी यांचें संगनमत असल्यामुळें हे लोक सांगतील त्या भावानें तें त्याला विकावें लागत होतें

**स्वभाव विशेष**— आपली इस्टेट जमिनीच्या रूपात वाढवावयाची पैसेवाल्या लोकाची सामान्य प्रवृत्ति चीनमध्येंही रूढ होती. पैसे जमिनींत गुंतविणें व तसेंच इमारतीसारख्या स्थावर मिळकतींत ते गुंतावेणें सुरक्षितपणाचें असतें या समजुतीनें सरकारी अधिकारी व व्यापारी जमिनी खरेदी करण्याच्या मागे होते. लढाईतून परत आलेल्या सैनिकानाही नवीन कालव्याखालच्या जमिनी बक्षिस देण्यात येत असत, यामुळें शांततेच्या काळात जमीनदारीची सारखी वाढ होत असे. याच्या भरतीला देवळाच्या

व्यवस्थेकरता जमिनी तोडून दिल्या जात. जमीन कसणारा तिचा मालक खरा पण तात्विकदृष्ट्या सर्व जमीन बादशहाच्या मालकीची अशीच समजूत चीनमध्यें रूढ होती. मॅन्च्यू बादशहानीं चीनवर कबजा केल्यानतर आपापल्या सरदाराना त्यानीं काहीं ठिकाणीं जमिनी दिल्या. अशा रीतीनें नाना प्रकारें जमीनदारी वाढत गेली तरी युरोपातील व हिंदुस्थानच्या बहार, बंगाल, आध्र प्रातातील जमीनदाराच्या मानानें चीनमधील जमीनदार वर्गाच्या इस्टेटी फार छोट्या होत्या. या इस्टेटी जशाच्या तशा कायम राखण्याचा कायदा नव्हता. शेतकऱ्याचे मिरासदारीचे हक्क कायम स्वरूपाचे असल्यामुळें त्याच्या मरणानतर त्याच्या मुलामध्यें जमिनीच्या वाटण्या होत व जमिनीचे लहान लहान तुकडे होण्याचे चालूच राही. चीनमधल्या जमिनी स्वाभाविकच सुपीक आहेत. भाताचीं पिकें वर्षांतून दोनदा व काहीं काहीं भागातून तीनदा काढण्यात येतात यामुळें कुळाकडून किती खड घ्यावा, किती प्रमाणात त्याची पिळणूक करावी, या बाबतींत काहीं निर्बंध नसल्यामुळें जमीनदाराच्या इस्टेटी लहान असल्या तरी त्याच्या व त्याच्या कुटुबाच्या चैनी चालविण्याकरता त्या पुरेशा असत. सावकार, जमीनदार, सरकार व सारा वसूल करणारे सरकारी अधिकारी याच्याकडून होणारी पिळणूक असह्य झाली म्हणजेच शेतकरी ठिकठिकाणीं बडाचा उठाव करीत, सावकाराचे कर्जरोखे जाळून टाकीत, जमीनदाराच्या वाड्याना आगी लावीत, त्याच्या घरचींही दप्तरे भस्मसात् करीत. याप्रमाणें आपल्यावरील ओझें शेतकरी काहीं काळ झुगारून देत असले तरी पुन्हा सावकारी, जमीनदारी व सरकारी जुलूम ही परंपरा चालूच राही. चीनमध्यें अत्यत प्राचीन कालापासून प्रचलित असलेल्या कन्फ्यूशिअसच्या नीतिधर्मात हिंसेला मुळींच प्राधान्य देण्यात आलेलें नाहीं. इ. स. च्या आरंभींच्या कालापासून चीनमध्यें बुद्धधर्माचा प्रसार झाला, क्षत्रियाला ब्रम्हत्वाच्या खालोखाल हिंदुस्थानात श्रेष्ठ दर्जा देण्यात आलेला आहे तर चीनमध्यें लढाईच्या पेशा करणें हीन दर्जाचे समजलें जात असे. पण हा सर्व नीतिधर्म व धार्मिक समजुती शेतकऱ्याच्या बडखोर वृत्तीच्या आड कधींही आल्या नाहींत. आपल्यावर होणारा जुलूम मर्यादेच्याबाहेर गेला, तो असह्य

झाला कीं, तो चवताळून जात असे, संघटित होत असे व प्रतिपक्षाशीं दोन हात करून त्याला नामोहरम करून टाकण्याचा प्रयत्न करीत असे.

चीनचा उत्तर भाग सोडला, तर मध्य व दक्षिण भागातील शेती मुख्यतः कालव्याच्या पाण्यावर अवलंबून आहे. पीतनद व याङ्त्सी (महानद) हे दोन प्रचंड नद या भागातून वाहतात. चीनचे प्राणभूत असे हे नद आहेत. चीनच्या इतर भागातील लोकसंख्येपेक्षा या दोन नदांनीं व्यापलेल्या प्रदेशातील लोकसंख्या कितीतरी पटीनें जास्त आहे. खरा चीन या दोन नदांनीं सभाळला आहे. चिनी स्वभाव व संस्कृति या दोन नदांच्या भोंवतीं घुटमळत असलेली आढळून येते. चीनचें जीवन या दोन नदांनीं वैभवशाली व सुखमय केलें आहे. दरसाल दोन वेळा या दोन नदांना महापूर येतात. या महापुराबरोबर बहुमोल व वनस्पतींना पोषक अशा खतांनीं युक्त असलेल्या मलायम मातीचे थर वाहून येतात व सर्व जमीन झांकून टाकतात. असल्या अमोल खतांनीं युक्त असलेली काळी माई चीनला भरपूर अन्न देते. चिनी शेतकरी या माईची अंग झाडून सेवा करतो व दोन दोन, तीन तीन पिकें काढून आपल्या कुटुंबाला पोसतो व जगालाही पोसतो. ज्या जमीनींत जेमतेम एकच पीक व तें कसें तरी येतें त्या ठिकाणचा शेतकरी स्वाभाविकच आळशी बनतो. जेम तेम कसेंतरी एक पीक काढावें, त्यातील बराचसा भाग सावकारांनीं व सरकारनें लूटून न्यावा, अशा परिस्थितींत शेतकऱ्याच्या अंगचा कामाचा उत्साह कमी व्हावा, हें साहजिक असतें. ज्या जमीनीवर राबावें तिच्यासंबंधानें आपलेपणाची भावना नाहीं, बरें जी मेहनत मशागत करावी तिचेंही चीज नाहीं. त्या श्रमाचें फल दुसरेच कोणी लुटून नेतात अशा परिस्थितींत शेतकरी मरगळून जातो व आळशी बनतो यात काहींच आश्चर्य नाहीं आणि अशा रीतीनें मरगळून गेलेला शेतकरी आपल्याला लुटणाऱ्या, आपल्या श्रमाचें अपहरण करणाऱ्या आपल्या वर्गशत्रूविरुद्ध हत्यार उचलण्यासही असमर्थ बनतो. शत्रुस्थानीं असलेल्या वर्गाबरोबर दोन हात करावयाचे तर काहीं तरी रग शिल्लक असावी लागते. शभर टक्के दारिद्र्यामुळें, निरुत्साहामुळें व असंघटितपणामुळें ही रगच जेथे नाहींशी झालेली असते तेथील शेतकरी आपल्या शत्रूविरुद्ध बंड करुन कसा उठणार?

असला शेतकरी केव्हा केव्हा अगदीं असह्य झालें म्हणजे बंडाचा उठाव करतो पण तो फारच क्वचित्. पण चिनी शेतकऱ्याची स्थिती तशी नाहीं.

याङ्त्सी ( महानद ) च्या काहीं भागात दहा वर्षे पुरेल इतका तांदूळ व गहु एका वर्षात पिकतो यामुळें या भागातील लोकसंख्याही अतोनात वाढलेली आहे. या भागात कापूसही मोठ्या प्रमाणावर पिकतो. या भागातील व यापेक्षा इतर थोडें कमी पीक येत असलेल्या भागातील शेतकरी जास्त सुखावलेला आहे. त्याचप्रमाणें तो धाडसी, संकटाना न जुमानणारा चिकाटीचा व सोशिक बनलेला आहे. चीनच्या मध्य व दक्षिण भाग व्यापलेल्या पीतनद व महानद या दोन्ही नदाचा लहरी स्वभाव चिनी शेतकऱ्याचा वरील प्रकारचा स्वभाव बनविण्यास कारणीभूत झाला आहे. हे दोन्ही नद आपल्या पुराबरोबर खतानीं भरलेला वस्त्रगाळ चिखल पात्राभोवतालच्या जमीनीवर हंथरतात व शेतें सुपीक करतात त्याचप्रमाणें हे नद आपल्या महापुरानें सर्व देश कधीं कधी उध्वस्तही करून सोडतात. दरसाल कोठें नाहीं कोठे तरी हे नद आपलें पात्र सोडून दुसरीकडे धावतात व नवीन पात्रे निर्माण करतात. दहा वर्षे अशीं जात नाहींत कीं, या नदानीं आपल्या प्रचंड पाण्याच्या लोंढ्यानीं गावेचीं गावे वाहून नेलीं नाहींत. अशा प्रसंगीं चिनी शेतकऱ्याचें भयंकर नुकसान होते, त्याचे संसार धुळीस मिळतात. झाडें झुडपें काढून बांध घालून तयार केलेल्या जमीनी उध्वस्त होतात आणि या नदाचा प्रताप ओसरल्यावर पुन्हा नवी विटी, नवें राज्य चिनी शेतकऱ्याला निर्माण करावें लागतें. असल्या भौतिक आपत्ति आल्या म्हणजे त्या तो धैर्याने सहन करतोच पण त्याच वेळीं संघटितपणें या नैसर्गिक संकटाना तो धाडसानें तोंडही देतो. वेळोवेळीं येणारीं नैसर्गिक संकटें चिनी शेतकरी जितक्या सोशिकपणानें सहन करतो तितक्याच चिकाटीनें, धैर्यानें व संघटितपणें त्याचें निवारण करण्याच्या कामींही तो झटतो. याप्रमाणें निसर्गनिर्मित संकटाना तोंड देण्यास तयार असलेली चिनी शेतकऱ्याची वृत्ति मनुष्यनिर्मित संकटानाही तोंड देण्यास मागे पुढें पहात नाहीं.

अठराव्या शतकात जमीनीवर कोणत्याही प्रकारचा मालकी नसणारा पण शेतावर राबणारा कामगार वर्गही चीनमध्यें निर्माण झाला होता. विशेषतः

या कामगार वर्गाची वाढ होण्यास जमीनदार वर्ग कारणीभूत झाला होता. जे जमीनदार घरी शेती करीत ते रोजंदारीवर शेतीचीं कामें करण्यास माणसें ठेवीत व त्याना हवें तसें राबवून पिकें काढून घेत. याप्रमाणें खेड्यापाड्यातून शेतमजूराचा वर्ग निर्माण झाला होता. त्याचप्रमाणें शहरातून व्यापाऱ्यानीं व कामगारांनीं चालविलेल्या छोट्या कारखान्यातून उमेदवार म्हणून कामें करणारा वर्गही निर्माण झाला होता. शहरामधून भिकार वाढलें होतें व समाजातील हलकीं कामें करणारा बहिष्कृत कामगार वर्गही अस्तित्वात आला होता. सुखवस्तु व श्रीमंत लोकाच्या घरोघरीं कामें करणारे लोक जवळ जवळ गुलामच होते. जमीनदाराच्या घरीं वशंपरपरा गुलाम म्हणून राबणारा वर्गही नामशेष झालेला नव्हता. पितृशासित कुटुंबपद्धति हा चिनी समाज रचनेंतील एक विशेष आहे. मुलें कितीही मोठीं, शहाणीं व करती सवरती झालीं तरी बापाची आज्ञा उल्लघन करणें हा मोठा गुन्हा समजला जातो. माणूस जितका म्हातारा होत जाईल तितका तो अधिक आदरणीय समजण्यात येतो. तीस वर्षाच्या चिनी माणसाला कोणी चाळीस वर्षाचा म्हटलें तर त्याला भूषण वाटतें. आपल्यासबंधानें असे उद्गगार काढणाऱ्या माणसाचे तो आभार मानतो. बहुपत्नीकत्वाला चिनी समाजाचा विरोध नाहीं. चिनी श्रीमंत माणसें एकापेक्षा जास्त लग्नें करतातच पण चिनी शेतकरीही शेतात आपल्याबरोबर राबण्याकरता आणखी एक जास्त माणूस मिळेल या उद्देशानें अनेक लग्नें करीत. लग्नें ठरविण्याचे काम वडिल माणसें करीत. भावी वरवधूंना या बाबतींत काहींच मत नसे. शहरातल्या काहीं उच्च जाती खेरीज करून सर्व सामान्य चिनी शेतकरी समाजात बालविवाह रूढ होता. सुशिक्षित, अशिक्षित, कारागीर, शेतकरी, मजूर, जमीनदार, सावकार, सरकारी अधिकारी असे अनेक लहान मोठे वर्ग चिनी समाजात अस्तिवात असले तरी जाति संस्थेनें त्यात कधीं प्रवेश केला नाहीं. गुणाला प्राधान्य मिळत असे, जन्माला नाहीं. धर्माच्या बाबतींतही चिनी समाज सहिष्णु वृत्तीचा आहे. निरनिराळ्या धर्मसमजूतींची मंडळी एकाच कुटुंबात राहूं शकतात. रोटीबेटी व्यवहाराच्या बाबतींत धर्म किंवा जात आड येऊ शकत नहीं. कन्फ्यूशसचा नीतिधर्म, भूताखेताची पूजा करण्यास सागणारा मंत्र तत्राचा ताऊ धर्म, बुद्ध

धर्म, इस्लामी धर्म व ख्रिस्तीधर्म हे सर्व लहान मोठ्या प्रमाणात प्रचालित झाले होते तरी चीनमध्ये धर्मयुद्धें कधीं घडून आलीं नाहींत. ख्रिस्ती मिश-नऱ्यावर चिनी शेतकऱ्यानीं बऱ्याच वेळा हल्ले केले पण त्यात धर्मभावनेपेक्षा परकीयाचा आपल्या देशात प्रवेश होऊं द्यावयाचा नाही व त्याच्या कारवायाना आपल्या देशात थारा द्यावयाचा नाहीं, हीच भावना प्रामुख्याने होती. अठराव्या शतकात चिनी समाजाची रचना वरील प्रकारची होती. सरजामशाहीच्या राजवटीला साजणारी अशीच ती होती. गेल्या दोन हजार वर्षात समाजाच्या या रचनेंत व मनस्थितींत मुळींच फरक पडलेला नव्हता. या एवढ्या मोठ्या कालखंडात चिनी समाजाच्या मनोरचनेंत जो काहीं थोडासा फरक घडून आला होता तो विशेष मह-त्वाचा नव्हता. निरनिराळ्या बादशाही घराण्याच्या निरनिराळ्या धोरणामुळें हा फरक घडून येत होता पण तो फारच मद स्वरूपाचा होता. चीनवर राज्य करणाऱ्या या घराण्यानीं वेळोवेळी केलेल्या सुधारणानीं चिनी समा-जाच्या आर्थिक परिस्थितींत फरक घडवून आणलेला होता. पण याचवेळीं औद्योगिक क्रातिनतरच्या जगाच्या इतर भागात ज्या प्रचड घडामोडी होत होत्या त्याची दखल या बादशहानीं न घेतल्यामुळे एके वेळीं सर्व जगाच्या पुढें असलेला चीन मागें पडू लागला होता.

# पाश्चात्यांचें आक्रमण

अठराव्या शतकापूर्वीच साम्राज्यवाढीच्या लोभानें पाश्चात्य राष्ट्रांनीं चीनवर आक्रमण करण्यास सुरवात केली. या आक्रमणामुळें चीनवर अनेक सकटें आलीं, चीन राष्ट्र दुभग होण्याचा प्रसग आला, त्याचें स्वातंत्र्य नष्ट होण्याची भीति उत्पन्न झाली तथापि चीनचे डोळे उघडण्यासहि शेवटीं हें आक्रमणच कारणीभूत झालें. या आक्रमणामुळें चीनची दृष्टि विशाल झाली. आपल्या समाजात आमूलाग्र क्राति घडवून आल्याशिवाय जिवत व स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें जगाच्या स्पर्धेत आपण टिकून राहूं शकणार नाहीं, असें या परकीय अक्रमणानें चिनी जनमनाला वाटावयास लावलें.

**पोर्तुगीज** — युरोपियन राष्ट्रापैकी पोर्तुगालनें चीनवर पहिला मोर्चा चढविला. सोळाव्या शतकाच्या आरंभीं इ. स. १५११ मध्यें जलमार्गानें पोतुगीज लोक चिनी किनाऱ्यावर उतरले. व्यापार करण्याच्या निमित्तानें आलेल्या या लोकाना मुळींच प्रतिबध झाला नाहीं. चीनसारख्या प्रचड राष्ट्राच्या किनाऱ्यावरील एका कोपऱ्यात उतरलेल्या या लोकाकडे कोणी लक्षहि दिलें नाहीं. या दुर्लक्षाचा फायदा पोतुगीजानीं सहाजिक घेतला व किनाऱ्यावरील एका भागात त्याच्याबरोबर आलेल्या कॅप्टननें एक लहानशी स्वतंत्र वसाहतही स्थापली.

**स्पॅनिश**—यानतर जवळ जवळ शंभर वर्षांनीं (१६०३) स्पॅनिश लोक चीनच्या किनाऱ्यावर उतरले. या लोकानीं चीनच्या किनाऱ्यावर पाऊल ठेवल्याबरोबर चढाईचें धोरण स्वीकारलें. फिलिपाईन बेटात जाऊन राहिलेल्या चिनी लोकानीं स्पॅनिश वसाहतवाल्याचा धुव्वा उडविला होता. त्याचा सूड उगवण्याकरताच जणूं काय स्पॅनिश लोकानीं खुद्द चीनवरच आक्रमण करण्याचें ठरविलें, पण किनाऱ्यावरील चिनी रहिवाश्यानीं त्याना जोराचा प्रतिकार केला. दोन्ही पक्षात बऱ्याच चकमकी उडाल्या. सुधारलेल्या

युद्धसामुग्रीमुळे चिनी लोकाना स्पॅनिश लोकांपुढें हार खावी लागली. या चकमकींतून २०,००० चिनी लोकाची कत्तल उडविली गेली. आश्चर्य हें कीं, मॅन्च्यू बादशाहानीं या बाबतींत काहींच दखल घेतली नाहीं. स्पॅनिश लोकाचा मुख्य व्यापाराचा जिन्नस तबाखू होता. आपल्या अमेरिकन वसाहतींतून त्यानीं हा माल आणला होता. चिनी लोकाना अफू ओढण्याची सवय लागण्यापूर्वी स्पॅनिशानीं त्याना प्रथम तबाखू ओढण्याचें व्यसन लावून दिले.

**डच**—याच्यामागून डच व्यापारी चीनमध्यें शिरले. याच्यापाशीं तंबाखू नव्हती. हिंदुस्थानात उत्पन्न होणारी अफू या लोकानीं आपल्याबरोबर आणली होती. अफू कशी ओढावयाची याची युक्ति त्यानींच शोधून काढली व चिनी लोकाना तिचे धडे दिले. पौर्वात्य देशातील काहीं भागातून अफू ओढली जात होती पण चिनी लोकाना अफू ही काय चीज आहे, हेंसुद्धा माहीत नव्हते. डच लोकानीं प्रथम हें व्यसन चीनमध्यें घुसविलें आणि ब्रिटिशानीं तर आपल्या साम्राज्यतृष्णेच्या शमनार्थ चीनमधील या व्यसनाला उत्तेजन देऊन त्याचा सर्व देशभर फैलाव केला.

**ब्रिटिश**—डच लोकानतर ब्रिटिश लोक चीनच्या किनाऱ्यावर आले. ब्रिटिश लोक चीनमध्यें गर्जतच आले. चीनच्या किनाऱ्यावर उतरण्याबद्दलचा परवाना मिळण्यास उशीर झाला, ही गोष्ट त्याना सहन झाली नाहीं. त्यानीं कॅन्टनच्या तटबदीवर व किल्ल्यावर तोफाचा भडिमार केला व आपला पाश्चात्य आसुरीपणा चीनच्या नजरेस आणून दिला.

पोर्तुगीज, स्पॅनिश, डच, इंग्लिश या सर्व चीनमध्यें आलेल्या परकीय व्यापाऱ्याना चीनचे रेशीम, चहा व कापूस पाहिजे होता. आपल्या मालाच्या मोबदला युरोपियन व्यापाऱ्यानीं आणलेला माल घेण्यास चिनी व्यापारी मुळींच तयार नव्हते. मोबदल्यात चादी, सोनें मिळत असेल तर चिनी रेशीम, चहा, कापूस वगैरे जिनसा मिळतील एरवीं मिळणार नाहींत, असा चिनी व्यापाऱ्याचा आग्रह होता. हा आपला आग्रह त्यानीं यापुढें ही बरींच वर्षे चालविला होता. अफू ओढण्याचें व्यसन लागत चाललेल्या चीनमध्यें अफू घुसडविण्याच्या युरोपियन व्यापाऱ्याच्या प्रयत्नालाही फारसें यश आलें नाहीं. चीनमध्यें शिरलेल्या या व्यसनाचा जेव्हा बराच बोभाट झाला व

त्याचा सर्वत्र निषेध होऊ लागला त्यावेळीं चिनी सरकारला या बाबतींत लक्ष घालावें लागले व १७२९ मध्यें अफूच्या आयातलाच बंदी करण्यात आली. यामुळे मोबदल्याचा जिन्नस म्हणून गोऱ्या व्यापाऱ्याना अफूचाही उपयोग होईनासा झाला.

**मॅन्च्यू बादशहांचें घातकी धोरण**—याप्रमाणे चीनशीं व्यापार सुरू करण्याच्या बाबतींत बरेच अडथळे आले तरी युरोपियन व्यापारी त्यामुळे मुळींच डगमगले नाहींत. त्यानीं आपला इतर व्यापार तसाच चालू ठेवला. यावेळीं अस्तित्वात असलेल्या चीनवरील परकीय राजसत्तेचाही युरोपियन व्यापाऱ्यानीं उपयोग करून घेतला. परकीयाचे आक्रमण चीनवर होऊ द्यावयाचें नाहीं—मग हे आक्रमण कोणत्याही प्रकारचे असो—अशी योग्य ती खबरदारी पूर्वीचे स्वकीय बादशहा घेत होते. पण परकीय असलेल्या मॅन्च्यू बादशहाना या गोष्टीचें कांहींच सोयरसूतक नव्हते. चीनवरील आपली सत्ता कायम कशी राहील व आपल्या तुटपुंज्या खजीन्यात अधिकाधिक भर कशी पडेल, इकडेच त्याचें लक्ष होतें. मूळ दृष्टिकोणातच फरक असलेल्या मॅन्च्यू बादशहानीं या परक्या युरोपियन व्यापाऱ्याना सवलती देण्यास सुरुवात केली व कॅन्टनजवळ त्याना आपलीं व्यापारी ठाणीं बसविण्यास परवानगी दिली यात कांहींच आश्चर्य नाहीं. युरोपियन व्यापाऱ्याच्या मागें त्याच्या देशातील राजसत्तेचें पाठबळ होतेच. चीनमध्ये व्यापार करूं पाहणाऱ्या व्यापारी कपन्याना त्या देशात व्यापार करण्याची मक्तेदारी त्या त्या ठिकाणच्या सरकारानीं या कपन्याकडून वाटेल तसा पैसा उकळून विकली होती. इतकेच नव्हे तर या कपन्याना जो नफा होईल त्यात आपला हिस्साहि कायम ठेवला होता. त्यावेळच्या (१७०२) चीनच्या बादशहानें या पद्धतीचे बरोबर अनुकरण केले. नफ्यातील भरपूर हिस्सा देण्याच्या अटीवर युरोपियनाशीं व्यापार करण्याची संपूर्ण मक्तेदारी त्यानें एका चिनी व्यापाऱ्याला देऊन टाकली. इतर चिनी व्यापाऱ्यानीं सरकारच्या या कृत्याचा निषेध करून जोराचा विरोध केला त्यावेळीं एका व्यापाऱ्याच्या ऐवजीं निरनिराळ्या व्यापारी गटाना वरील अटीवरच मक्तेदाऱ्या देण्यात आल्या. या पद्धतीमुळें चीनमधील व्यापारी वर्ग झपाट्यानें श्रीमंत बनू

लागला. कॅन्टनमधील एक व्यापारी २,६०,००,००० डॉलराचा धनी बनला. एवढ्या एका उदाहरणावरूनच चिनी व्यापारी वर्गाच्या वाढत्या दौलतीची कल्पना येण्यासारखी आहे. चीनमधील व्यापारीवर्ग याप्रमाणें गबर झाला तरी चिनी व्यापाऱ्यावर युरोपियन कंपन्या आक्रमण करीत होत्याच, हे लक्षात ठेवलें पाहिजे. चीनचा व्यापार त्याच्या हातात भराभर चालला होता. आपापल्या देशाच्या राजाकडून अनेक सवलती मिळवून ते आपला माल चीनमध्ये स्वस्त दरात आयात करीत होते व चिनी माल हवा तसा पाडून मागून भरमसाट नफा मिळवीत होते, पण मॅन्च्यू बादशहाचे तिकडें लक्ष नव्हते. या परक्या बादशहानें चीनच्या हितसंबंधाची काय म्हणून फिकीर करावी? चीनवरील आपली सत्ता टिकवून धरण्याकरता व आपल्या सरदाराच्या चाडाळ चैनी चालविण्याकरता त्याला भरपूर पैसा पाहिजे होता व ता मिळविण्याकरता देशातील व्यापारी गटाना हव्या त्या दरानें व्यापाराच्या मक्तेदाऱ्या तो विकत होता. आपल्या खजिन्याची भर करण्याकरिता जकातीच्या भावात त्यानें वाढ केली व महसूल वसूल करण्यास सोपे जावें म्हणून कॅन्टन बंदरातूनच सर्व युरोपियन व्यापार चालला पाहिजे, असे निर्बंध घातले. या निर्बंधामुळे युरोपियन व्यापाराला मुळींच धक्का बसला नाहीं. शेकडा ५००, ६०० टक्के नफा हे व्यापारी मिळवूं लागले होते.

**अफूची जकात-चोरी**— पण ब्रिटिश व्यापारी एवढ्यावरही संतुष्ट नव्हते. चीनच्या किनाऱ्यावर लहान मोठ्या वसाहती करून चीनशीं व्यापार करणारे इतर युरोपियन प्रतिस्पर्धी ब्रिटिश व्यापाऱ्याच्या डोळ्यात सलत होते. तेव्हा कॅन्टन बंदरापेक्षा चीनमध्ये आपला माल घुसविण्यास इतर सोयीच्या मार्गाच्या तपासास ते लागले. तिबेटकडून खुष्कीच्या मार्गानें चीनमध्ये शिरण्याचा त्यानीं प्रयत्न केला. त्यात त्याना यश आले नाहीं. अफू ओढण्याच्या व्यसनाला चिनी सरकारने कायद्यानें बंदी केली होती. १७२९सालींच अफूच्या आयातीलाही बंदी करण्यात आली होती. पण हे निर्बंध फार दिवस टिकून राहिले नाहींत. पैशाच्या लोभानें या मालाच्या आयातीकडे दुर्लक्ष होऊ लागलें. अफूचें व्यसन चीनमध्यें जोरानें फैलावत चाललें. कॅन्टन बंदरातून आपल्याला हवा तितका माल चीनच्या अंतःप्रदेशात नेता येत नाहीं व तिबेट

कडून चीनमध्ये शिरण्यास चिनी सरकारची परवानगी मिळत नाही, असें पाहिल्यावर चीनमध्ये जकात चुकवून चोरून माल नेण्याच्या नीच प्रयत्नाला ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं हात घातला व जकात–चोरीच्या दृष्टीनें सोयिस्कर असलेली अफू चीनमध्यें मोठ्या प्रमाणावर चोरून नेऊन तिचा व्यापार करण्यास त्यांनीं सुरुवात केली. बंगालमध्यें हवी तेवढी अफूची पैदास करण्याची मक्तेदारी ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें ज्याप्रमाणे आपल्या सरकारकडून मिळविली होती त्याचप्रमाणें चीनमध्येंही अफू नेऊन विकण्याची मक्तेदारी तिनें मिळविली होती. १९ व्या शतकाच्या आरंभीं अफूच्या जकातचोरीचा हा मामला इतक्या मोठ्या प्रमाणात वाढला कीं, १८०८ मध्यें १५,००,००० डॉलर किंमतीची अफू जकात चोरीनें–चीनमध्ये घुसविण्यात आली. १८३२ सालीं ब्रि. पार्लमेंटमध्यें रिफॉर्म बिल मंजूर झाले व ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीची चीनशीं व्यापार करण्याची एकमेव मक्तेदारी रद्द करण्यात आली पण त्याचा परिणाम असा झाला कीं,ब्रिटिश व्यापारी चीनशीं व्यापार करण्यास मोकळे झाले. कॅन्टन बंदरातील ब्रिटिश जहाजाची संख्या भराभर वाढली. अफूचा जकातचोरीचा मामला कळसास पोंचला व १८१६-१७ सालीं तर ९,९०,०००,००० टन अफू चीनमध्यें जकात–चोरी करून घुसविण्यात आली. यावेळीं चिनी सरकार इतके दुबळें झालें होतें कीं, ब्रिटिश व्यापाऱ्याच्या या कारवाया त्याला बंद पाडता आल्या नाहींत.

ब्रिटिशानीं १८१६ सालीं नेपाळवर स्वारी केली व त्याठिकाणीं आपले रेडिसेन्सीचे ठाणें स्थापलें. चीनचा नेपाळशीं असलेला संबंध तोडून टाकला. १८२४ मध्ये ब्रम्हदेशात कटकट उत्पन्न करून चिनी किनाऱ्यावरील दोन प्रदेश ब्रिटिशानीं आपल्या ताब्यात घेतलें. १८१९ मध्यें सिंगापूर ब्रिटिशाच्या ताब्यात आलेच होतें. चीनवर जलमार्गानें हल्ला करण्यास सोयीस्कर, असें हें आरमारी ठाणें होतें. आधुनिक तोफानीं व युद्धसामुग्रीनें सज्ज असलेलीं ब्रिटिश आरमारी जहाजें जुन्या चिनी आरमारी होडक्याचा केव्हाच धुव्वा उडवून देतील, अशी स्थिती निर्माण झाली होती. ब्रिटिशाची ही सर्व तयारी पाहून चिनी सरकारला त्याच्या हेतूबद्दल साहाजिकच संशय वाटू लागला व तो लवकरच खरा ठरला. चीनवर हल्ला करण्याची सर्व प्रकारची तयारी

ब्रिटिशानीं करून ठेवली होती, फक्त काहीं तरी निमित्त ते पाहात होते व तें त्याना लवकरच मिळालें.

**अफूकरतां पहिलें युद्ध**—कॅन्टन बंदरात अफूच्या जकातचोरीचा हा मामला धडाक्यानें चालू होता. त्याप्रमाणें बदरावर देखरेख ठेवणारे चिनी अधिकारी ही चोरी पकडण्याची सधी पाहात होते. या चोरीच्या व्यवहाराकडे दुर्लक्ष करणारेही काहीं अधिकारी होते. ही चोरी पकडून ब्रिटिश व्यापाऱ्याशीं कटकट उत्पन करण्यास ते धजत नव्हते. पण एका खमक्या अधिकाऱ्यानें या कटकटीची व तिच्यामुळे होणाऱ्या परिणामाची पर्वा केली नाही. जकात चुकवून अफूच्या पेट्या घेऊन जा रें एक जहाज या अधिकाऱ्यानें पकडलें इतकेंच नाहीं तर त्याने या जहाजातील सर्व पेट्याना समुद्राचा तळ दाखविला. चिनी अधिकाऱ्याचें हें कृत्य रास्त होतें. कोट्यवधी टन अफू समुद्रात बुडविली असती तरी त्यांत काहींच गैर नव्हतें; पण बळी तो कान पिळी हाच न्याय जेथें रूढ आहे तेथें या चिनी अधिकाऱ्याच्या रास्त कृत्याचा कोण विचार करणार ? तोफानीं सुसज्ज असलेल्या जहाजाचा ज्याना पाठिंबा आहे त्या ब्रिटिशाना एवढें निमित्त बस्स झालें. चिनी अधिकाऱ्याच्या या कृत्याच्या बदला घेण्याकरिता ब्रिटिश व्यापाऱ्यानीं बेशरमपणानें कॅन्टन बदरावर तोफाचा भडिमार केला व तें आपल्या कबजांत घेतलें. ब्रिटिश लढाऊ जहाजांच्या तोफाच्या माऱ्यापुढें बदराच्या रक्षणार्थ ठेवलेल्या चिनी लष्कराचें काहीं चाललें नाहीं व पुढें लवकरच ब्रिटिशानीं शाघाय बदरावरही कबजा केला. चीनवर चोरून मारून व पुढें उघड उघड, जबरीनें चिनी जनतेवर अफूचें व्यसन लादणाऱ्या ब्रिटिशाच्या या धोरणास चिनी सरकारने वेळोवेळीं तोंड दिलें. या बाबतींत दोन्ही पक्षात तीन वेळा युद्धप्रसंग झाले त्यापैकीं हा पहिला युद्धप्रसग होता.

**ब्रिटिशांशीं तह**—कॅन्टनवर तोफाचा मारा करण्यात आला. शाघाय काबीज करण्यात आलें. चिनी सरकार घाबरून गेलें व ब्रिटिशाशीं तह करण्यास तयार झालें. १८४२ सालीं नाङ्किङ् येथें दोन्ही पक्षांत तह झाला. परकीय राष्ट्रांशीं चीनचे सबध कशाप्रकारचे असावे याची भूमिकाच

जणू काय या तहानें ठरविण्यात आली. शाघाय घरून आणखीं पाच बंदरें ब्रिटिश व्यापाऱ्याना मोकळीं करण्यात आलीं. आयात व निर्यात मालावरील जकात पाच टक्क्यानें कमी करण्यात आली. ब्रि. नागरिकानीं काहीं गुन्हा केल्यास त्याची चौकशी ब्रिटिश वकिलातीमार्फत व ब्रि. कायद्याच्या आधारेंच झाली पाहिजे, असें ठरविण्यात आलें. चिनी व्यापारी गटाना ब्रिटिशाशीं व्यापार करण्याची दिलेली मक्तेदारी रद्द करण्यात आली. निरनिराळ्या शहराकडून घेण्यात यावयाची खडणी जमेस धरून शिवाय चिनी सरकारवर नुकसानभरपाईदाखल आणखी जबरदस्त खडणी लादण्यात आली. एक वर्षानीं १८४३ मध्ये ब्रिटिश व्यापारी तह म्हणून आणखी एक तहनामा करण्यात आला. मऊ सापडलें, लागले कोपराने खणायला ! या तहाने ब्रिटिशाचा वसाहत करण्याच्या हक्क मान्य करण्यात आला व त्याना राहण्याकरता बदरावर त्याची मालकीची जागा तोडून देण्यात आली.

ब्रिटिशाशीं अशा प्रकारचा तह झाल्याबरोबर अमेरिकेच्या पोटात दुखू लागले. ब्रिटिशापेक्षा अमेरिका अधिक सामर्थ्यसपन्न. बिटिशाप्रमाणे आपल्यालाही व्यापार व इतर बाबतींत हक्काच्या सवलती मिळाल्या पाहिजेत अशी तिनें मागणी केली. अमेरिकन सरकारने इतर व्यापारी सवलतीबरोबर अमेरिकन गुन्हेगाराची चौकशी अमेरिकन कायद्याप्रमाणें अमेरिकन वकिलामार्फत झाली पाहिजे, ही सवलत प्रथम मान्य करून घेतली या दोन्ही तहनाम्यात अफूच्या व्यापाराला कायदेशीर मान्यता देण्यात आली नाहीं. तथापि वरील गुन्हेगार चौकशीच्या जादा हक्कानीं जकातचोराच्या चौकशीच्या बाबतींत चिनी अधिकाऱ्याना ढवळाढवळ करण्यास प्रतिबध झाला. जकात-चोरी करणारे ब्रिटिश व्यापारी व त्याची चौकशी करणारे त्यांचेच भाईबंद. गुन्हेगार–चौकशीच्या जादा हक्काची सवलत या परकीय राष्ट्रानीं याच कामाकरता मागून घेतली होती. यामुळें अफूच्या व्यापाराला कायदेशीर मान्यता देण्यात आली नाहीं तरी अफू वगैरेच्या जकात चोरीला जणू काय मुभाच देण्यात आली.

वरील तहानीं ब्रिटिशानीं व अमेरिकनानीं आपल्याला हव्या त्या

सवलती मिळविल्या. ब्रिटिशांनीं तर चीनवर जबरदस्त खंडणी लादली. आणि अफूच्या जकात-चोरीलाही एका नाहीं दुसऱ्या मार्गानें मुभा मिळविली. चीनच्या संरक्षक तटबंदीला चांगलेंच भगदाड पाडलें. पण या आसुरी वृत्तीच्या साम्राज्यवाद्याचें एवढयानें समाधान झालें नाहीं.

**ब्रिटिशांची सैतानगिरी**—ज्या चिनी जनतेला तंबाखूदेखील माहीत नव्हती ती तंबाखू ओढण्याची चटक स्पॅनिश व्यापाऱ्यांनीं तिला लावली. त्यानंतर ब्रि. व्यापाऱ्यांनीं हें विषतुल्य व्यसन चिनी जनतेला लावलें. तंबाखू तर कांहींच नाहीं पण दारूपेक्षाही अफू ओढण्याचें व्यसन अधिक भयंकर. अफूबाज शरीरानें दिवसेंदिवस खंगत जातो, मेंदूवर हें व्यसन अत्यंत अनिष्ट परिणाम घडवून आणतें. विचारशक्ति नष्ट करतें, मनाला व बुद्धीला मारून टाकतें. मनुष्याला लोळा गोळा बनवितें. पशूच्या अवस्थेला तें त्याला पोंचवितें. असलें भयंकर व्यसन एकाद्या राष्ट्राला लावून देणें यापेक्षा अधिक दुष्ट सैतानगिरी दुसरी कोणती असणार ! हें सर्व कशासाठीं ? चीनची सर्वतोपरी पिळणूक करण्यासाठीं. चीनवर राज्य करीत असलेल्या परक्या सरकारच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन अफूनें झिंगवून सोडलेल्या चीनला गिळंकृत करण्याकरतां व त्याला गुलाम बनविण्याकरतां ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनीं हा राक्षसी उद्योग चालविला होता. पण चीनला ग्रासूं पाहणाऱ्या युरोपियन राष्ट्रांच्या आपसांतील चुरशीमुळें, इत्यादाव्यामुळें व खुद्द चिनी जनतेंत निर्माण झालेल्या क्रांतिकारक जागृतीमुळें युरोपियन राष्ट्रांच्या या साम्राज्यवादी धोरणाला यश आलें नाहीं. एकाद्या साबराच्या मागें अनेक शिकारी लागावे. त्याचें लुसलुशित मांस आपल्याला एकट्यालाच खावयास मिळावें म्हणून या शिकाऱ्यांत स्पर्धा लागावी व परस्परांचे डाव हाणून पाडण्याच्या नादांत साबरानें झुकांडी देऊन पोबारा करावा. चीनच्या बाबतींत युरोपियन राष्ट्रांना हाच अनुभव आला.

**अफूकरतां आणखी दोन युद्धें**—अफूच्या जकात चोरीचा व्यापार चालूच होता. बंगाल व माळवा प्रांतांत अफू पिकविण्याचा मक्ता ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें घेतला होता. हिंदुस्थानांत पिकविलेली अफू चीनमध्यें नेऊन विकण्याचा ब्रिटिश व्यापाऱ्याचा हा धंदा होता. हिंदुस्थानांतील हा

अफूचा व्यापार इतक्या मोठ्या प्रमाणावर चालू होता कीं, हिंदुस्थानच्या महसुलाचें दहाव्या हिस्स्याइतकें उत्पन्न या व्यापारावर अवलंबून होतें. १८५७ मध्यें अफूच्या जकात-चोरीच्या बाबतींत पुन्हा कटकट सुरू झाली व चिनी सरकार व युरोपियन राष्ट्रें यांच्यात दोन युद्धप्रसंग घडून आले. चिनी अधिकाऱ्यांनीं जकात चुकवून देशात अफू नेणारें एक जहाज पकडलें. ब्रिटिशाचें निशाण होतें तेव्हा गुन्हा-चौकशीच्या जादा हक्काच्या सदरात हा गुन्हा येतो असा ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं बहाणा केला व चिनी कोर्टांत या प्रकरणाची चौकशी करू देण्याचे नाकारलें. अफूच्या दुसऱ्या युद्ध-प्रसंगाला एवढें निमित्त बस्स झालें. या युद्धाची कटकट मिटती न मिटती तोंच पुन्हा एक तिसरी मोठी लढत या बाबतींत झाली. या तिसऱ्या युद्धात फ्रेंचांनीं ब्रिटिशांना साथ दिली व ब्रिटिश व फ्रेंच लष्करांनीं खुद्द राजधानीवरच हल्ला करून ती ताब्यात घेतली. राजधानीचें शहर पेकिंङ् ब्रिटिश लष्करानें लुटून फस्त केलें. बादशहाच्या वसत राजमहालात शिरून तेथले बहुमुल्य जडजवाहीर-ही लुटून नेले. बादशहा पेकिंङ सोडून पळून गेला. अर्थात् यानंतर दोन्ही पक्षात जो तह झाला त्यानें चीनच्या अपमानात आणखी भर टाकली. आणखीं नवीन बंदरें युरोपियन व्यापाऱ्यांना मोकळीं करून देण्यात आलीं. नुकसानभरपाईदाखल जबरदस्त खंडणीचें ओझें चीनवर लादण्यात आलें. ही खंडणी वसूल करण्याचा एक भाग म्हणून चीनच्या सर्व किनाऱ्यावरील जकात खातें ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या ताब्यात देण्यात आलें. "आठवड्यात रोजच्या रोज चिनी व्यापाऱ्यांना लुबाडीत राहा." चीनचे कस्टम खात्यावर दुसऱ्या खेपेस आलेला रॉबर्ट हार्ट याचे हे सूचक उद्गार होते. वरील तहानें परदेशीयांचा चीनमध्यें कोठेंहि प्रवास करण्याचा हक्क मान्य करण्यात आला. ख्रिस्ती धर्मप्रचाराला मंजूरी देण्यात आली. कॅथॉलिक पंथाच्या चर्चला जमीन विकत घेण्याचा हक्क देण्यात आला. परदेशातून मुदतबंद चिनी मजूर पाठविण्याच्या पद्धतीला कायदेशीर मान्यता देण्यात आली. परकीयांवर कोणी हात टाकला व त्यांच्या बाबतींत कोणी अत्याचार केला तर त्याला गुन्हेगार ठरवून शिक्षा किंवा दंड करण्यात येईल, असें ठरविण्यात आलें. युरोपियन राष्ट्रांच्या वकिलाती पेकिंङमध्यें स्थापण्यात

आल्या व स्वतंत्र परराष्ट्रीय खातें उघडण्याची पेकिंग् सरकारवर सक्ति करण्यात आली. रशिया, अमेरिका व जर्मनी या राष्ट्रानाही वरील हक्क देण्यात आले. १८६१ मध्यें चीनमध्यें परकीय स्वतंत्र वसाहत स्थापण्यात आली. चिनी सरकारची या वसाहतीवर कोणतीही सत्ता ठेवण्यात आली नाहीं व चिनी कायद्याचाही या वसाहतीशी संबंध ठेवण्यात आला नाहीं चीनमध्येंच पण चिनी सरकारपासून सर्वथैव स्वतंत्र अशी पहिली वसाहत निङ्पो येथें स्थापन झाली व ज्या राष्ट्रांना चीनशीं व्यापार करण्याचा हक्क प्राप्त झाला होता त्या सर्वांनीं आपल्याला सोयीस्कर अशा ठिकाणीं वसाहति प्रस्थापित केल्या, याप्रमाणें युरोपियन राष्ट्रांनीं चीनमध्ये चचूप्रवेश केला व आपली सत्ता चीनमध्यें वाढविण्याची संधी ते पाहूं लागले.

---

# दोन बंडें

**चिनी जनतेंत असंतोष**—अफूच्या बाबतीत झालेलीं दोन युद्धे, त्यात झालेला पराभव, यानंतर झालेल्या तहातून युरोपियन राष्ट्रांना द्याव्या लागलेल्या सवलती, त्याच्यावर लादण्यात आलेल्या खंडणीचें प्रचंड ओझें यामुळें मॅन्च्यू सरकारचें कंबरडेंच मोडलें. किनाऱ्यावरील जकातखातें परकीयाच्या हातात गेल्यामुळें महसुलाचें उत्पन्न मोठ्या प्रमाणात घटलें. आपली खंडणी वसूल करण्याकरता म्हणून हें खातें ब्रिटिशांनीं आपल्या ताब्यात घेतलें होतें, पण खंडणीची सर्व भरपाई या उत्पन्नातून करता येत नव्हती. शिवाय इतर राष्ट्रांना द्यावयाची नुकसानभरपाईची खंडणी कोठून आणावयाची? खजिन्यात पैसा नाहीं, परकीयाचा तर तगादा लागलेला, अशा परिस्थितींत सरकारी नोकरीच्या जागा लिलावात काढण्यात आल्या. जो कोणी ज्या नोकरीकरिता अधिका अधिकात पैसा देईल त्याला त्या त्या जागा बहाल करण्यांत येऊं लागल्या. दात कोरून थोडेंच पोट भरतें. पैसा उभारण्याची

आणखी एक युक्ति मॅन्च्यू सरकारनें काढली. देशात अंतर्गत चालू असलेल्या मालाच्या वाहतुकीवर भरमसाट कर लादण्यात आले. शेतकऱ्यावरील सारा वाढविण्यात आला व परकीयांची भर करण्याकरता प्रजेच्या पिळणुकीचे अनेक प्रकार अमलात आणले. सरकारी नोकऱ्याच्या लिलावामुळें तर शेतकऱ्याच्या गांजणुकीला पारावार राहिला नाहीं. सरकारला जास्तीत जास्त पैसे भरून नोकऱ्या मिळविल्यामुळें हे पैसे भरून काढण्याकरता सरकारी अधिकारी—मदारीन्—जमिनीवरील पट्टीशिवाय दुसरे मनाला वाटतील ते कर शेतकऱ्यावर बसवून त्याच्याकडून पैसे उकळू लागले. पैसे घेऊन अधिकाराच्या जागा खरेदी केल्यामुळें ठिकठिकाणचे हे मंदारीन् आपापल्या भागात सर्वाधिकारी बनले होते. पगाराशिवाय सरकारी कराच्या वसुलीपैकीं दहावा हिस्सा बक्षिसी म्हणून घेण्याचा मदारिनाना हक्कच होता. यामुळें सरकारी पट्टी जमिनींत पीक होवो न होवो शेतकऱ्याकडून निर्दयपणानें ते वसूल करीत. याशिवाय अनियंत्रित अधिकार हातीं असल्यामुळें शेतकऱ्यानीं पिकविलेल्या प्रत्येक जिनसावर ते आपला स्वतःचा हिस्सा म्हणून आणखीही कर वसूल करीत. यामुळें मदारिनाचा हा जाच शेतकऱ्याना असह्य झाला होता. देशातील अंतर्गत मालाच्या वाहतुकीवर भरमसाट जकाती लादल्यामुळें व्यापारी वर्ग गांजून गेला होता. विशेषतः थोड्याथोडक्या भांडवलावर धंदा करणारे छोटे व्यापारी तर या सरकारी जुलुमाला कंटाळून गेले होते. सरकारी नोकऱ्या पैसेवाल्यानाच मिळू लागल्यामुळें मध्यम वर्गात बेकारी वाढून तो असंतुष्ट झाला होता. अशा परिस्थितींत चीनमध्यें सर्वत्र शेतकऱ्याचीं लहानमोठीं बंडें झालीं. यापैकीं एका बंडाचा पुढारी हुड सुचु आन् नावाचा गरीब, साधा शिकलेला माणूस होता. ईश्वरी आदेशाप्रमाणें पृथ्वीवर तायपिङ तिन्कू (स्वर्गीय शांतिमय राज्य) चीनमध्यें प्रस्थापित करण्याकरता सर्वांनीं आपल्याला येऊन मिळावें, असें तो चिनी जनतेला सांगत होता.

**ताइपिङ्चें बंड**—ताइपिङ चळवळ हा या बंडापैकींच एक भाग होता. या चळवळींत गरीब शेतकरी व शेतमजूर मोठ्या संख्येनें सामील झाले होते. ही चळवळ चीनच्या दक्षिण भागात सुरू झाली व तिला लवकरच बंडाचें स्वरूप

प्राप्त झालें. मॅन्च्यू सरकार उलथून पाडण्याच्या उद्देशानें चीनमध्यें अनेक गुप्त मंडळें निर्माण झालीं होतीं व त्यानीं त्रिआद नावाचा आपला संघ निर्माण केला होता. हा संबंध संघ तायपिंड चळवळीला येऊन मिळाला. १८५२ मध्यें ताइपिंड बंडवाल्यानीं स्वतःचें लष्कर उभारलें. कांडसीहून उत्तरेकडे त्यानीं आपला मोर्चा वळविला व लवकरच यांडत्सी दरीच्या प्रदेशांत त्यानीं प्रवेश केला. १८५३ मध्ये या बंडवाल्यानीं नानकिंगवर हल्ला करून तें आपल्या कब्जांत घेतलें व त्याला आपल्या नव्या लोकराज्याची राजधानी बनविलें. मॅन्च्यू सरकार यावेळीं इतकें दुबळे बनलें होतें कीं, चीनच्या अठरा प्रांतापैकीं एकाही प्रांतावर त्याचा पूर्ण ताबा नव्हता. प्रांतावरचे सुभेदार त्या ठिकाणचे राजे होऊन बसले होते. ताइपिंड बंडवाल्यानीं या परिस्थितीचा चांगलाच फायदा घेतला. नानकिंगच्या भागात त्यानीं स्वतंत्र राज्य प्रस्थापित केलें व बहुतेक सर्व दक्षिण चीन ताइपिंड बंडवाल्यांच्या ताब्यात गेला. ताइपिंड बंडवाल्यानीं आपल्या ताब्यातल्या मुलखांत बऱ्याच सामाजिक सुधारणा घडवून आणल्या. मुलींचे पाय बांधण्याची रूढी त्यानीं कायद्यानें बंद केली. लहान मुलांवर व स्त्रीवर्गावर लादलेली गुलामगिरी नष्ट केली. वेश्याव्यवसाय व दुष्काळाचा जाच कमी करण्याकरितां त्यानीं खेड्यापाड्यातून सार्वजनिक धान्याचीं कोठारें उघडलीं. सरकारी कारभाराला आळा घातला. ताइपिंड राजवटींतील जमिनीच्या कायद्यात पुढील नमुनेदार कलम होतें. "शेतीचीं कामे करावयाचीं तीं सर्वांनीं मिळून करावी. जो तांदूळ पिकेल तो सर्वांनीं मिळून खावा. यामुळें प्रत्येकाला त्याचा त्याचा वाटा मिळेल. प्रत्येक कुटुंबानें तुतीचीं झाडें लावलींच पाहिजेत. पांच कोंबड्या व दोन डुकरें ठेवलीं पाहिजेत आणि त्यांची वाढ होत आहे कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. मळणीचे दिवस सुरू झाले कीं, ताइपिंडच्या तालुक्याच्या अधिकाऱ्यानें आपल्या भागातील लोकांना पुरेसें अन्न आहे कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. जास्त असलेलें धान्य सार्वजनिक कोठारात ठेवलें पाहिजे. म्हणजे सरकारला किती धान्य आहे, हें समजून येईल व प्रत्येकाला भरपूर अन्न व भरपूर वस्त्र मिळतें का नाहीं, हें पाहतां येईल."

परकीय लोकांशीं ताइपिंड बंडवाले जरी मित्रत्वानें वागत होते

तरी अफूच्या व्यापाराला त्यानीं आळा घातला व तो अजीबात बंद करण्याचा घाट घातला, हें पाहून युरोपियन वसाहतवाल्यांच्या डोळ्यात ताइपिंड बंडवाले सलू लागले. हे लोक चिनी जनतेत जागृति उत्पन्न करतील व तिला स्वत्वाची जाणीव करून देतील तर चीनमध्यें आपलें कांहीं चालायाचें नाहीं, अशीही भीतिही त्याना वाटू लागली. त्रिआदच्या गुप्त संघानें शांघाय येथें बंडाचा उठाव केला. चीनमध्यें आपले हातपाय पसरण्याकरता ब्रिटिशाना कांहीं तरी निमित्त पाहिजे होतें. त्यानीं तावडतोब तेथील चिनी सरकारचें जकात खातें आपल्या कब्जात घेतलें. शांघाय बंदर बंडवाल्यांच्या हातीं जाऊं नये म्हणून फ्रेंचानीं मॅन्च्यू सरकारच्या अधिकाऱ्याना मदत केली. १८६२ सालीं मॅन्च्यू सरकारने चीनच्या किनाऱ्यावरील सर्वच जकात खातीं ब्रिटिशांच्या स्वाधीन केलीं त्यावेळीं ताइपिंड बंडाचा बीमोड करण्यातच आपले हित आहे, असें ठरवून ब्रिटिशानीं जनरल गॉर्डनच्या हाताखालीं मोठें सैन्य दिलें व त्याला मॅन्च्यू सरकारच्या मदतीकरता पाठविलें व ताइपिंड बंडवाल्याचा धुव्वा उडविला. १८६४, मध्यें नाङ्‌किङ्‌चा पाडाव करण्यात आला. बंडवाल्या पुढाऱ्याना पकडून त्याना फाशी देण्यात आलें. ताइपिंड बंडाचा धुमाकूळ चिनमध्ये १२ वर्षे चालला होता. या बंडात मॅन्च्यू सरकारची आहुती पडणार असाही प्रसंग प्राप्त झाला होता. पण परकीयांच्या मदतीनें या बंडाचा नायनाट करण्यात आला. मॅन्च्यू सरकार आपल्या परकीय धार्जिण्या धोरणामुळें टिकून राहिलें. पण तें सर्वस्वी परावलंबी बनलें. खुद्द सरकारच आपल्या हातीं आल्यावर पाश्चात्य व्यापाऱ्यानीं चीनमध्यें चीनचा सर्व बाजार आपल्या मालांनीं भरून टाकला. देशातील लहान मोठे धंदे नष्ट झाले. खेड्यापाड्यातील सूत कातणारे व कोष्टी भिकेला लागले. ब्रिटिश व अमेरिकन भांडवलवाल्यानीं कापडाच्या गिरण्या ठिकठिकाणीं काढल्या व रेलवेच्या रस्त्यांचीही वाढ केली. देशाचा सर्व व्यापार पाश्चात्यांच्या हातीं गेला. देशातील सर्व उद्योग धंदेही पाश्चात्यांच्या हातीं गेले. जनतेची परिस्थिति अधिकच निकृष्ट झाली व चीनमधील असंतोष कळसाला पोंचला.

**बाक्सरांचें बंड**—मॅन्च्यू सरकार परकीय होतें व चीनमध्यें अप्रिय

झालेच होतें, पण त्याच्या मदतीला पाश्चात्य राष्ट्रें आलेलीं पाहून त्याच्याबद्दल पूर्वी अस्तित्वात असलेल्या द्वेषात अधिकच भर पडली. आपल्या दैन्याला व दारिद्र्याला मॅन्च्यू राजवटीपेक्षा पाश्चात्य गोऱ्या आसुरी लोकांचा लोभच अधिक कारणीभूत असून या लोकाचें वाढतें वर्चस्व नष्ट झाल्याशिवाय आपल्याला सुख लागावयाचें नाहीं, अशी चिनी जनतेची पक्की समजूत झाली आणि या भावनेतूनच ताइपिङ् बंडाच्या नाशानंतर थोड्याच वर्षांत १९०१ च्या सुमारास बॉक्सर बंडाचा उदय झाला. बॉक्सर लोकांचें हें बंड शेतकऱ्याचें बंड होतें. या बंडवाल्यांनीं देशांत सर्वत्र पसरलेल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या व व्यापारी एजंटांच्या सरसहा कत्तली केल्या. परकीयाबद्दल वाटणाऱ्या संतापाच्या आवेशात गोऱ्या लोकांच्या बायकामुलांचाही संहार करण्यास कमी केले नाहीं. युरोपियन लोकांविरुद्ध झालेल्या या जनतेच्या उठावाचा फायदा घेण्याचें मॅन्च्यू सरकारनें ठरविलें व या बंडवाल्यांना पाठिंबाही दिला. पण आयत्या वेळीं स्वीकारलेल्या या पगडीफिरवू धोरणाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. युरोपियन राष्ट्रांनीं आपल्याविरुद्ध उठलेल्या या वादळाचा एकजुटीनें प्रतिकार केला. बॉक्सर बंडाचा त्यांनीं नायनाट केलाच पण त्याबरोबर मॅन्च्यू सरकारलाही त्यांनीं दे माय धरणी ठाय, करून सोडले आणि यानंतर झालेल्या तहात चीनवर नुकसानभरपाईदाखल आणखी जबरदस्त खंडणी लादली. ६७,५००,००० पौंड इतक्या अवाढव्य, आजवर इतिहासात नमूद न झालेल्या रकमेची ही खंडणी होती. या खंडणीखेरीज ती 'तीन स्तीन-पेकिंड, रेलवेच्या संरक्षणाकरता आपलें लष्कर ठेवण्याचा हक्क त्यांनीं संपादन केला. त्याचप्रमाणें खुद्द पेकिंडमध्येंही आपली एक लष्करी पलटण ब्रिटिशांनीं ठेवून दिली बॉक्सर बंड याप्रमाणें मोडण्यात आलें तरी चीनमध्यें परकीयाविरुद्ध उत्पन्न झालेल्या बंडखोर वृत्तीचा बीमोड मॅन्च्यू सरकार व त्याच्या मदतीस धावून आलेलीं परकीय साम्राज्यवादी राष्ट्रें करू शकलीं नाहींत. या बंडखोरवृत्तीनें देशभर क्रांतीचें व्यापक स्वरूप धारण केलें. तिने मॅन्च्यू सरकारचा प्रथम ग्रास घेतला व नंतर सर्व क्रांतिकारक पक्षांनीं एकजुटीची आघाडी निर्माण करून चीनचा ग्रास करू पाहणाऱ्या साम्राज्यवादी राष्ट्रांना व जपानलाही चिकाटीनें व यशस्वी रीतीनें तोंड दिलें.

---

# क्रांति

**औद्योगीकरणाला सुरवात**—एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून चिनी जनतेतील गुलामी व सोशिक वृत्ति नष्ट होऊन बडाची प्रवृत्ति वाढीस लागली व चिनी मनोवृत्तींत क्रांतीचा प्रादुर्भाव होत चालला. त्याच प्रमाणें भौतिक दृष्टयाही याच कालात चीनच्या परिस्थितींत हळू हळू बदल होत चालला होता. चीनमध्यें १८६० त अर्वाचीन धंद्याला प्रथम सुरवात झाली. मॅन्च्यू सरकारच्या आश्रयाखालीं काहीं ठिकाणीं लोकरींच्या कापडाच्या गिरण्या निघाल्या व एक अर्वाचीन शस्त्रास्त्रें व दारूगोळा तयार करण्याचाही कारखाना काढण्यात आला. पुढल्या १०।१५ वर्षांत चिनी मालकीचे बाष्पनौका बांधण्याचे कारखाने निघाले. या कामाकरता चिनी भांडवलदार एकत्र होऊन त्यांनीं आपल्या स्वतंत्र कंपन्या स्थापन केल्या. कायलिंङ् येथें १८७८मध्ये कोळशाच्या खाणी खोदण्याचे काम सूरू झालें. या खाणी चिनी मालकीच्या होत्या तरी त्यात ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं बरेंचसें भांडवल गुंतविलें होतें. चिनी मालकीची पहिली सूत कातण्याची गिरणी १८९० मध्यें निघाली. याच सुमारास झालेल्या चिनी–जपानी युद्धानंतर परकीय राष्ट्रांनीं मॅंच्यू सरकारकडून चीनमध्यें कारखाने काढण्याचा परवाना मिळविला. त्याबरोबर जपानी व ब्रिटिश भांडवलदारांनीं चीनमध्यें कापडाच्या गिरण्या उभ्या केल्या. अर्वाचीन यंत्रसामुग्रीने युक्त असलेले कारखाने काढण्याच्या व त्याच्या जोडीला बँका स्थापन करण्याच्या चिनी भांडवलवाल्याच्या प्रयत्नाला यामुळें चांगलाच अडथळा उत्पन्न झाला. मॅन्च्यू सरकारच्या दुबळेपणामुळें व स्वार्थी वृत्तीमुळें परकीयांचें चांगलेंच फावलें. देशात ठिकठिकाणीं त्यांनीं आपल्या कंपन्या काढल्या व बँकाही स्थापित केल्या. चिनी उद्योगधंदेवाल्याना कर्ज मिळेनासें झालें. देशातील माल–वहातुकीवर परकीय व्यापाऱ्याना सोयीस्कर असेच जकातीचे दर तहानें रूढ झाल्यामुळें चिनी मालकीच्या उद्योगधंद्याना व

व्यापाराला मोठाच धक्का बसला. पण या सर्व प्रतिकूल परिस्थितीमुळें चिनी भांडवलदार नामोहरम झाले नाहींत. आपले उद्योगधंदे उभारण्याचे प्रयत्न त्यांनीं तसेंच जोरानें चालू ठेवले. देशातल्या सरकारच्या मदतीनें परकीयांनीं चालविलेल्या प्रचंड आक्रमणाला विरोध करीत असतानाच चिनी भांडवलवाल्यांनीं व व्यापाऱ्यांनीं आज अस्तित्वात असलेली प्रख्यात चिनी बँक (Bank of China) प्रस्थापित केली व चीनच्या औद्योगीकरणाच्या प्रयत्नाला खळ पडूं दिला नाहीं. परक्या मॅन्च्यू सरकारच्या एकतंत्री राजवटीनें लादलेल्या गुलामगिरींतून चीनची मुक्तता करावयाची असेल, मॅन्च्यू सरकारच्या मदतीनें पाश्चात्य साम्राज्यवादी राष्ट्रांनीं चालविलेल्या सर्व प्रकारच्या आक्रमणापासून चीनला वाचवावयाचें असेल, जगातील स्वतंत्र राष्ट्रांच्या पंक्तीला चीनला बसवावयाचें असेल, चीनला पूर्वीचें वैभव प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर प्रथम मॅन्च्यू राजवटीचा निःपात केला पाहिजे, पाश्चात्य साम्राज्यवाद्यांच्या पकडींतून चीनला सोडविलें पाहिजे, पाश्चात्य धर्तीवर चीनचें औद्योगीकरण झालें पाहिजे, पाश्चात्य शास्त्रीय ज्ञानाचा चीनमध्यें प्रसार झाला पाहिजे, जुन्याची आवड व इष्ट मार्गें सारून नव्या प्रगतिकारक समाज सुधारणांचा स्वीकार केला पाहिजे व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे एकतंत्री राज्यसत्तात्मक पद्धति नष्ट करून त्या ठिकाणीं जनतेनें निर्माण केलेली, जनतेने चालविलेली व जनतेच्या हिताकरता अस्तित्वात असलेली शुद्ध, निर्दोष, लोकशाही चीनमध्ये प्रस्थापित झाली पाहिजे, याची जाणीव चीनमधील मध्यम वर्गाला झपाट्यानें होत चालली होती व हें लोकशाहीचें लोण क्रांतिकारक पुढाऱ्यांनीं जनतेपर्यंत पोचाविले होतें. परकीय मॅन्च्यू सरकार पाश्चात्य राष्ट्रांच्या मदतीनें चीनवरील आपली सत्ता टिकवू पाहात होतें तर चिनी मध्यम वर्गांतील क्रांतिकारक पुढारी व विद्यार्थी गुप्त रीतीनें या दोन्ही परकीय सत्ता उलथून पाडण्याकरिता जनतेची संघटना करीत होते.

**क्रांतीचीं गुप्त मंडळें**—या चळवळीच्या दिवसातच हजारो चिनी विद्यार्थी चीनमधून जपान व अमेरिका येथील शिक्षणसंस्थांतून पाश्चात्य शास्त्रीय ज्ञानाचा अभ्यास करण्याकरिता दरसाल जात होते व परत स्वदेशात येताना पाश्चात्य लोकशाहीचें तत्त्वज्ञानही बरोबर आणीत होते. या विद्या-

थ्यांनीं त्या त्या देशातून चिनी क्रांतिकारक गुप्तमंडळे स्थापलीं होतीं. आणि गंमतीची गोष्ट ही कीं, मॅन्च्यू सरकारच्या शिष्यवृत्त्या घेऊन परदेशात गेलेले विद्यार्थी त्या सरकारविरुद्ध रचलेल्या गुप्त कटात सामील होत होते. चीन-मधून परदेशात व्यापाराकरिता जाऊन राहिलेले चिनी व्यापारी देशातील क्रांतिकारकाना सढळ हातानें मदत करू लागले होते. परदेशातून शिक्षण घेऊन परत आलेले विद्यार्थी देशातल्या कारखान्यात नोकऱ्या मिळवीत, सरकारी नोकऱ्या तर त्याला मिळतच असत पण हे विद्यार्थी कोठेंही असले तरी क्रांतीची संघटना करण्याचें आपले कार्य चालू ठेवीत होते. शेकडो तरुण विद्यार्थी व विद्यार्थिनी शिक्षण प्रसाराच्या निमित्तानें खेड्यापाड्यातून शिरून शेतकऱ्याना क्रांतीचे धडे देत होते. १९ व्या शतकाच्या अखेरचीं २० वर्षे व विसाव्या शतकाच्या आरंभीचीं दहा वर्षे हा काल चीनमधील क्रांतीच्या तयारीचा काल होता. डॉ. सन्यत्सेन याच्या नेतृत्वाखालींच चीन-मध्यें ही क्रांतीची चळवळ चालू होती. डॉ. सन्यत्सेननें केवळ लोकशाही-करताच चीनमध्यें क्रांति घडवून आणली नाहीं तर ही लोकशाही जनतेची पिळणूक नाहींशीं करून तिचें जीवन सुखी करणारी अशी व्हावी अशा समाजवादी उच्च ध्येयानें प्रेरित होऊन त्यानें या क्रांतीच्या चळवळीला हात घातला होता.

**डॉ. सन्यत्सेन**—या क्रांतिकारक थोर पुरुषाचा जन्म दक्षिण चीन-मधील एका खेड्यातील गरीब शेतकरी कुटुंबात झाला. परकीय सत्तेविरूद्ध व पर कीय आक्रमणाविरूद्ध देशात सर्वत्र चळवळी चालू असताना व दहा वर्षे चालू असलेल्या ताइपिङ् बंडाचे पडसाद देशातील खेड्यापाड्यातून घुमत असताना डॉ. सन्यत्सेन लहानाचा मोठा झाला. सरकारी अधिकाऱ्यानीं शेत-कऱ्यावर चालविलेला जुलूम, त्यामुळें होणारी शेतकऱ्याची उपासमार व त्याची अज्ञानदशा बालपणीं आपल्या डोळयानीं त्यानें पाहिली होती. सर-कारी जुलुमामुळें प्रत्यक्ष तो राहत असलेल्या खेड्यावर व त्याच्या कुटुंबावर आलेल्या आपत्ति त्यानें अनुभवल्या होत्या. ख्रिस्ती मिशनऱ्याच्या शाळातून व कॉलेजांतून त्याचें शिक्षण झालें. हे मिशनरी उदारमतवादी होते. हिंदु-स्थानातील मिशनऱ्याप्रमाणें ते ब्रिटिश साम्राज्यवाद्याचे हस्तक नव्हते.

हायस्कूलचें शिक्षण चालू असतानाच तो खिश्चन झाला. चिनी समाजाची सनातनी वृत्ति, जुनें राखून ठेवण्याचा त्याचा हट्ट, त्याची अंधश्रद्धा व मूर्तिपूजेवरील विश्वास, या सर्व गोष्टी चीनच्या प्रगतीला अडथळा करीत आहेत, असें पाहून त्यानें या गोष्टींवरच प्रथम हल्ला केला व आपल्या एका तरुण खिश्चन मित्रासह आपल्या जन्मभूमीभोंवतालच्या खेड्यापाड्यातून त्यानें चिनी समाजाच्या पुरातनी वृत्तीविरुद्ध व अंधश्रद्धेविरुद्ध प्रचार केला. डॉ. सन्यत्सेननें हायस्कूलचें व कॉलेजचे उच्च शिक्षण पुरें केलें. चिकाटीनें अभ्यास करून तो एक चागला डॉक्टरही झाला. पण त्याच्या ठिकाणच्या स्वाभाविक क्रातिप्रवण वृत्तीमुळें इतर उपजीविकेच्या धद्यात न पडता क्रातिसघटनेच्या कार्यालाच त्यानें वाहून घेतले. चिनी वैभवेच्छु संघ, कृत्तप्रतिज्ञमातृ संघ वगैरे अनेक राजकीय गुप्त सघ त्यानें प्रस्थापित केले. कॅन्टनसारख्या एकाद्या शहरावर हल्ला करून त्यावर ताबा मिळवायचा व त्याच्या जोरावर देशात सर्वत्र पसरलेल्या वरील गुप्त सघाच्या शाखातर्फे देशात सर्वत्र बडाचे उठाव करावयाचे, हा त्याचा क्रातीचा कार्यक्रम होता. डॉ. सन्यत्सेननें अशा प्रकारचा पहिला क्रातीचा प्रयत्न १८९८ मध्ये कॅन्टन येथें केला. पण तो यशस्वी झाला नाहीं. यानंतर मध्यंतरीं चार वर्षें गेल्यानतर त्यानें आणखी आठ क्रातीचे प्रयत्न केले. पण तेही अयशस्वी ठरले. पण यामुळें तो मुळींच नामोहरम झाला नाहीं. क्रातीच्या या प्रत्येक अयशस्वी प्रयत्नानंतर डॉ. सन्यत्सेनचें बळ वाढतच चाललें. त्याच्यावरील चिनी जनतेचा व मध्यम वर्गाचा विश्वास कमी न होता आधिकच वाढला. या क्राति—सघटनेच्या कालात डॉ. सन्यत्सेननें युरोपात व अमेरिकेंत तीन सफरी केल्या. या प्रत्येक सफरींत त्यानें क्रातीकरता लागणारा पैसा त्या त्या प्रदेशातल्या चिनी व्यापाऱ्याकडून व श्रीमंत चिनी नागरिकाकडून मिळविला. परदेशातले चिनी व्यापारी व श्रीमंत चिनी नागरिक डॉ. सन्यत्सेनला सढळ हातानें मदत करीत होते इतकेंच नाहीं तर या देशातून राहिलेले चिनी कामगारही आपली लहान मोठी मिळकत त्याच्या स्वाधीन करीत होते. परदेशातील या सफरींत एकदा तो लंडनला असतां तेथील चिनी वकिलातीनें सन्यत्सेनला गफलतीनें पळवून नेऊन

आपल्या वकिलातीच्या इमारतींत कैदेंत ठेवले. पण मॅन्च्यु सरकारविरुद्ध असलेल्या बंडखोराला फाशावर चढविण्याचा सरकारचा प्रयत्न सफल झाला नाहीं. डॉ. सन्यत्सेनच्या इंग्लंडमधील मित्रानीं मोठ्या शिताफीने त्यांची सुटका करून घेतली. मॅन्च्यु सरकारच्या या प्रयत्नामुळे डॉ. सन्यत्सेनची कीर्ती व सामर्थ्य अधिकच वाढलें. सन्यत्सेनच्या हालचाली व त्यानें चालविलेलें क्रांतिसंघटनेचे काम मॅन्च्यू सरकारला इतके असह्य झालें कीं, त्यानें सन्यत्सेनला पकडून देणारास ७००० पौंडाचें बक्षिस जाहीर केलें. हें बक्षिस शिरावर असतानाही सन्यत्सेन परदेशात व स्वदेशातही अनेक वेष व अनेक नावें धारण करून फिरत होता व एक समयावच्छेदेंकरून सर्वत्र क्रांतीचे उठाव करण्याची तयारी त्याने चालविली होती. सन्यत्सेन व त्याचे साथीदार याप्रमाणें गुप्तपणें क्रांतीची तयारी करीत होते तर त्याबरोबरच देशातील सनदशीर चळवळही जोरानें चालू होती. १९०५ सालीं अमेरिकन मालावरील बहिष्काराची चळवळ सर्व देशभर इतकैया मोठ्या प्रमाणावर पसरली कीं, १९०८ सालीं अमेरिकेनें चिनी जनतेचा आपल्यावरील रोष कमी व्हावा म्हणून बॉक्सर बंडानंतर चीनवर लादलेल्या नुकसानभरपाईच्या आपल्या वाटणीच्या रकमेपैकीं निम्मी रक्कम चीनला माफ केली. जपानी मालावरील बहिष्काराची चळवळ तर देशात चालूच होती. परदेशातून आलेल्या चिनी विद्यार्थ्यानीं व विद्यार्थिनींनीं या चळवळींत भाग घेतला होता. मॅन्च्यू-सरकारची परकीयधार्जिणी वृत्ति उघडकीस आणणें, या सरकारच्या अधिकाऱ्यानीं शेतकऱ्यावर चालविलेल्या अनान्वित जुलमाचा निषेध करणे वरील गोष्टीकरता सर्वत्र शहराशहरातून सभा भरविणे, निषेधप्रदर्शक मिरवणुका काढणे, वगैरे चळवळीही देशातील तरुण वर्गाने जोमाने चालविल्या होत्या आणि त्यामुळें अर्थातच क्रांतीच्या गुप्त संघटनेला मदत होत होती. देशात चालू असलेल्या या गुप्त व उघड चळवळीमुळें मॅन्च्यू-सरकार घाबरून गेलें व त्यानें राज्यकारभारात कांहीं सुधारणा करण्याचें जाहीर केलें. चीनमधील क्रांतिकारकाना राज्यकारभारातील सुधारणा नको होत्या. परकीय मॅन्च्यू सरकारचें समूळ उच्चाटण करणारी क्रांति त्याना करावयाची होती. परकीय पाश्चात्य राष्ट्रांचें चीनवर चालू असलेलें आक्रमण

नष्ट करून चीनमधून त्याना हाकून लावण्याइतकी प्रबल सत्ता त्याना संपादन करावयाची होती. देशात सुरू झालेली क्रांतीची चळवळ मध्यंतरीं श्वास घेण्यास तयार नव्हती. मॅन्च्यू दरबारचें मनही इतकें नाजूक व दुर्बल झालें होतें कीं, त्यानें सुचविलेल्या राजकीय सुधारणासुद्धा अखेर क्रांतीलाच कारणीभूत होत असतील, असें त्याला वाटलें व या सुधारणा दसरांतच पडून राहिल्या, इतकेंच नव्हे तर या सुधारणा सुचविणाऱ्या सुधारणावादी पुढाऱ्याना पकडून मॅन्च्यू दरबारनें त्याना फासावर लटकावले. क्रांतीला ही परिस्थिति अनुकूल अशीच होती व तिचा फायदा घेऊन १९०५ ते १९०९ पर्यंत एका मागून एक क्रांतीचे उठाव झाले या ना त्या कारणानें हे उठाव अयशस्वी ठरले तरी १९११ सालच्या क्रांतीच्या उठावानें सर्व दक्षिण चीन व्यापून टाकला. हँकौ, कॅंटन, शांघाय, नान्किङ वगैरे शहरें एकामागून एक क्रांतिकारकाच्या ताब्यात गेलीं व चीनमधील बहुतेक प्रांतातील क्रांतिकारक गुप्तमंडळानीं पूर्वयोजनेंप्रमाणें उठाव करून मॅन्च्यूसरकारच्या सुभेदाराना हाकून लावलें व सर्व प्रदेश आपल्या कबजात आणला. डॉ. सन्यत्सेन या वेळीं अमेरिकेंत होता. क्रांतीनंतर निर्माण झालेल्या चिनी लोकसत्ताक सरकारनें डॉ सन्यत्सेनला क्रांतीची ही बातमी कळवून त्याच्या इच्छाचें चिनी लोकसत्ताक राज्याचें अध्यक्षपद स्वीकारण्याकरता स्वदेशी येण्याबद्दल निमंत्रण पाठविलें. डॉ. सन्यत्सेन या निमंत्रणामुळें ताबडतोब चीनला परत आला नाहीं. तो इंग्लंडला गेला. चीनमध्यें झालेल्या क्रांतीला टिकवून धरण्याकरता एक महत्वाचें काम त्याला त्या ठिकाणीं करावयाचें होतें.

चीनमध्यें क्रांति झाली. मॅन्च्यू बादशहाला राज्यत्याग करण्याचा प्रसंग आला. चीनवर कबजा करू पाहणाऱ्या परकीय साम्राज्यवाद्याना ही गोष्ट सहन होणें कसे शक्य होते ? विशेषतः ब्रिटिश साम्राज्यवाद्याना तर ही उलथापालथ मुळींच आवडली नाहीं. पैशाची जरूर ती मदत मिळाल्यास आपलें लष्करी सामर्थ्य सावरून धरता येईल व क्रांतिकारकाचा काटा काढता येईल, असें मॅन्च्यू सरकारला व त्याच्या साथीदाराना अद्यापि वाटत होतें. याकरता ब्रिटिश भांडवलदाराकडून जरूर ते पैसे मिळविण्याच्या

उद्योगाला तें लागले होतें. अमेरिकेंत असताना डॉ. सन्यत्सेनला या कार-वाईचा सुगावा लागला व तो चीनमधील क्रांतीची बातमी कळताच या कारस्थानाचा बंदोबस्त करण्याकरता प्रथम इंग्लंडकडे धावून गेला आणि लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, सन्यत्सेनला या कामीं पूर्ण यश आलें. पाश्चात्य राष्ट्रांच्या संयुक्त राष्ट्र बॅंकेने* मॅन्च्युसरकारला कर्ज देण्याचें नाकारलें. चीनमध्यें क्रांति होऊन मॅन्च्यु सरकारचीच उचलबांगडी होण्याची वेळ आली होती अशा वेळीं त्याला कर्ज कोण देणार ?

**यूआन शी काई**—इंग्लंडमधील ही कामगिरी बजावून सन्यत्सेन चीनला परत आला व लोकशाहीचें अध्यक्षपद त्यानें स्वीकारलें. चीनमधील क्रांति स्थिर होण्यास उत्तर व दक्षिण चीनचें ऐक्य साधणे व क्रांतीविरोधी सुभेदाराचें सामर्थ्य पूर्णपणें नष्ट करणे जरूर होतें. याकरता पेकिंङ् सरकारचा मुख्य सेनापति यूआन शी कायी याचीच मदत घेण्याचें त्यानें ठरविलें. लोकशाहीची शिस्त आपण पाळू, क्रांतीशीं आपण बेइमान होणार नाहीं, असें यूआन शी कायीनें आश्वासन दिल्यामुळें सन्यत्सेननें अध्यक्षपदाचा राजीनामा दिला व आपल्या साथीदाराच्या समतीनें यूआन शी कायीला अध्यक्षपद देण्यात आलें.

अखेर यूआन शी कायी आपल्या स्वभावावर गेला. मॅन्च्यू घराण्याची सत्ता नेस्तनाबूद झाली होती. तेव्हा त्याठिकाणीं आपल्या घराण्याची सत्ता सर्व चीनवर प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा त्याच्या मनात उत्पन्न झाली. आश्चर्य हें कीं, ब्रिटिशानीं या कामीं यूआन शी कायीला मदत करण्याचें ठरविलें. सयुक्त राष्ट्र बॅंकेच्या सभासदापैकीं अमेरिका विरुद्ध असताही ब्रिटिशानीं १५०,००,००० पौंडाचें कर्ज यूआन शी कायीला दिलें.

यूआन शी कायी सन्यत्सेनच्या कुओमिन्ताङ् पक्षापासून फुटून निघाला व स्वतःचें घराणें चीनवर सत्ताधिष्ठित करण्याच्या आकांक्षेला बळी पडला या गोष्टी-

* चीनला कर्ज देण्याच्या बाबतींत इंग्लंड, फ्रान्स, रशिया, अमेरिका वगैरे राष्ट्रांनीं एक संयुक्त बॅंक स्थापली होती. आपसातील स्पर्धेचा हा परिणाम होता.

चा फायदा घेण्याचें जपाननें ठरविले. यूआनला आपल्या हातातील बाहुले बनविण्याची योग्य वेळ आहे, हें जाणून जपानने पहिलें महायुद्ध ऐन रंगात असताना आपल्या एकवीस मागण्या यूआन शी कायीकडे पाठविल्या. वर सांगितल्याप्रमाणें राजकीय व आर्थिक दृष्टया चीनला जपानच्या अंकित बनविणाऱ्या अशाच या मागण्या होत्या. शान्तुङ्‌मध्यें जर्मनीला जे हक्क मंच्यू सरकारने बहाल केले होते ते आपल्याला मिळावे. दक्षिण मॅन्च्यूरिआ आपल्या नियंत्रणाखालीं घ्यावा, तेथल्या जमीनी खंडानें देण्याचा आपला हक्क मान्य करण्यात यावा अंतर मांगोलियात घुसण्याची मोकळीक द्यावी, फूकीन प्रांतातील राजकारभारात खास हक्क देण्यात यावे, चीनमधील लोखंड व पोलादाच्या कारखान्यावर आपलें नियंत्रण असावें, तसेंच वूहान्‌मधील कारखानेहि आपल्या ताब्यात द्यावे, चिनी सरकारने नेमलेल्या सर्व परकीय सल्लागारावर आपलें नियंत्रण असावें, या सल्लागाराच्या हालचाली आपल्या देखरेखीखालीं चालाव्या, अशीही मागणी जपाननें केली होती. पण अमेरिकेच्या दडपणामुळे जपानचें या बाबतींत कांहीच चाललें नाहीं. पण ही मागणी खेरीज करून यूआन शी कायीनें जपानच्या इतर सर्व मागण्या कबूल केल्या.

मॅन्च्यू सरकारनें चीनवरील आपली सत्ता कायम राखण्याकरता परकीय आक्रमणाखालीं आपली मान वाकविली त्याप्रमाणें यूआन शी कायीनें आपल्या घराण्याची सत्ता चीनवर प्रस्थापित करण्याच्या आकांक्षेनें चीनला परकीयांना विकून टाकण्याचाच जणू घाट घातलेला पाहून चीनमध्यें यूआन शी कायीच्या राजवटीविरुद्ध सर्वत्र उठाव झाले. खुद्द पेकिंगच्या राजवाड्यावरच हजारो विद्यार्थी व विद्यार्थीनींनीं मोर्चा नेला. विद्यार्थ्यांच्या या जमावावर सरकारी पोलिसानीं बंदुकांच्या फेरी झाडल्या व शेंकडो विद्यार्थ्यांचे मुडदे पाडले व सर्वत्र अशीच दडपशाही करून चीनमध्यें उठलेली ही दुसऱ्या क्रांतीची वावटळ शमविण्याचा युआननें प्रयत्न केला. या प्रयत्नात त्याला यश आलें नाहीं. युआनचे साथीदारच त्याच्याविरुद्ध उठले. सरकारी लष्करातील पुष्कळ अधिकारी क्रांतिकारकांना जाऊन मिळाले. या सर्व परिस्थितीमुळें तो घाबरून गेला व याच धक्कयानें जणू काय १९१६

साली युआन शी कायीचा अंत झाला. यूआनच्या मरणानें चीनमध्यें स्थापन झालेल्या लोकशाहीवरील गडांतर टळलें. लोकशाहीच्या घटनेनुसार उपाध्यक्ष ली यास अध्यक्षपद देण्यात आलें, सन्यत्सेन व त्याचे साथीदार पुन्हा राष्ट्ररचनेच्या कार्यास लागले. दक्षिण चीनमध्यें क्रांतिकारकांचा जितका जम बसला होता तितका उत्तर चीनमध्यें अर्थात्च नव्हता. एक दोन वर्षांत जपानधार्जिण्या व यूआनच्या हाताखालीं काम केलेल्या सुभेदारांनीं आपला गट तयार करून पुन्हा उचल खाली. दुष्ट यूआननें परकीयांच्या पैशाच्या बळावर उभारलेल्या भाडोत्री लष्कराचा त्यांनीं उपयोग करून घेतला, उत्तर चीनमध्यें गोंधळ उडवून खुद्द पेकिंगवरही हल्ला चढविला. अध्यक्ष ली व पार्लमेंटचे सभासद आपली धडगत नाहीं असें पाहून कॅन्टनला पळून आले. डॉ. सन्यत्सेननें दक्षिण व उत्तर चीन यांचा सांधा साधण्याकरता म्हणून यूआन शी कायी याचें साहाय्य घेण्याचा प्रयत्न केला होता. पण त्याचा असा परिणाम झाला. हें राष्ट्रैक्य साध्य तर झालेंच नाहीं उलट आणखी घोंटाळा उत्पन्न होऊन जपानला या प्रदेशात हस्तक्षेप करण्यास संधी मिळाली. कुओमिन्तांगनें पुन्हा आपल्या ताकदीची जमवाजमव करून डॉ. सन्यत्सेनला चिनी लोकशाहीचा कायमचा अध्यक्ष निवडलें. उत्तरेकडील पेकिंग सरकार सुभेदारांच्या हातीं गेलें होते आणि दक्षिणेकडील नान्किंग सरकारची सत्ताही त्याच्या भोंवतालच्या क्वांगतुंग प्रांतावरही पुरेशी नव्हती. नान्किंग सरकारला आपलें स्वतंत्र खडें लष्कर उभे करण्याचीही ताकद नव्हती. अशा बिकट परिस्थितींतही संघटित व जागृत जनतेच्या विश्वासावर त्यानें आपला लोकशाहीचा कारभार चालविला होता.

**सोव्हिएट रशियाशीं दोस्ती**—योगायोग असा कीं, याच सुमारास जगाच्या बाजारात चिनी लोकशाहीचें वजन वाढविणारी एक घटना घडून आली. रशियाच्या झार सरकारनें विषमतेच्या पायावर चीनशीं केलेले सर्व तह नाशाबित केले असल्याचें रशियाच्या सोव्हिएट सरकारनें जाहीर केलें. हे तह रद्द करण्याच्या वाटाघाटी १९१७ च्या डिसेंबरात सुरू झाल्या होत्या. पण चीनचे रशियाशीं अशा रीतीनें मैत्रीचे संबंध जुळत जाणें, परकीय साम्राज्यवादी राष्ट्रांना इष्ट वाटलें नाहीं. आशियातील चीन-

सारखें मोठें राष्ट्र सोव्हिएट सरकारच्या तत्रानें वागू लागलें तर जगातील साम्राज्यावादावर एक मोठीच आपत्ति कोसळणार, हें लक्षात घेऊन या मैत्रीच्या संबधात विघ्न उपस्थित करण्याचें त्यानीं ठरविलें व १९१८ च्या मार्चमध्यें जपाननें व दोस्त राष्ट्रांनीं पेकिङ् सरकारला मास्कोहून आपला वकील परत बोलविण्यास व सोव्हिएट सरकारशीं संबंध तोडण्यास भाग पाडलें. हीं साम्राज्यवादी राष्ट्रें एवढयावरच थांबलीं नाहींत तर बॉक्सर खंडणीपैकीं झार सरकारचा भाग सोव्हिएट सरकारशीं फुटून वागणाऱ्या श्वेत रशियाला देण्यात यावा, अशीही सक्ती पेकिङ् सरकारवर केली. पण नान्किङ् सरकारनें व सोव्हिएट सरकारनें जपान वगैरे साम्राज्यवादी राष्ट्रांच्या विघ्न-संतोषी धोरणाला भीक घातली नाहीं. सोव्हिएट सरकारनें नान्किङ्च्या चिनी लोकशाही सरकारलाच मान्यता दिली, वाटाघाटी तशाच चालू ठेवल्या व चीनशीं झालेल्या विषमतामूलक तहाच्या बाबतींत आपला निर्णय जाहीर केला. या निर्णयातील पहिलें कलम पुढीलप्रमाणे होतें. "रशियन सोशालिस्ट फेडरेटेड सोव्हिएट रिपब्लिक सरकार असें जाहीर करतें कीं, पूर्वीच्या रशियाच्या सरकारनें चीनशीं जे तह केले ते सर्व रद्द करण्यात येत आहेत. चीनचा जो मुलूख खालसा करण्यात आला तो परत देण्यात येत आहे. चीनमध्यें ज्या सवलति पूर्वीच्या रशियाच्या सरकारनें मिळविल्या त्याचा विनामोबदला कायमचा त्याग करण्यात येत आहे. झार सरकारनें किंवा रशियातील भांडवलवाल्यांनीं चीनपासून जें जें जबरदस्तीनें हबकावलें तें सर्व परत देण्यात येत आहे. सोव्हिएट सरकारनें केलेला हा निर्णय प्रत्यक्ष अमलात येण्यास यापुढें एक दोन वर्षें लागलीं. बॉक्सर खंडणीचा रशियाचा हिस्सा चीनमधील शिक्षण प्रसाराकरता देण्यात आला. झार सरकारनें आपल्या ताब्यात घेतलेल्या चायनीज ईस्टर्न रेल्वेचा कारभार सोव्हिएट सरकार व चीनचें लोकशाही सरकार या दोघांनीं मिळून संगनमतानें करावा, असें ठरविण्यात आलें.

**चिनी कामगार**—सोव्हिएट सरकारनें जाहीर केलेल्या या निर्णयाची बातमी दडपून टाकण्याचा प्रयत्न जपाननें व दोस्त राष्ट्रांनीं केला पण ती थोडीच छपून राहते. ही बातमी सर्वत्र पसरल्याबरोबर चिनी लोकशाहीचा दर्जा

वाढला व तिला युरोपमध्यें एक चागला दोस्तही मिळाला. व्हर्सायच्या तहा-च्या वेळीं पेकिंङ्–नान्किङ या सरकारतर्फे पाठविलेल्या प्रतिनिधींनीं शान्तुङ् जपानला देण्याच्या बाबतींत आपली समति दिली नाहीं. पण पेकिङ् दरबारी असलेल्या जपानधार्जिण्या प्रधानाना ही गोष्ट आवडली नाहीं. जपानला शान्तुङ् देण्यात यावे, असे या प्रधानाचें मत होतें ही गोष्ट ज्यावेळीं बाहेर आली त्यावेळीं चीनमध्यें सर्वत्र या प्रधानाचा निषेध करण्यात आला. पेकिंङ्मधील शिक्षणसंस्थातून शिकत असलेल्या पधरा हजार विद्यार्थ्यांनीं सरकारी ऑफिसावर हल्ले चढविले व या जपानधर्जिण्या प्रधानाना कामावरून काढून टाकण्याची मागणी केली.

चीनमध्यें यावेळीं दक्षिणेत एक व उत्तरेंत एक अशीं दोन सरकारे नादत होतीं. उत्तर व दक्षिण चीन याचा साधा जमवून राष्ट्रैक्य साधण्याचा सन्यत्सेनचा प्रयत्न यशस्वी झालेला नव्हता तरी चीनमध्यें सर्वत्र राष्ट्रीय चळवळीला ऊत आलेला होता. आपण एका राष्ट्राचे सतान आहो, आपल्या राष्ट्राला जगामध्यें मानाचें स्थान मिळालें पाहिजे, या भावना चिनी तरुण मनातून उचबळत होत्या आणि महत्त्वाची गोष्ट ही कीं, या राष्ट्रीय चळव-ळींत विद्यार्थ्यांप्रमाणें चीनमधील कामगारवर्गही सामील झाला होता. चीनचें औद्योगीकरण अद्याप व्हावें तसें झालेलें नव्हतें. तथापि पाश्चात्य भाडवलदारानीं ठिकठिकाणीं जे स्वतत्र कारखाने काढले होते व काहीं ठिकाणीं परकीय व स्वकीय भाडवलवाल्यानीं संगनमतानें जे कारखाने उघ-डले होते त्यातील कामगार वर्ग देशाच्या राजकारणाकडे झपाट्यानें ओढला जात होता.

चीनमधील पहिली ट्रेड युनियन हाँङकाँङ् येथें १९१५ मध्यें स्थापन झाली. चीनमध्यें नव्यानें पुढें येणाऱ्या कामगार वर्गाची ही पहिलीच सस्था होती. विशेष हें कीं, त्याच सालच्या जून महिन्यात जपानी मालावरील बहिष्काराची चळवळ शिगेला पोंचली त्यावेळीं या चळवळींत चिनी विद्या-र्थ्यांबरोबर कामगार वर्गही सामील झाला होता. हाँङकाँङमध्यें एक हजार विद्यार्थ्यांना या चळवळींत सामील झाल्याबद्दल अटक करण्यात आली त्यावेळीं चिनी विद्यार्थिनींनीं त्याच्या जागा भरून काढल्या या गोष्टीचा

कामगाराच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. जपानी मालावर सार्वत्रिक बहिष्कार पुकारण्यात आला आणि या बहिष्काराची वावटळ सर्व देशभर हा हा म्हणता पसरली. शांघाय येथील जपानी व इतर परदेशीयांच्या गिरण्यातील कामगारांनी संप केला. यानंतर पेकिंग व सिंडतै येथील जपानी गिरण्यातील कामगारही संपावर गेले. देशात सर्वत्र सुरू झालेल्या या संपाचा इतका परिणाम झाला की, पेकिंग दरबारच्या तीन जपानधार्जिण्या प्रधानांना आपल्या जागाचे राजीनामे देणे भाग पडले व व्हर्सायला गेलेल्या चिनी प्रतिनिधींचे हात बळकट झाले. हा बहिष्कार इतका जबर होता की, व्हर्सायच्या तहातील कलमाचा पुन्हा विचार करण्याची तयारी खुद्द जपानी सरकारनें दाखविली. शान्तुङच्या बाबतींतील निर्णय रद्द करण्यात आला पाहिजे, यात कोणत्याही प्रकारची तडजोड नको, या निश्चयापासून चिनी जनता मागे ढळली नाहीं.

चीनमध्यें उद्योगधंदे वाढत चालले त्याबरोबर कामगार वर्गही अस्तित्वात आला. १९१६ अखेर कारखान्यात काम करणाऱ्या कामगारांची संख्या दहा लाख होती. १९२२ मध्ये ती दुप्पट झाली. युरोपातील पश्चिम आघाडीवर या ना त्या निमित्ताने दोन लाख चिनी कामगार गेले होते. त्या ठिकाणीं असताना ते थोडेसे लिहायला व वाचायला शिकले. महत्वाची गोष्ट ही कीं, या ठिकाणीं युरोपियन कामगाराशीं त्याचा संबंध आला. युरोपियन कामगाराची राहणी किती उच्च दर्जाची असते हें त्यानीं पाहिलें. आपली राहणी सुधारून घेण्याकरता युरोपियन कामगारांनीं कसे लढे केले हेंही त्याना त्या ठिकाणीं ऐकावयास मिळाले. परत स्वदेशात येताना कामगार लढ्याच्या नव्या कल्पनाही ते आपल्याबरोबर घेऊन आले. युरोपियन राष्ट्रे युद्धात गुतलीं असताना आपलें राष्ट्र स्वतंत्र करण्याच्या कल्पनाही त्याच्या मनात आल्या. परत येताना जपानी बंदरावर उतरण्याचें त्यानीं नाकारलें. १९१९ च्या मेमध्यें चीनमध्यें सर्वत्र संपाचे वारे सुरू झाले त्यावेळीं युद्धाच्या आघाडीवर परत आलेल्या या कामगाराना 'तुफानी कामगार' असें संबोधलें जात होतें. वर्गजागृत झालेल्या या हजारो कामगारांनीं सर्व धंद्यातील कामगाराची संघटना करण्याची महत्वाची कामगिरी केली. कामगाराचा

लढा केवळ आर्थिक लढा नसून तो राजकीय लढा आहे, ही महत्वाची शिकवण या तरुण कामगारानीं आपल्या भाईना दिली.

पण चीनमधील कामगार चळवळीला राजकीय संपापासूनच सुरुवात झाली व ती यापुढे सारखी वाढत गेली. १९१९ च्या अखेरीस कॅन्टनमध्यें वीसापेक्षा जास्त व शांघायमध्यें पन्नासावर कामगार संघ स्थापन झाले होते. संघातील सभासदांची संख्या थोडी होती तरी कामगार वर्गाचें पुढारीपण चालविण्यास ती पुरेशी होती. १९२० सालीं चीनमध्यें पहिला मे दिन साजरा करण्यात आला. १९२१ त शांघाय मध्यवर्ती कामगार संघ संघटित करण्यात आला. १९२२ मध्ये हाँडकाँड येथील नाविक कामगारानीं संप केला व तो यशस्वी रीतीनें लढविला. हाँडकाँडमधील सर्वच कामगारानीं सहानुभूतीचा सार्वत्रिक संप करून नाविक कामगारांच्या मागण्याना पाठिंबा दिला. याच वर्षी कॅन्टन येथें चिनी राष्ट्रीय कामगार परिषद झाली. कामगारात वाढत चाललेली ही जागृति भांडवलवाल्याना अर्थातूच सहन झाली नाहीं. सरकारच्या मदतीनें कामगारांची संघटना मोडून टाकण्याचाही त्यानीं प्रयत्न केला. याच सुमारास रेल्वेवरील कामगारानीं सार्वत्रिक संप पुकारला. कामगारांच्या जमावावर बंदुकांच्या फेरी झाडण्यात आल्या. संप यशस्वी झाला नाहीं तरी कामगारातील असंतोष मात्र वाढीला लागला व या दडपशाहीनें कामगाराना अधिकच संघटित केलें.

**वॉशिंग्टन परिषद**—व्हर्साय तहाबाबत उत्पन्न झालेली भानगड अद्याप मिटलेली नव्हती. चीन व सैबेरियामध्यें हात पाय पसरण्याची जपानची महत्वाकांक्षा अनावर होत चालली होती. जपानच्या या आक्रमणानें अमेरिकेचें चितस्वास्थ्य बिघडवून टाकले होतें. इंग्लंड व जपान यांच्यात वाढत चाललेलें सहकार्यही अमेरिकेला असह्य होत चाललें होतें. तेव्हा जपानच्या आक्रमणाला आळा घालण्याकरता व इंग्लंड-जपानच्या सहकार्यात विघ्न उत्पन्न करण्याकरता अमेरिकेनें व्हर्सायच्या तहाला मंजूरी देण्याचें नाकारलें व १९२१ मध्ये वॉशिंग्टन येथें परिषद बोलावली. जपानी मालावरील बहिष्काराची चळवळ चीनमध्यें याचवेळीं जोरात चालू होती. सैबेरिया हस्तगत करण्याकरिता जपाननें पाठविलेल्या

सैन्याचे सारखे पराभव होते. जपाननें व श्वेत रशियनांनी * बाह्य मंगोलियात स्थापन केलेली पुतळी सरकारे उलथून टाकण्यात आलीं होतीं. अशा परिस्थितींत अमेरिकेनेंही व्हर्सायतहावर सही करण्याचें नाकारलें हें पाहून जपानी सरकार नरम आलें. त्यानें आपला पवित्रा बदलला व शान्तुङ्, उत्तर मॅन्च्यूरिया व सैबेरिया या प्रांतातून आपलीं सैन्यें परत बोलावलीं. अँग्लो-जपानी दोस्तीचाही अंत झाला. वॉशिंग्टन परिषदेंत ५ : ५ : ३ या प्रमाणात अमेरिका, इग्लंड व जपान यांचीं आरमारी दलें ठेवण्यात यावीं, असें ठरलें. चीनचें सार्वभौमत्व, त्याचें स्वातंत्र्य, त्याचें प्रादेशिक अखंडत्व व त्याची राज्यकारभारविषयक नेकी यांना मान्यता द्यावी, चीनमधील सरकारला स्थैर्य प्राप्त होईल, आपला कारभार चोख व परिणामकारक रीतीनें त्याला करता येईल, अशी संधी देण्यात यावी, या कामात कोणाकडूनही मुळींच अडथळा होता कामा नये, अशी खबरदारी घ्यावी. चीनमधील सर्व प्रांतातून सर्व राष्ट्रांना व्यापार करण्याची व उद्योग धंदे उभारण्याची सारखी संधी देण्यात यावी व या तत्त्वाची अमलबजावणी करण्याच्या हेतूनें आपलें वजन खर्ची घालावें. खास हक्क मिळविण्याची खटपट एकादें राष्ट्र करील तर त्याला प्रतिबंध करावा, ही गोष्टही या नव राष्ट्र करारात मान्य करण्यात आली तरी पूर्वीचे विषमतामूलक तह, खंडण्या, जकात व मीठ यांच्यावरील नियंत्रणें अद्याप कायमच होतीं. दक्षिण मॅन्च्यूरियात जपाननें जे नवे खास हक्क संपादन केले होते त्याचा उपभोग घेण्यास त्याला मोकळीक ठेवण्यात आली, चीनला शान्तुङ् परत दिल्याबद्दलचा मोबदला म्हणून १४०,००,००० सोन्याचे येन चीननें जपायला द्यावयाचे होते ते निराळेच. वॉशिंग्टन परिषद झाली, नवराष्ट्र करार झाला. पण चीनला यापासून व्हावा तसा फायदा झाला नाहीं. जो

* मंगोलियन क्रांतिकारक पक्षाच्या नेतृत्वाखालीं बाह्य मंगोलियातील जनतेनें लोकसत्ताक स्वराज्य १९२४ मध्ये प्रस्थापित केलें. सोव्हिएट यूनियनच्या लगत असलेलें रशियातील हें लोकसत्ताक राष्ट्र प्रगतिपथावर झपाट्यानें पावलें टाकीत आहे. या राष्ट्रानें १९३६ मध्यें सोव्हिएट यूनियनबरोबर परस्पर संरक्षक तहही केला आहे.

काय फायदा झाला तो एवढाच कीं, चीनचा नैतिक दर्जा वाढला व चिनी जनतेचा आत्मविश्वासही वाढला.

**ऐक्याचा प्रयत्न**—उत्तर चीनमधील सुभेदाराचे प्रस्थ मोडून उत्तर व दक्षिण यांचें एकीकरण करण्यास ही परिस्थिति अनुकूल आहे, असें पाहून कुओमिन्ताङ् पक्षाने डॉ. सन्यत्सेनच्या नेतृत्वाखालीं उत्तरेवर मोहीम करण्याची तयारी केली. नान्किङ सरकारनें या मोहिमेकरता नव्या लष्कराची उभारणी केली. हें भाडोत्री लष्कर अखेर भाडोत्रीच ठरलें. चीनच्या एकीकरणाच्या मार्गे असलेली राष्ट्रीय भावना त्याच्यात कोठून असणार ? मॅन्च्यू सरकारच्या भाडोत्री लष्कराचीच ही एक आवृत्ति होती. या लष्कराचे अधिकारीही कमी दर्जाचे होते. ऐनवेळीं यातले कांहीं अधिकारी शत्रुपक्षाला जाऊन मिळाले. यामुळें डॉ. सन्यत्सेनच्या चीनच्या एकीकरणाच्या प्रयत्नाला अपयश आलें. शत्रुपक्षाला जाऊन मिळालेल्या विश्वासघातकी अधिकाऱ्यांपैकीं एकानें खुद्द कॅन्टनवरच हल्ला चढविला. सन्यत्सेनच्या निवासस्थानावर कबजा करून त्याला त्यानें आग लावून दिली. सन्यत्सेन मोठ्या शिताफीनें वाचला. त्याला परदेश पहावा लागला. कुओमिन्ताङ्-पक्षानें पुन्हा दुसऱ्या वर्षी सैन्याची जमवाजमव करून कॅन्टन ताब्यात घेतलें. या सैन्याचे नेतृत्व चिआङ्ग काय़ी शेकनें स्वीकारले होतें. उत्तर चीनवरील मोहीम यशस्वी झाली नाहीं, चीनचें एकीकरण साधलें नाहीं तर उलट लोकसत्ताक राज्यावरच गंडातर आलें. पण या संकटातून तें सही-सलामत बाहेर पडलें. डॉ. सन्यत्सेन परदेशातून परत आला. पुन्हा स्थिर-स्थावर करण्यात आलें. आणि महत्त्वाची गोष्ट ही कीं, चीनच्या राष्ट्रीय आंदोलनाला व त्याच्या पुनरुज्जीवनाला या संकटामुळें एक मोठी कला-टणीच मिळाली.

**कम्यूनिस्ट पक्षाची स्थापना**—चीनच्या या वेळच्या इतिहासातील आणखी एक महत्वाची गोष्ट म्हणजे १९२१ सालीं चीनमध्यें कम्यूनिस्ट पक्षाची प्रस्थापना झाली. चीनमधील या नव्या पक्षानें शहरातील कामगार संघटित केले होते व त्याना वर्गजागृतही केले होते. या पक्षातील सभासदांची संख्या आरंभीं अर्थातच अल्प होती पण हे सर्व सभासद अत्यंत

उत्साही व चिकाटीचे होते. किसान सघटनेच्या कामालाही या पक्षानें सुरुवात केली होती. कामगार सघटनेपेक्षा किसान सघटनेचें काम अधिक अवघड. किसानाच्या परिस्थितीशीं या पक्षातील लोक पहिल्यादा एकरूप होऊ शकले नाहींत त्यामुळें किसान सघटनेच्या कामात काहीं दोषही उत्पन्न झाले, पण या कामाचा जसजसा अनुभव येत चालला तसतसे हे दोष लोपत चालले. चीनचें औद्योगीकरण अद्यापि व्हावें तसें झालें नव्हतें. कामगार वर्ग नुकताच कोठें निर्माण होऊं पहात होता. चीनमधील प्रचड बहुजनसमाज शेतकऱ्याचाच होता. चीनमध्यें लोकशाही क्राति झाली खरी, पण ही क्राति स्थिर करण्याकरता राष्ट्राचें योजनाबद्ध पुनरुज्जीवन घडवून आणण्याकरता व परकीय आक्रमणाला प्रतिकार करण्याचें सामर्थ्य राष्ट्रात निर्माण करण्याकरता वर्गजागृतीच्या तत्वावर चिनी जनतेची संघटना करणें जरूरीचें होतें. चीनमधील कम्युनिस्ट पक्ष हें काम करीत होता. कम्युनिस्टाचा कार्यक्रम नेहमींच जनताभिमुख व आकर्षक असतो यामुळें चीनमधील कम्युनिस्ट पक्षात देशातील मध्यमवर्गाचे तरुण विद्यार्थी व विद्यार्थिनी या पक्षात सामील होऊ लागल्या होत्या.

**सोव्हिएट लष्करी तज्ज्ञ**—उत्तरेकडील मोहिमेंत चिनी क्रातिकारकाना हार खावी लागली व १९२४ सालीं समाजवादाकडे झुकणाऱ्या चिनी लोकसत्तावाद्याना दबकावणी दाखविण्याकरताच जणू काय ब्रिटिश, फ्रेंच अमेरिकन, जपानी, पोर्तुगीज, इटालियन वगैरे साम्राज्यवादी राष्ट्रांनीं कॅन्टनच्या बदरात लढाऊ जहाजें नागरून आपल्या प्रचड सामर्थ्याचें निदर्शन केलें. १९१७ च्या रशियन क्रातीनंतर सोव्हिएट यूनियनचा निःपात करण्याकरता साम्राज्यवादी राष्ट्रांनीं जग जंग पछाडलें पण रशियन क्रातिकारकानीं साम्राज्यवाद्याच्या या प्रयत्नाला दाद दिली नाहीं. याप्रमाणें सोव्हिएट यूनियनच्या जनतेच्या सामर्थ्यापुढें साम्राज्यवाद्याना हार खावी लागली, हें उदाहरण चिनी क्रातिकारकाच्या डोळ्यापुढें अगदी ताजें होतें यामुळे साम्राज्यवाद्याच्या या दबकावणीच्या निदर्शनामुळें नामोहरम न होता कुओमिन्ताङ पक्षानें अगदीं नवीन धर्तीवर जनतेची प्रतिकारक्षम संघटना करण्याचें व जनतेचें लष्कर उभारण्याचें ठरविलें. अर्वाचीन युद्धसामुग्रीनें युक्त व अर्वाचीन युद्ध-

पद्धतीला अनुसरून चिनी लष्कर उभारावयाचें असल्यास परकीय युद्धशास्त्र-विशारदाची मदत व सल्ला घेणें जरूरीचें आहे, ही गोष्ट कुओमिन्ताङ्च्या पुढाऱ्याच्या लक्षात आली होती. डॉ. सन्यत्सेननें १९२३ सालीं आपला मित्र मॉरिस कोहन यास कानडा व अमेरिका या देशातून लष्करी तज्ज्ञ आणण्याकरता पाठविलें होतें. कोहनच्या प्रयत्नाला यश आलें होतें व या देशातील बरेच अर्वाचीन युद्धशास्त्र-विशारद चिनी सरकारच्या लष्करात काम करण्यासही तयार झाले होते. पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, कानडा व अमेरिकन सरकारानीं म्हणजे ब्रिटिश व अमेरिकन साम्राज्यवादी सर-कारानीं या लष्करी तज्ज्ञाना चीनमध्यें जाण्यास मनाई केली. ही मनाई झाली नसती तर चीनच्या लष्करी इतिहासाला निराळेंच वळण लागलें असतें. कोणी सागावें, लोकशाहीच्या बुरख्याखालीं साम्राज्यवादाच्या व लष्करी बाण्याच्या तत्वावर चिनी लष्कराचीही उभारणी झाली असती. पण तसें व्हावयाचें नव्हतें. ब्रिटिश व अमेरिकन साम्राज्यवादी सरकारानीं चीनमध्ये आपल्या लष्करी तज्ज्ञाना येऊ दिलें नाहीं, हे एका दृष्टीनें बरेंच झालें. कानडा व अमेरिका या बाबतींत आपल्याला मदत करावयाला व सल्ला द्यावयाला तयार नाहींत, असें पाहताच चिनी क्रांतिकारकाची दृष्टि साहजिकच सोव्हिएट यूनियनकडे वळली. १९१७ पासून अगदीं सुसंगतपणें चीनच्या लोकसत्ताक क्रांतीबद्दल सो. युनियननें सहानुभूति व्यक्त केली होती. यामुळें डॉ. सन्यत्सेन व त्याचे साथीदार याना त्याच्या-बद्दल आदर वाटू लागला होता. लष्कर उभारण्याच्या बाबतींत लोकसत्ताक चीनला मदत करण्याचे व त्याला योग्य तो सल्ला देण्याचें सोव्हिएट यूनि-यननें तावडतोब कबूल केलें. बरेच सोव्हिएट लष्करी तज्ज्ञ अधिकारी चीनला जावयास तयार झाले व खासगी व्यक्ति या नात्यानें ते कॅन्टनला येऊन दाखल झाले. वीमार जर्मनींतून देखील कांहीं वैमानिक तज्ज्ञ व शिक्षक चीनला आले. कुओमिन्ताङ पक्षाच्या कार्यक्रमाच्या बाबतींत सल्ला मसलत देण्याकरता डॉ. सन्यत्सेननें बोरोदिनला सोव्हिएट यूनियनमधून बोलावून घेतलें. सन्यत्सेन एवढे करूनच थांबला नाहीं. त्यानें आपला विश्वासू साथीदार चिआङ कायी शेक यास सोव्हिएट यूनियनमध्यें लष्करी शिक्षण

घेण्यास पाठविलें. चिआङ काय शेक सोव्हिएट युनियनमध्यें चार महिने होता. लष्करी वृत्तीच्या चिआङनें तेथील पद्धतीनुसार लष्करी शिक्षण सपादन केलें.

# कुओमिन्ताङ

**पुनर्घटना**—राष्ट्रीयत्व, लोकशाही व लोकोप जीवन या तीन तत्वावर डॉ. सन्यत्सेननें क्रातीचा कार्यक्रम आखलेला होता. या तीन तत्वांपैकीं राष्ट्रीयत्वाला पोषक असें राष्ट्रैक्य अद्याप चीनमध्ये साध्य झालेलें नव्हतें. तेव्हा क्रातीचा हा कार्यक्रम पार पाडण्याकरता कुओमिन्ताङची पुनर्घटना करण्याचें सन्यत्सेननें ठरविलें व १९२४ मध्यें या पक्षाची पुनर्घटना परिषद भरविली. परिस्थिति दिवसेंदिवस अधिकाधिक हलाखीची होत चालली आहे. लहान लहान व्यापाऱ्याना दिवाळी काढण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे. लहान प्रमाणावर चाललेले हात धदे बुडाले असून या धद्यातील कामगार बेकार व उडाणटप्पू बनले आहेत. करवाढीला व महागाईला कंटाळून शेतकरी आपल्या जमीनी करण्यास असमर्थ झाला असून वाटेल त्या हलक्या किंमतीला तो त्या विकून टाकीत आहे. ही परिस्थिति नाहींशी करून राष्ट्रीय क्राति यशस्वी करावयाची असेल तर शेतकऱ्यानीं व कामगारानीं कुओमिन्ताङ् पक्षात सामील झाले पाहिजे. शेतकरी–कामकरी राष्ट्रीय पक्षात सामिल होतील तर चीनच्या राष्ट्रीय पुनर्घटनेचें कार्य पार पडणें शक्य आहे, असे परिषदेच्या जाहीर निमंत्रण पत्रकात नमूद करण्यात ,आलें होतें. परिषदेच्या पुनर्घटनेचा विचार करण्यात आला आणि तिचें सभासदत्व सर्वसामान्य जनतेला मोकळे ठेवण्यात

आलें. कुओमिन्ताङ पक्षाची घटना ठरविण्यात आली. पक्षाच्या वेळो-वेळीं भरणाऱ्या कॉंग्रेसचे प्रतिनिधी सभासदांनीं निवडावें, या प्रतिनिधींनीं मध्यवर्ती कार्यकारी मंडळाचे सभासद निवडावे व या कार्यकारी मंडळानें पक्षाचें कार्य सतत चालू ठेवावे, असें ठरविण्यात आलें. पक्षाचें दैनंदिन काम करण्याकरता मध्यवर्ती कार्यकारी मंडळानें नऊ सभासदाचें आणखी एक छोटें मंडळ निवडावें, या मंडळानें राष्ट्रीय सरकारच्या कार्यकारी मंडळाची निवड करावी, हें सरकारी कार्यकारी मंडळ केवळ एकाच पक्षाचें होऊं नये म्हणून पक्षाबाहेरचे लोकही या मंडळात निवडण्याची मोकळीक ठेवण्यात यावी, भाडोत्री लष्कर उभारण्याची पद्धति नाशाबित करण्यात यावी. राष्ट्रीयत्व, लोकशाही व लोकोपजीवन या तीन तत्त्वानुसार राजकीय शिक्षण घेतलेल्या स्वयंसेवकाचें राष्ट्रीय लष्कर उभारण्यात यावें व त्याकरता व्हापोआ लष्करी कॉलेज प्रस्थापित करण्यात यावें. चीनच्या इतिहासात ही गोष्ट अपूर्व होती. चीनच्या इतिहासातच काय सोव्हिएट यूनियनखेरीज जगातील इतर राष्ट्रांच्या इतिहासातही अशा प्रकारची गोष्ट अपूर्व होती. कुओमिन्ताङ्नें लष्कर उभारण्याचें वरील उदात्त धोरण स्वीकारलें खरें पण तें त्याला फार दिवस टिकवून धरता आलें नाहीं. सन्यत्सेनच्या तीन तत्त्वापैकीं लोकोपजीवनाच्या समाजवादी तत्वाची जाणीव झालेले सैनिक भाडवलदारी वृत्तीच्या चिआङ् कायी शेकला जाचक होऊ लागले व राष्ट्रीय स्वयंसैनिकाची पद्धति हळू हळू बदलून वरिष्ठ अधिकाऱ्याच्या हुकुमाना शिस्तीच्या नावाखालीं अंधळेपणानें मानणारें भाडोत्री लष्कर त्यानें उभे केलें. कम्यूनिस्ट पक्षानें आत्मरक्षणाकरता स्वतःच्या लष्कराची उभारणी करण्यात सुरुवात केली त्यावेळीं कुओमिन्टाङचा या बाबतींतला निर्णय मात्र तंतोतंत पाळला म्हणूनच जपानसारख्या बलाढ्य राष्ट्राच्या चढाईला तोंड देण्यास तो समर्थ झाला.

**तीन तत्वें--( सन मीन चू आय )** १९२४ च्या कुओमिन्ताङ् पक्षाच्या कार्यक्रमात ज्या तीन तत्वाचा थोडक्यात उल्लेख करण्यात आला त्याचें स्वरूप पुढील प्रमाणें होतें — ( १ ) लोकवंशाचें किंवा राष्ट्रीयत्वाचें तत्व —ःनिसर्ग शक्तीच्या द्वारा वंशाचा विकास झालेला आहे निसर्ग शक्ति

ही एक राजरीत - (वाङ्गतू–Royal way) आहे. या राजरीतीने घडविलेले गट म्हणजे वंश, राष्ट्र होय. वंशाची व राष्ट्राची घडण करणाऱ्या निसर्ग शक्ति म्हणजे सामान्य रक्त, उपजीविका, भाषा, धर्म, चाली रीती, सवई या होत. राष्ट्रीयत्व ही अशी एक बहुमूल्य दौलत आहे कीं, जी शासनसंस्थेच्या मनात प्रगतीची उमेद उत्पन्न करते आणि आपलें अस्तित्व शाश्वत राखण्याच्या कामीं समर्थ करते.

( २ ) लोकाचें सार्वभौमत्व अथवा लोकशाहीः—कोणत्याही एकीकृत व संघटित मनुष्याच्या मेळाव्याला " लोक " असे म्हणतात. सार्वभौमत्व म्हणजे काय ? राज्याच्या क्षेत्रावर असलेली सत्ता व ताकद म्हणजेच सार्वभौमत्व. जेव्हा " लोक " व " सार्वभौमत्व " याचा साधा एकत्र जुळविला जातो तेव्हाच लोकाची राजकीय सत्ता निर्माण होते. हें सरकार म्हणजे लोकांनीं निर्माण केलेली संस्था आहे. लोकाच्या नियंत्रणाखालीं ती असते व लोकाकडून त्याचा कारभार चालविला जातो. सर्व लोकाच्या हिताकरता त्याच्या कारभारावर नियंत्रण ठेवलेलें असतें आणि ज्या ठिकाणीं लोकाच्या नियंत्रणाखालीं सरकार असतें त्या नियंत्रणाला " लोकाचें सार्वभौमत्व " असें म्हणतात.

( ३ ) लोकाची उपजीविका अथवा समाजवादः—लोकाची उपजीविका समाजाचें कल्याण आणि जनतेचे जीवन हें तत्व सूचित करते. उपजीविकेच्या तत्वाच्या अमलबजावणीनें अखिल जनतेच्या उदरपोषणाचा प्रश्न सोडविला जातो. उपजीविका चालविण्याकरता केलेला प्रयत्न सामाजिक प्रगतीच्या नियमाशीं सुसंगत आहे. इतिहासातील ती मध्यवर्ती शक्ति आहे. उदरपोषणाचा सवाल, लोकाच्या उपजीविकेचा सवाल आहे. लोकोपजीवनात सुधारणा करण्याकरता पुढील दोन तत्वाची अमलबजावणी करवयास पाहिजे ( अ ) जमीनींच्या मालकी हक्कात समानता व ( ब भांडवलाचें नियमन.

**कुओमिन्ताङचा जाहीरनामा**—वरील तीन तत्वानुसार १९२४ च्या कुओमिन्ताङच्या कार्यक्रमात पुढील बाबींचा समावेश करण्यात आला होता. जमिनीची समान वाटणी, मोठ्या व लोकोपयोगी उद्योगधंद्याचें

राष्ट्रीयकरण, सरकारी मालकीच्या भांडवलाला उत्तेजन, विषमतामूलक तह रद्द करणें, भाषणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, किसान संघाची व कामगार संघाची संघटना, चीनमधील सर्व राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचा हक्क. चीनमध्यें अनेक प्रकारचे लोक आहेत. मंगोल, तिबेटियन, तुर्कीमुसलमान असे राष्ट्र-गट आहेत. मंगोलिया व तिबेट हे अगदीं स्वतंत्र राष्ट्रगट आहेत. सिन्किआङ् मध्यें दोन तृतीयांश लोक चीनेतर आहेत. कान्सू व शान्सी प्रांतांत होयान लोकांचा मोठा राष्ट्रगट आहे. नैऋत्य भागांत ताई, मियाव, लोलो, माऊ असेही लहान लहान गट आहेत. चीनमधील राष्ट्रगट विचारांत घेऊनच राष्ट्रीय स्वयंनिर्णयाच्या हक्काचा समावेश पक्षाच्या कार्यक्रमांत करण्यांत आला होता. याशिवाय सार्वत्रिक मतदानाचा हक्क, सर्व बाबतींत स्त्रीपुरुषांचे समान हक्क आणि सार्वत्रिक शिक्षण प्रसाराचा जोराचा प्रयत्न वगैरे बाबीहि या कार्यक्रमांत घालण्यांत आल्या होत्या. कुओमिन्ताङ् आतां व्यापारी, कारखानदार व बुद्धिजीवी यांचा ढिला गट राहिलेला नव्हता. राष्ट्रीय क्रांतिकारक चळवळीचें मार्गदर्शन करणारा असा तो एक जनतेचा पक्ष बनला होता. लष्करी सत्तेच्या पुरस्कर्त्यांना थारा न देणें, खंड कमी करणें, जनतेला लोकशाहीचे विस्तृत हक्क देणें व लोकशाही तत्वावर जनतेची संघटना करणें, या तांबडतोबीच्या कार्यक्रमाचा समावेश २३ जानेवारी १९२४ च्या पक्षाच्या जाहीरनाम्यांत करण्यांत आला होता. आम जनतेच्या प्रगमनशील संघटनेवरच वरील कार्यक्रमाची अमल-बजावणी होणें शक्य होतें. चिनी कम्यूनिस्ट पक्षानें या बाबतींत कुओ-मिन्ताङ् पक्षाला पूर्ण पाठिंबा देण्याचें जाहीर केलें होतें. १९२४ च्या ऑगस्टमधील परिषदेंत कम्यूनिस्टांना व्यक्ति या नात्यानें कुओमिन्ताङ्चे सभासद होण्याची व निवडणुकीच्या वेळीं पक्षाच्या सर्व जागांकरितां उमे-दवार म्हणून उभे राहण्याची परवानगी देण्यांत आली. कम्यूनिस्ट पक्षाचें योग्य धोरण व वाढतें वजन लक्षांत घेऊनच डॉ. सन्यत्सेननें कम्यूनि-स्टांना कुओमिन्ताङचे सभासद होण्याची मोकळीक दिली होती कम्युनिस्ट पक्षाच्या स्वतंत्र अस्तित्वाला या परवानगीमुळें मुळींच धक्का बसला नाहीं. ‘ वेगवेगळ्या मार्गांनें पण एकजुट होऊन प्रहार करा ’ ही कम्यूनिस्टांची

घोषणा होती. राष्ट्रीय चळवळींतील कार्यकर्त्यांचे अलग अलग हितसंबंध लक्षात घेता अशा प्रकारच्या स्वतंत्र संघटनेची जरूरी होती. त्याचप्रमाणें क्रांतीच्या काळांत चिनी भांडवलवाल्यांनीं जी नडजोडीची वृत्ति स्वीकारली, १९२१ च्या क्रांतीच्या वेळीं जो अनुभव आला व इतर देशातही अशा वेळीं जो अनुभव येतो तो लक्षात घेऊनच कम्युनिस्टांनीं आपली स्वतंत्र संघटना निर्माण केली होती.

**संयुक्त कामगार संघ**—कम्युनिस्ट पक्षाची संघटना तिच्या स्थापनेपासून वाढत्या प्रमाणावर चालू होती. कुओमिन्ताङ् पक्षानें दिलेल्या सवलतीमुळे व देशाच्या राजकारणात कायदेशीर स्थान प्राप्त झाल्यामुळें कम्यूनिस्टांनीं चालविलेल्या कामगार व किसान संघटनेच्या कामाला चांगलेंच उत्तेजन मिळाले. १९२५च्या आरंभीं कम्यूनिस्ट पार्टीचे सभासद ८०० होते. पण त्याच वर्षाच्या अखेरीला सभासदाची संख्या ३५०० वर गेली. १९२४ च्या मेमध्यें चीनमधील कामगार संघाच्या सभासदांची संख्या २,७०,००० होती. पण दुसऱ्या वर्षीच्या (१९२५)मध्यें ती ५,४०,००० हजारावर गेली. यावेळीं झालेल्या शहरातल्या वाढत्या महागाईमुळें कामगार चळवळीला नवीन जोम प्राप्त झाला. १९२५ मेमध्ये शांघाय येथे झालेल्या संपाच्या वेळीं एक जपानी फोरमनानें एका चिनी कामगाराला ठार केलें. या कृत्याच्या निषेधार्थ कामगारानीं प्रचंड निदर्शनें केलीं, या निदर्शनात शांघाय येथील विद्यार्थीही सामील झाले. या मिरवणुकीवर तेथील परदेशी वसाहतींतील पोलिसानीं बंदुकीच्या फेरीवर फेरी झाडून शेकडों कामगाराचे व विद्यार्थ्यांचें मुडदे पाडले. कामगार मुळींच डगमगले नाहींत त्यानी सार्वत्रिक संप पुकारला व आपल्या राष्ट्रीय, राजकीय व आर्थिक मागण्या सरकारपुढे व कारखानदारापुढें मांडल्या. हॅंकौ व कॅन्टनमधील कामगारही संपावर गेले. कॅन्टनमधील ॲंग्लो फ्रेंच वसाहतीच्या लष्करी पोलिसानीं संपवाल्यांच्या मिरवणूकीवर गोळ्यांचा वर्षाव केला. वरील ठिकाणच्या संपवाल्याना सहानुभूति दाखविण्याकरिता हॉंगकॉंगमधील कामगार सार्वत्रिक संपावर गेले. हॉंगकॉंग येथील हा संप १९२८ आक्टोबरपर्यंत चालला होता. सर्व जगांतील अत्यंत दीर्घ कालचा संप म्हणून या संपाची प्रसिद्धी आहे. संपाच्या कालात

कॅन्टनमध्ये सरक्षक लष्करही उभारण्यात आले होतें. या सर्व सपातील अनुभव जमेस धरून कामगार वर्गाच्या हितसबधाचें रक्षण करण्याकरता १९२५-मध्ये भरलेल्या दुसऱ्या राष्ट्रीय कामगार परिषदेंत आखिल चीनी सयुक्त कामगार सघाची स्थापना करण्यात आली.

**कुओमिन्ताङमधील उजवा गट**—कुओमिन्ताङ् पक्षाची पुनर्घटना करण्यात आली त्यावेळींच कम्यूनिस्टानाही त्याचे सभासद होण्याची मोकळीक देण्यात आली होती. डॉ. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वानुसार यापुढें पक्षाचा कार्यक्रमही आखण्यात आला. यामुळें तर कुओमिन्ताङ् मधील उजव्या गटाच्या पोटात चागलीच खळबळ सुरू झाली. सन्यत्सेनचीं जहाल मते या गटातील लोकाना अर्थात् आवडत नव्हतीं. १९२५ मध्ये सधी मिळताच या पक्षाच्या लोकानीं कुओमिन्ताङ सरकारविरुद्ध बडाचें निशाण उभारलें. कॅन्टनमधील व्यापारी गटाच्या सशस्त्र सरक्षक सैन्याने शहरात खळबळ उडवून दिली व कुओमिन्ताङच्या एका सेनापतीचा खून केला. पण हें बड यशस्वी झाले नाहीं. डॉ.सन्यत्सेन यावेळीं पेकिङमध्ये होता व त्याच ठिकाणीं तो मरण पावला. उजव्या गटाला उघडपणे वावरण्यास मोकळीक मिळाली पण डाव्यागटाच्या मताधिक्यामुळे त्याचे काहीं चाललें नाहीं. कॅन्टनमधील आपलें ठाणें या गटानें हलविलें. 'पश्चिम पहाडी गट'या नवीन नावाखालीं आपल्या पक्षाची पुनर्घटना केली व शाघाय येथें आपलें मुख्य ठाणें प्रस्थापित केलें. कुओमिन्ताङ्मध्यें यानतर मतभेद झाले व डाव्या व उजव्या गटात तीव्र कलहाला सुरुवात झाली त्याचे बीज याचवेळीं पेरलें गेलें. कुओमिन्ताङ्च्या उजव्या गटात बरेच व्यापारी, पेढीवाले, परदेशी वसाहतींत राहणारे दौलतमद होते. या लोकाचा देशातील बड्या जमीनदाराशीं निकटचा सबध होता. जमीनदार तर किसान सघटनेच्याविरुद्ध होतेच. कुओमिन्ताङ्च्या लष्करी खर्चाचा बराच भाग या गटातील लोकानीं उचलला होता. १९२६ मध्यें चिआङ् काथी शेकला राष्ट्रीय लष्कराचा सेनापति बनविण्यात आले त्यावेळीं उत्तरेकडील मोहीम चालू ठेवण्याकरता कॅन्टनमधील व्यापाऱ्याकडून त्यानें ५००,००० डॉलर जमविले होते व कॅन्टनमध्यें असताना कामगार सघाच्या व कम्यूनिस्ट पक्षाच्या काहीं पुढाऱ्याना अटक करून

उजव्या गटाकडे आपला कल असल्याचे चिआङ् कायी शेकने दिग्दर्शित केलें होतें.

**साम्राज्यवाद्यांचें कारस्थान**—डॉ. सन्यत्सेनसारखा सर्वांना आदरणीय व वजनदार पुढारी नाहींसा झाल्यावर साहजिकच कुओमिन्ताङमधील मतभेदाना तीव्र स्वरूप येऊं लागलें. कुओमिन्ताङमध्यें फूट पाडण्याची ही उत्कृष्ट संधी आहे, हें लक्षात घेऊन त्या दृष्टीनें परकीय साम्राज्यवाद्यानीं आपल्या हालचाली सुरू केल्या. राष्ट्रीय आंदोलनात भाग घेणाऱ्या लोकांच्या मनात दहशत उत्पन्न करण्याकरता परकी लष्करी तुकड्या शांघायमध्ये घुसविल्या व कवाइती थाटात शहराच्या सर्व भागातून त्या मिरवीत नेल्या. परकीय वसाहतींचें रक्षण करण्याकरता हें लष्कर आणण्यात आलें आहे, असें केवळ ढोंग करण्यात आलें होतें. कॅन्टन बंदराच्या धक्क्यावरील कामगारानीं यावेळीं संप केला होता,पण तेथील ब्रिटिश अधिकाऱ्यानीं आपल्या लष्कराच्या जोरावर निर्दयपणे संपवाल्याना मरडून काढले. शांघाय व कॅन्टन शहरापुरतेंच नाहीं तर उत्तर व दक्षिण चीनमधील मोठ्या शहरातून युद्धसामुग्रीसह कवाईती फौजेच्या परेडी मिरवून परकीय साम्राज्यवाद्यानीं आपल्या लष्करी सामर्थ्याचें प्रदर्शन केलें. कुओमिन्ताङमधील उजव्या गटाशीं ब्रिटिश सरकार तडजोडीनें वागण्यास तयार आहे, असें सूचित करण्यात आलें. जपान तर या तडजोडीला तयारच होतें. आपल्या हितसंबंधाचें रक्षण करावयाचें असेल तर कुओमिन्ताङमध्य फूट पाडलीच पाहिजे, या विचारानें उजव्या गटातील पुढाऱ्याबरोबर स्नेहाचे संबंध वाढविण्याच्या कारस्थानाला जपाननें हात घातला होता. १९२६ फेब्रुवारीमध्यें ब्रिटिशानीं चीनी लोकशाही सरकारशीं तडजोडीच्या वाटाघाटी सुरू केल्या व त्यात झालेल्या निर्णयाप्रमाणें हॅन्कौ, किउकियाङ येथील वसाहती त्यानीं चीनला परत दिल्या. पण त्याचवेळीं या वसाहतींच्या जागेत आपल्याकरता खास व्यवस्था राखण्याची सवलत मागून घेतली. एका हातानें देऊन दुसऱ्या हातानें परत घेण्याचाच हा प्रकार असला तरी कुओमिन्ताङमधील उजव्या गटाच्या पुढाऱ्यानीं वरील सूचना मान्य केली. यावरून कुओमिन्ताङमध्यें फूट पाडण्याचें कारस्थानच या वाटघाटीमागें होतें, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.

इकडे चीनी सरकारच्या राष्ट्रीय लष्कराची तर भराभर वाढ होत होती. कॅन्टनहून १९२६ जुलैमध्यें उत्तरेच्या मोहिमेवर लष्कर निघाले त्यावेळीं त्याची सख्या ६०,००० होती. पण १९२७ च्या आरभीं या सैन्याची संख्या जवळ जवळ २००,००० पर्यंत भरली. ही सख्या इतकी वाढली कशी ? राष्ट्रीय लष्कर उत्तरेच्या स्वारीवर असताना सुभेदाराचे जुने सेनापती आपल्या लष्करासह या सैन्याला जाऊन मिळाले. उगवत्या सूर्याची पूजा करणारे काहीं असतातच. प्रातिक सुभेदाराची सत्ता यापुढे टिकून राहत नाहीं. वाढत्या राष्ट्रीय सरकारच्या सत्तेपुढें सुभेदाराना खालीं मान वाकवावीच लागेल, असे पाहून हे जुने सेनापति राष्ट्रीय सरकारला येऊन मिळाले होते. हे सर्व लोक उघडच अत्यत प्रतिगामी वृत्तीचे होते. पण काहीं असलें तरी या वाढत्या लष्करातल्या शिपायाना पगार देणें तर जरूरच होतें. हा पैसा कोठून आणायचा ? उजव्या गटातील श्रीमान् लोकाशिवाय दुसरे कोण हा पैसा देणार ? राजकीय दृष्ट्या अशिक्षित असलेल्या या अधिकाऱ्याना असें वाटणें साहजिक होतें. पैशाच्या अभावामुळें राष्ट्रीय लष्करातील आघाडीवरच्या व राजकीय दृष्ट्या जागृत असलेल्या पथकाना व त्याच्यावरील अधिकाऱ्याना फारच हाल सोसावे लागत होते, हेंही तितकेंच खरें होतें. पण अशा परिस्थितींतही तत्वभ्रष्ट होऊन पैशाकरता उजव्या गटातील श्रीमताची लाचारी कुओमिन्ताङनें पतकारावी, ही गोष्ट सन्यत्सेनच्या धोरणानुसार वागणाऱ्या लोकाना कधींच मान्य होण्याजोगी नव्हती.

अशा रीतीनें कुओमिन्ताङमधील मतभेद आधिकाधिक स्पष्ट होत चालले. याच सुमारास ( २१ फेब्रुवारी १९२७ ) कुओमिन्ताङच्या एका खासगी सभेत चिआङ कायी शेकचें भाषण झालें. ९ मार्च रोजी तें छापून प्रसिद्धही झालें. या भाषणात त्यानें कम्यूनिस्टावर टीकेची झोड उठविली होती. या भाषणानतर मध्यवर्ती कार्यकारी कमिटीची सभा लगेच १० मार्च रोजी वूहान येथें घेण्यात आली. उजव्या गटाचे सभासद या सभेला हजर नव्हते. चिआङही उपस्थित नव्हता. मार्चअखेर नान्किङवर राष्ट्रीय लष्करानें कबजा केलेला पाहून परकीय राष्ट्रांनीं चढाईचें धोरण स्वीकारण्याचें ठरविलें व नान्किङवर तोफाचा भडिमार केला. शाघाय येथील कामगारांनीं

याच वेळीं उठाव केला व शांघाय शहराचा चीनी भाग आपल्या कबजात घेतला. राष्ट्रीय लष्कराच्या ताब्यात तो द्यावयाचा याच उद्देशानें शांघायच्या कामगारानीं हे कृत्य केलें होतें. पण १ एप्रिलमध्ये चिआङचें लष्कर शांघायमध्ये दाखल झालें, त्यावेळीं त्यानें कामगारावरच हल्ला चढवून रक्ताचे पाट वाहविले. कॅन्टनमध्येंही उजव्या गटाच्या लष्करानें कामगाराच्या बाबतींत असेंच दडपशाहीचें वर्तन केलें. कामगाराच्या चळवळी दडपून टाकण्याचें धोरण चिआङनें स्वीकारलें याचें कारण उघड होतें. उजव्या गटातील श्रीमंत जमीनदाराना व भांडवलवाल्याना निर्धास्त बनविण्याकरताच त्यानें हे कृत्य केले होतें. केवळ उजव्या गटालाच नव्हे तर परकीय साम्राज्यवादी राष्ट्रानाही संतुष्ट राखण्याच्या हेतूनें चिआङनें कामगारवर्गावर हत्यार उपसले होतें. राष्ट्रीय फौजेंत असा एक गट आहे कीं, जो कामगाराना व शेतकऱ्याना जागच्या जागीं दडपून ठेवतो, त्याना डोकें वर काढू देत नाहीं, हें पाहून शांघाय येथील सावकाराना फार बरें वाटलें. त्याचप्रमाणे आपल्या व्यापाराला धक्का बसेल इतक्या थराला येईपर्यंत परकीयाशीं झालेल्या तहाच्या अमलबजावणीबाबत तो आग्रह धरीत नाहीं, हें पाहून तर या गटावर तें फारच खूष झाले आणि चिआङच्या फौजेकरता लागेल तें कर्ज ते देऊ लागले. याप्रमाणें फौजेच्या खर्चाची व्यवस्था लागल्यावर कुओमिन्ताङमधील उजव्या गटानें आपल्याशीं सहमत असलेल्या लोकाचें संमेलन भरविलें व नान्किङ सरकारच्या अधिकाऱ्याच्या नेमणूका केल्या.

**कुओमिन्ताङमधील डावा गट**—हॅन्कौ, वूचाङ व हानयाङ हीं शहरें राष्ट्रीय फौजेच्या ताब्यात होतीं. यांगत्सी दरीच्या मध्यावर असलेल्या या तीन्ही शहराचा एक संघ बनवून त्याला वूहान हें नाव देण्यात आलें होते. राष्ट्रीय फौजेच्या ताब्यात नान्किङ पूर्णपणें आलें नव्हते त्यामुळे वूहानचें सरकार स्थापून फेंङ यू शिआङ्च्या नेतृत्वाखालीं मुख्यतः डाव्या गटाचे लोकच या सरकारचा कारभार पाहात होते. पण आता सर्वच परिस्थिति बदलली. कुओमिन्ताङ्मधील उजव्या गटानें वूहान सरकारला हातचें सोडलें देशातल्या जमीनदारानीं व भांडवलवाल्यानीं ही संधी साधून उजव्या गटाच्या

हातून शेतकरी-कामकरी जनतेच्या चळवळी दडपून टाकण्याचा प्रयत्न चालविला. फूट पाटण्याची ही संधी परकीय साम्राज्यवादी राष्ट्रं कशी गमावणार ? देशातील पुरोगामी पक्षाला विरोध करावयाचा हें तर त्यांचे ब्रीदच होतें. चीनमधील क्रांतिकारकांविरुद्ध मॅन्च्यू सरकारला त्यांनीं मदत केली. क्रांतीनंतर यूआन शी कायीसारख्या रानदांडग्या सुभेदाराला मदत करून क्रांति हाणून पाडण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण तोही फसल्यावर आतां क्रांतिकारकांच्या कुओमिन्ताङ्‌मध्यें फूट पाडण्याकरतां त्यांनीं उजव्या गटातील जमीनदारांना व भांडवलवाल्यांना आपल्या पकडींत ठेवण्याच्या कारवाया सुरू केल्या. चिआङ् कायी शेकच्या प्रतिगामी धोरणामुळे आपली पोळी पिकणार, असें त्यांना वाटू लागलें. कुओमिन्ताङच्या डाव्या गटाविरुद्ध याप्रमाणे एक मजबूत फळी उभी राहिल्याबरोबर डाव्या गटातील प्रतिगामी लोकांचींही मनें डळमळू लागलीं. जमीनदार व भांडवलवाले यांची मदत नसेल तर लष्करी खर्च भागविणार कसा ? डाव्या गटातील प्रतिगामी लोकहि याच तक्रारी करू लागले होते. तत्वज्ञानी पत्करून भांडवलदार वर्गाकडून पैसे घेणे नामुष्कीचे आहे. भांडवलवाल्यांकडून पैसा घेऊन त्यांना संतुष्ट ठेवण्याकरता जनतेच्या संघटना मोडून काढणें म्हणजे राष्ट्राचा विश्वासघात करण्यासारखेंच आहे, असे प्रतिपादन करणाऱ्या कुओमिन्ताङमधील लोकांची संख्या आतां घटत चालली होती. विशेष हे कीं, डाव्या गटाचा पुरस्कार करणारा फेङ्ग यू शिआङही उजव्या गटाचा वाढता जोर पाहून त्यांच्यात जाऊन मिळाला.

राष्ट्रीयत्व, लोकशाही, लोकोपजीवन अथवा समाजवाद या आपल्या तीन लोकतत्वांची अंमल बजावणी करण्याकरता डॉ. सन्यत्सेननें कुओमिन्ताङची प्रस्थापना केली. पण त्याच्या मरणानंतर दीड दोन वर्षांतच कुओमिन्ताङमध्यें उघड उघड दोन गट निर्माण झाले. या गटापैकीं उजव्या गटाला पहिलें तत्व पूर्णपणें मान्य होतें. दुसरें लोकशाहीचें तत्व त्याला अर्धवट मान्य होतें. अर्धवट म्हणण्याचें कारण असे कीं, ( १ ) लोकशाही सरकार लोकांनीं निर्माण करावे, ( २ ) त्याचे नियंत्रण व कारभार लोकांनीं करावा व ( ३ ) हें नियंत्रण किंवा कारभार सर्व लोकांच्या हिताकरतां

असावा यापैकीं, पहिल्या दोन गोष्टी त्याला मान्य होत्या, पण लोकशाहीचें नियंत्रण किंवा कारभार सर्व लोकांच्या हिताच्या व हक्काच्या दृष्टीने करावा ही तिसरी गोष्ट उजव्या गटाला तितकीशी मान्य नव्हती. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वापैकीं लोकोपजीवन किंवा समाजवाद—जमीनीच्या मालकी हक्कात समानता व भांडवलाचे नियमन हे तिसरे तत्व उजव्या गटाला मुळींच मान्य नव्हतें. जमीनीच्या मालकी हक्कात समानता अमलात आणली कीं, जमीनदार वर्गाचा निकाल लागतो आणि भांडवलाचें नियमन करावयाचें म्हटलें कीं, भांडवलदार वर्ग नष्ट होण्याच्या पथाला लागतो व त्या ठिकाणीं कामगार सत्ता निर्माण होते. राष्ट्रीयत्व राखावयाचे व लोकशाही प्रस्थापित करावयाची व ती टिकवायची तर जमीनदाराना व भांडवलवाल्याना दुखवून चालायचे नाहीं, त्याची मदत या कामीं घेतलीच पाहिजे, असें उजव्या गटाचे मत होतें.

तर उलट " तीन लोकतत्त्वे " हा डॉ. सन्यत्सेननें आपल्याकडे दिलेला ठेवा आहे. या तत्वाची पूर्णपणे अमलबजावणी करावयाची तर लोकशाहीचा कारभार सर्व लोकांच्या हिताकरताच चालला पाहिजे. जमीनीच्या मालकी हक्कात समानता व भांडवलाचे नियमन केल्यानेंच हे लोकहित पूर्णपणे साधेल. याकरता सन्यत्सेनच्या तिसऱ्या लोकतत्त्वानुसार समाजवादाचीच कास धरली पाहिजे असे डाव्या गटाचें मत होतें. हे ध्येय साध्य करताना कोणाचें मन किती दुखावेल, याची पर्वा करता कामा नये. शेतकऱ्याची व कामकऱ्याची शक्ति कमी करण्यात येईल या आशेनें किंवा या अटीवर, कोणताही वर्ग लोकशाही सरकारास पैशाची मदत करण्यास पुढें येईल तर त्या पैशाचा स्वीकार करून त्याचे मिंधे किंवा हस्तक बनू नये. लोकशाही सरकारला किंवा त्याच्या लष्कराकरता लागणारा पैसा कसाही उत्पन्न करता येईल, जनतेच्या सामर्थ्यावर आपला विश्वास असला पाहिजे, असें डाव्या गटाचें मत होतें.

उजव्या गटाचा जनतेच्या सामर्थ्यावर अर्थातच विश्वास नव्हता. जनतेची संघटना वाढावी अशी या गटाची इच्छाही नव्हती. बडे बडे जमीनदार, व्यापारी, भांडवलवाले व त्याचे पुरस्कर्ते या गटात असल्यामुळें

जनतेचें सामर्थ्य वाढावें व तिची संघटना बळकट व्हावी, असें त्याना कसें वाटणार ? डॉ. सन्यत्सेनचा उजवा हात असलेला चिआङ कायी शेक या उजव्या गटाला मिळाला. कामगाराची संघटना मोडण्याकरता आपल्या हाताखालीं असलेल्या लष्कराचा तो उपयोग करूं लागला, हें पाहून उजव्या गटातील जमीनदार व श्रीमानवर्ग सढळ हातानें मदत करण्यास पुढें सरसावला यात कांहींच नवल नव्हतें. आणि आता तर वूहान सरकारच्या डाव्या गटापैकीं बरेंसचे प्रतिगामी वृत्तीचे लोक उजव्या गटाला येऊन मिळाले व या सरकारच्या लष्कराचा सेनापति फेङ यू सिआङही उजव्या गटाला येऊन मिळाल्यामुळें त्याचे हात अधिकच बळकट झाले.

कुओमिन्ताङ्च्या डाव्या गटात साहजिकच किसान संघाचे व कामगार संघाचे पुरस्कर्ते व त्याच्या जोडीला कुओमिन्ताङचे सभासद असलेले कम्युनिस्ट पक्षाचे लोक होते, हें सांगावयास नकोच. कुओमिन्ताङच्या प्रस्थापनेनंतरच्या कालात किसान व कामगार संघाचे सामर्थ्य वाढलें होतें. १९२१ सालीं चीनमध्यें कम्यूनिस्ट पक्षाची प्रस्थापना झाली. त्यानंतरच्या या सहा वर्षांत त्याचेंही सामर्थ्य वाढीला लागलें होतें. पण कुओमिन्ताङमधील उजव्या गटातील लोक बाहेर पडले. या गटातील बरेचसे सेनानायक आपल्या लष्करासह त्याना येऊन मिळाले आणि आता तर वूहान् सरकारमधील पुढाऱ्यानीं व त्या सरकारच्या लष्करच्या नेत्यानींही त्याच मार्गाचा अवलंब केला, अशा परिस्थितींत कुओमिन्ताङला तिच्या मूळ पदावर कायम ठेवणें डाव्या गटाला जवळ जवळ अशक्यच झालें. तथापि यापुढें उजव्या गटाशीं दोस्ती ठेवून भागणार नाहीं, सन्यत्सेननें घडवून आणलेली क्रांति टिकवून धरण्याचा किंवा त्याच्या तीन लोक तत्वाच्या अमलबजावणीचा हा मार्ग नव्हे, ही गोष्ट कुओमिन्ताङमधील डाव्या गटाने व कम्यूनिस्ट पक्षानें पूर्णपणें ओळखली होती.

**किसान कामगार संघटना**— कुओमिन्ताङमधील उजव्या व डाव्या गटाच्या बलाबलाची चढाओढ सुरू झाली त्यावेळीं किसान कामगाराच्या संघटनेच्या कामालाही चांगलाच जोर चढला. जमीनदार व भांडवलदार वर्गाचा साथीदार चिआङ यानें कॅन्टन व शांघाय येथील

सपवाल्यावर हल्ले केले व त्याच्या कत्तली उडविल्या खऱ्या, पण या दडपशाहीमुळें किसान कामगार वर्ग मुळींच नामोहरम झाला नाहीं. उलट दुप्पट जोरानें ते संघटित होऊ लागले. १९२७ च्या मेमध्यें सघटित कामगाराची सख्या तीस लाखावर गेली. १९२७ च्या जानेवारींत सघटित किसान वीस लाख होते पण त्यानतर थोड्याच महिन्यानीं त्याची सख्या पाचपट वाढली. कम्यूनिस्ट पक्षाचे १९२७ च्या मे महिन्यात ३०,००० सभासद होते पण या पुढच्या अवघ्या दोन महिन्यात या पक्षाचे ६०,००० सभासद झाले. चीनमधील चाळीस कोटी लोक सख्येच्या मानानें सघटित किसान कामगाराचें व कम्यूनिस्ट पक्षाच्या सभासदाचें हें सामर्थ्य काहींच नव्हे, हें खरें असलें तरी चीनमधील सामान्य जनतेंत राजकीय जागृति कशी झपाट्यानें होऊं लागली होती त्याचेंच हे द्योतक होतें, यात शका नाहीं. कम्यूनिस्ट पक्षाचें बल झपाट्यानें वाढत होतें पण त्यातही मतभेदानें आपलें डोकें वर काढले होतें. कुओमिङन्ताङमधील डाव्या गटानें कसल्याही अटी घातल्या तरी त्याच्याशीं सहकार्य करावें, असे म्हणणारा एक गट या पक्षात पुढें आला तर डाव्या गटाशीं काहींही सबध न ठेवता कम्यूनिस्टानीं चीनमध्यें स्वतत्र सोव्हिएटें स्थापन करावीं, असे म्हणणारा ट्रॉट्स्की पथही पुढे आला होता. यामुळे ही दोन्हीं सकटें टाळून आपल्या पक्षाचा कार्यक्रम योग्य दिशेने पार पाडण्याचें काम करणें कम्यूनिस्टाना बरेंच मुष्किलीचें झालें होतें.

**डाव्याउजव्यांचा सामना**—वूचाङ, हॅंकौ व हानयाङ् हा याग-त्सीच्या मध्यदरींतला वूहान प्रदेश कुओमिन्ताङच्या डाव्या गटानें व्यापलेला होता. या प्रदेशातील वाढत्या किसान चळवळीला आळा घालण्याकरता उजव्या गटाच्या सेनानायकानीं भयकर दडपशाही केली. त्यातल्या त्यात थोडीशी समाधानाची गोष्ट म्हणजे त्या गटाला जाऊन मिळालेल्या फेङ् यू शिआङ्नें या किसान कामगाराच्या कत्तलींत भाग घेतला नाहीं. १९२५ च्या मेमध्ये उजव्या गटाच्या पुढाऱ्यानीं नानकिङ येथें आपलें सरकार स्थापन केलें होतें. याच सरकारला आागस्ट महिन्यात कुओमिन्ताङ्चे अधिकृत सरकार बनविण्यात आलें. या सरकारचा जम बसविण्याकरता पुरोगामी गटाच्या

सर्व चळवळी हाणून पाडण्याचा उजव्या गटाने चंग बांधला. १९१२ मध्यें यूआन शी कायीनें कुओमिन्ताङ्‌चा निकाल लावण्याकरतां जशी अनन्वित दडपशाही केली तशाच प्रकारची दडपशाही आता कुओमिन्ताङ्‌नें डाव्या गटाच्या व कम्यूनिस्टांच्या संघटना मोडून टाकण्याकरता चालू ठेविली. उजव्या गटाचे नेतृत्व अर्थात् चिआङ कायी शेककडे होतें. यूआन् शी कायीप्रमाणें चीनचा बादशहा बनण्याची व आपल्या घराण्याची सत्ता चीनवर प्रस्थापण्याची राक्षसी आकांक्षा चिआङ् कायी शेकनें मनात बाळगली नाहीं. चीनचें राजकारण आता इतकें पुढें गेलें होतें कीं, चिआङ् कायी शेकच्या मनातसुद्धा असें विचार येणें शक्य राहिलें नव्हतें. नान्किङ् सरकारचें नावापुरतें का होईना लोकशाही स्वरूप कायम ठेवणें चिआङ कायी शेकला व त्याच्या उजव्या गटाच्या साथीदाराना भागच होते.

---

# यादवीची सुरुवात

**कम्यूनिस्टांचा पुढाकार**—क्रांतीचें तारू सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वाच्या दिशेनें हाकावयाचें असेल व जनतेचें संपूर्ण हित साधावयाचें असेल तर उजव्या गटाच्या या एकजूटीच्या कणखर हल्ल्याचा प्रतिकार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें लक्षात घेऊन डाव्या गटानेंही जोरानें या प्रतिकाराची तयारी केली. याप्रमाणें अभिनव चीनच्या इतिहासातील दशवार्षिक शोकपर्वाला सुरुवात झाली. चीनमधील हे दोन्ही पक्ष मध्यतरीं कांहीं वर्षे जपानच्या आक्रमणाला थोपविण्याकरता एकजूट झाले तरी अद्याप त्यांच्यातील ही यादवी संपलेली नाहीं. या यादवीचें स्वरूपच असें आहे कीं, त्या ठिकाणीं तडजोडीला जागा नाहीं. भांडवलशाहीप्रधान राष्ट्र-

## कुओमिन्ताङ पक्षाचे नेते

★  ★

जनरल चिआङ कायी शेक

वाद व लोकशाहीप्रधान समाजवाद हीं दोन्ही एके ठिकाणीं कधींच नांदावयाचीं नाहींत. देशांतील जमीनदार–भाडवलदार व त्यांची साथ करणारे चिआङ् कायी शेक व फेङ यू सिआङ यांच्यासारखे सेनानायक व भांडवलदारांच्या पैशाच्या जोरावर त्यांनीं उभारलेलें प्रचंड लष्कर एका बाजूला तर किसान-कामगार संघटना, कुओमिन्ताङच्या डाव्या गटांतील तत्वनिष्ठ पुढारी आणि कम्यूनिस्ट पक्ष दुसऱ्या बाजूला असा हा सामना होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एका बाजूला चिआङ कायी शेक व कुओमिन्ताङ आणि दुसऱ्या बाजूला कम्यूनिस्ट असेंच स्वरूप या सामन्याला प्राप्त झालें. परकीय साम्राज्यवाद्यांपासून चीनचें रक्षण करण्याकरतां व चीनची क्रांति चिरस्थायी करण्याकरतां चीनमधील राष्ट्रीय पक्षाशीं तडजो-डीनें व एकोप्याच्या भावनेनें वागणें जरूरीचें आहे, अशा स्पष्ट सूचना स्टॅलिन व कोमिन्टर्न—कम्यूनिस्ट इंटर नॅशनल-यांच्याकडून वारंवार मिळत होत्या. पण चीनमधील राष्ट्रीय पक्ष सर्वस्वीं चिआङच्या हातीं गेला व राष्ट्रीय पक्षाचें वर्गीय स्वरूप जसजसें उघडकीस आलें तसतसा या पक्षापासून अलग होण्याचा प्रसंग चिनी कम्यूनिस्टांवर आला. प्रथमतः चिआङ्च्या कॅन्टन सरकारशीं व नंतर डाव्या गटाच्या वूहान सरकारशींही कम्यू-निस्टांना संबंध तोडावा लागला. राष्ट्रीय पक्षाशीं तडजोडीनें व एकोप्यानें राहण्याचा कम्यूनिस्टांनीं अत्यंत कसोशीनें प्रयत्न केला. त्यांत त्यांना यश आलें नाहीं. येन केन प्रकारेण कम्यूनिस्टांना हाणून पाडा, हेंच धोरण चिआङ कायी शेकप्रभृति कुओमिन्ताङ् पक्षीय पुढाऱ्यांनीं स्वीकारलें. अशारीतीनें राष्ट्रीयपक्षाचें कामगार–किसानविरोधी स्वरूप उघडकीस आल्या-वरच ज्या कांहीं किसान–कामगार संघटना कम्यूनिस्टांच्या हातीं राहिल्या त्यांच्या जोरावरच कुओमिन्ताङ्पासून अलग होऊन चिआङ् कायी शेकशीं दोन हात करण्याचें त्यांनीं ठरविलें.

**चिआङ्ची अल्प परिचय**–चिआङ् कायी शेक श्रीमंत व्यापाऱ्याचा मुलगा होता. घरच्या गरीबीमुळें सन्यत्सेनला वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत पायांत चपला घालण्यास मिळाल्या नव्हत्या पण चिआङच्या घरची स्थिती चांगली होती. सुखवस्तु घराण्यांत त्याचा जन्म झाला व त्यांतच तो लहानाचा मोठा

झाला. त्याचा बाप त्याच्या वयाच्या नवव्या वर्षी वारला. त्याच्या आईच्या देखरेखी खालीं त्याचे शिक्षण झालें. त्याचे आईबाप बुद्ध धर्मीय होते व बुद्ध धर्माचे शिक्षण त्याच्या आईनें त्याला दिले होतें. सुग माइलिंगशीं लग्न झाल्यावर तो खिश्चन झाला. त्याची विचारसरणी सरजामदारी थाटाची होती. कन्फ्यूशिअसच्या नीति धर्माच्या तत्वाचाही त्याच्या मनावर पगडा बसला होता.

लष्करी शिक्षणाची आवड त्याला लहानपणापासून होती. वयाच्या विसाव्या वर्षी पाउतिङ लष्करी विद्यालयात तो दाखल झाला. काही थोडे महिनेच या ठिकाणीं तो शिकला. जपानमधील शिबू गोकियो लष्करी शाळेंत त्यानें यापुढचें शिक्षण घेतलें व १९०९ सालीं तो ग्रॅज्यूएट झाला. नतर जपानमधील तेराव्या तोफखान्याच्या लष्करी तुकडींत तो नोकर राहिला. जपानमध्यें असताना त्याची व सन्यत्सेनची भेट झाली. सन्यत्सेनबरोबर तो चीनमध्यें आला व त्यानें प्रस्थापित केलेल्या कुओमिन्ताङ पक्षात सामील झाला. १९११ च्या क्रातीनंर उत्तर व दक्षिण चीनमधील सुभेदाराचे वर्चस्व कमी करण्याच्या बाबतींत यावे तसें यश आलें नाहीं. क्रातीनतरच्या राष्ट्रीय सरकारविरुद्ध या सुभेदारानीं कारस्थाने चालविलीं, या गोष्टींचा त्याला तिटकारा आला. म्हणून त्यानें राजकारणातून अग काढून घेतलें. तो शाघाय येथे व्यापारात शिरला. पण कुओमिन्ताङ् पक्षाची सघटना बळकट होत चालली व त्याला सोव्हिएट यूनियनसारखा साथीदार मिळाला, हें पाहून तो पुन्हा राजकारणात शिरला. सन्यत्सेननें त्याला रशियात लष्करी शिक्षण घेण्याकरता पाठविलें. या ठिकाणीं त्यानें स्टॅलिनची भेट घेतली नाहीं तर ट्रॉट्सकीला तो भेटला. सोव्हिएट सल्लागार म्हणून चीनमध्यें यापुढें आलेल्या जनरल ब्लूचरवरही त्यानें आपली छाप बसविली व आपल्या सबधानें त्याचें अनुकूल मत बनवून घेतलें. तो कॅन्टनमध्यें आला. लाल फौज प्रत्यक्ष पाहिलेला व त्याच्या शिस्तीसबधाची सर्व माहिती असलेला हा एकटाच कुओमिन्ताङ् सभासद होता. व्हापोआ येथें लष्करी विद्यालय काढण्यात आलें त्यावेळीं बोरोदिननें त्याला साहजिकच या विद्यालयाचे मुख्यध्यापक नेमले. लाल लष्करी

विद्यालयाच्या धर्तीवरच हें विद्यालय काढण्यात आलें होतें. चिआङ्चें वजन यापुढे वाढत चालले. पस्तिसाव्या वर्षी तो चिनी राष्ट्रीय फौजेचा सेनापति झाला. सन्यत्सेन हयात असेपर्यंत कुओमिन्ताङ पक्षात दुफळी होण्याचा प्रसंग आला नाहीं. देशातील सर्व प्रक्षाना सारखाच वाव देऊन त्यानें पक्षाचे ऐक्य कायम राखले होते. मार्क्सवादाशीं सन्यत्सेन एकरूप झालेला नव्हता तरीसुद्धा आपली तीन लोकतत्वे कम्यूनिझमला धरून आहेत, त्याची पूर्ण अमलबजावणी करणे म्हणजे कम्यूनिझमचीच प्रस्थापना करणे होय, असे सन्यत्सेनने पुनः पुन्हा आग्रहानें प्रतिपादन केलें होते. चिआङने ही आपला या बाबतीतला मतभेद कधींच प्रकट केलेला नव्हता.

चीनी राष्ट्रीय फौजेतील बहुतेक अधिकारी व्हापोआ लष्करी विद्यापीठाचे ग्रॅज्यूएट झालेले होते. जमीनदार वर्गाचे व मध्यम वर्गाच ते तरूण होते. या विद्यापीठात शेतकरी व कामकरी वर्गाच्या तरूणाना प्रवेश मिळणे शक्यच नव्हते. क्रांतीनतर राष्ट्रीय फौजेचे महत्व ज्याप्रमाणे वाढत होते त्याचप्रमाणे देशातील किसान–कामगार सघटनाचे सामर्थ वाढीस लागलें होते. कामगार वर्ग आपल्या हक्काकरता मालक वर्गाशीं झगडू लागला होता. शेतकरी वर्गही आपल्या सघटनेच्या सामर्थ्यावर जमीनदाराचे जमीनीवरील हक्क रद्द करण्यात आले पाहिजेत, असें आव्हानपूर्वक सागू लागला होता व त्याची अमलबजावणीही करू पहात होता. राष्ट्रीय फौजेतील तरुण जमीनदारीवृत्तीच्या लष्करी अधिकाऱ्याना ही बाहेरची चळवळ अर्थात्च पसत नव्हती. या मतभेदाचे पडसाद अर्थात् राष्ट्रीय फौजेतही उठत होते. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वाची अमलबजावणी करावयाची असेल तर बाहेर चालू असलेल्या किसान कामगाराच्या चळवळीला आपला पाठिंबा असला पाहिजे, असें प्रतिपादणारा एक जहाल पक्ष राष्ट्रीय फौजेच्या अधिकारी वर्गातही निर्माण झाला होता, कम्यूनिझमने राष्ट्रीय फौजेतही प्रवेश केला होता. १९२५ मध्ये उत्तरेकडील झालेल्या मोहिमातून या दोन्ही गटातून मतभेदाच्या ठिणग्या उडू लागल्या. चिआङ् या दोन्ही पक्षाशीं समतोल बुद्धीनें वागत होता. पूर्व नदीवरील मोहीम सपवून कॅन्टनला राष्ट्रीय फौजा परत आल्या त्यावेळीं त्याने फौजेतील

सर्व तरुण अधिकाऱ्याना एकत्र मेजवानीकरता बोलावलें व टेबलावर आपली मूठ आपटून फौजेंतील दोन्ही पक्षानीं एकजुटीने वागलें पाहिजे, असें बजावून सागितलें. फौजेवरील अधिकाऱ्यातच अशी बेदिली उत्पन्न होईल तर लष्करातील शिस्तीवरही त्याचा परिणाम होईल हे तो जाणून होता. अधिकाऱ्यातील मतभेद तळाशीं उतरलें तर सैनिकातही उजवे डावे गट निर्माण होतील. सामान्य सैनिक साहजिकच डाव्या गटात जाऊन मिळण्याचा सभव असल्यामुळे सैन्यात वाढत चाललेल्या डाव्या विचारसरणीला आळा घालणें कठिण होईल, हेंही त्याला पक्कें कळून चुकले होते.

शिवाय चिआङ्ला या ऐक्याची आवश्यकता आणखी कशाकरिता भासत होती ! चिआङ् श्रीमतीकडे झुकणाऱ्या मध्यम वर्गात जन्मला होता. ऐन तारुण्याच्या भरात सन्यत्सेननें त्याला हाताशीं धरला व राष्ट्रीयसरकारतर्फे त्याला लष्करी शिक्षण घेण्याकरता मास्कोला पाठविण्यात आलें. चीनमध्यें निघालेल्या लष्करी विद्यापीठाचा तो मुख्याधिकारी बनला व सन्यत्सेनच्या निधनानतर वयाच्या ३५ व्या वर्षी तो चीनी राष्ट्रीय सैन्याचा सेनापतीहि झाला. याप्रमाणें झपाट्यानें अधिकाधिक महत्वाचे अधिकार मिळत गेल्यामुळें चिआङ्ला आपलें हें स्थान टिकविण्याची लालसा उत्पन्न व्हावी, हें साहजिक होतें व ती पूर्ण करण्याकरता राष्ट्रीय लष्करात त्याला ऐक्य पाहिजे होतें. केवळ राष्ट्रीय लष्करातच नव्हे तर सन्यत्सेननें प्रस्थापित केलेल्या कुओमिन्ताङ्मध्यें सर्व पक्षानीं एकोप्यानें राहणें आवश्यक आहे असे तो प्रतिपादूं लागला होता. आपले स्थान स्थिर करण्यासाठीं त्याला कम्यूनिस्टाची गरज होती. किसान–कामगाराच्या सघटनेची जरूर होती. सोव्हिएट सल्लागाराची व सोव्हिएटकडून मिळणाऱ्या नैतिक व भौतिक पाठिंब्याची आवश्यकता त्याला भासत होती. सार्वजनिक रीतीनें आपलें मत जाहीर करण्याचा प्रसग आला कीं, " जागतिक क्रातीचा विजय असो. " या घोषणेनें तो आपलें भाषण संपवीत होता. त्याच्या या धोरणामुळे सोव्हिएट यूनियनमार्फत चीनला आलेला बोरोदिनही चिआङ्वर भाळून गेला होता. बोरोदिनचा सल्ला घेणें म्हणजे सन्यत्सेनचाच सल्ला घेण्यासारखें आहे, असें तो बोलून दाखवीत होता. " सोव्हिएट यूनियनशीं

आमची दोस्ती म्हणजे जागतिक साम्राज्यवादाविरुद्ध लढणाऱ्या सर्व क्रांतिकारक पक्षाशीं दोस्ती होय." असे कुओमिन्ताङ कॉंग्रेसमध्यें त्याने जाहीर रीतीनें सांगितलें होतें आणि कुओमिन्ताङमध्यें कधींही फूट पडता कामा नये, चीनची क्रांति स्थिर करणारा तो एकच पक्ष आहे, असें सांगून कुओमिन्ताङशीं आपण एकनिष्ठ राहणार असल्याचेंही त्याने दाखवून दिलें होतें, अशा परिस्थितींत चिआङच्या विरुद्ध टीका करणं म्हणजे कुओमिन्ताङविरुद्ध टीका करण्यासारखे आहे, असें वातावरण त्याने निर्माण करून ठेवलें होतें.

" राष्ट्रीय क्रांति, तीन लोकतत्वे व कम्यूनिझम या ध्येयाकरिता जे बळी पडले त्या वीराबरोबर कबरस्थानात मीही निजण्यास तयार आहे. डॉ. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वाशिवाय क्रांति होणेंच शक्य नाहीं. त्याच प्रमाणें अतरराष्ट्रीय क्रातीला कम्यूनिझमकडे काना डोळा करूनही चालणार नाहीं. चीनी क्रांति जागतिक क्रांतीचाच एक भाग आहे, ही गोष्ट आपण नाकारू शकत नाहीं. तीन लोकतत्वाना अमलात आणणें म्हणजेच कम्यूनिझम अमलात आणण्यासारखें आहे. चीनी क्रांति जागतिक क्रांतीपासून वेगळी होऊ शकत नाहीं, याची जाणीव असल्यावर तीन लोकतत्वें व कम्यूनिझम याच्या बाबतीत आपण आपसात काय म्हणून झगडत राहवें ?" असें जाहीर उद्गार चिआङनें काढल्यावर कम्यूनिझमविरूद्ध चिआङ कायी शेक कधीं काळीं हत्यार उपशील, असें कोणाला वाटले असेल ?

पण चिआङनें डॉ. सन्यत्सेनच्या शिष्यत्वाचा व कम्यूनिझमच्या पुरस्काराचा घेतलेला बुरखा प्रसंग येताच उघड उघड फाडून टाकला व उजव्या गटातील भांडवलदार जमीनदाराशीं सगनमत करून कम्यूनिस्टाना नायनाट करण्याचा चग बाधला. चिनी राष्ट्रीय क्रांति यशस्वी व्हावयाची असेल तर कुओमिन्ताङमध्यें फूट पडता कामा नये व चिआङ शेकसारख्या कुओमिन्ताङच्या पुढाऱ्यावर टीका करता कामा नये, असें धोरण कम्यूनिस्टानीं ठेवलें होतें. सोव्हिएट यूनियनच्या कम्यूनिस्ट पार्टीनेंही कुओमिन्ताङच्या दुसऱ्या कॉंग्रेसला पुढील तार पाठविली होती. " जगातील पहिल्या विजयी कामगार क्रांतीला मार्गदर्शन करण्याचें ऐतिहासिक व अभिमानाचें

काम आमच्या पक्षाकडे सोपविण्यात आलें आहे. आमची खात्री झाली आहे कीं, कुओमिन्ताङ पूर्वेकडील देशातील हें काम यशस्वीरीतीनें पार पाडील व आशियातील साम्राज्यशाहीचा नायनाट करील. कुओमिन्ताङ आपलें हें कर्तव्य बजावण्याकरता कामगाराशीं व शेतकऱ्याशीं दोस्ती करील व त्याच्या हितसबधाच्या रक्षणाकरता जागरूक राहील."

पण कुओमिन्ताङ्मध्ये उजवे व डावे गट पडले. आजवर आपल्या वेळोवेळींच्या जाहीर निवेदनानीं जनतेचा विश्वास सपादन केलेल्या कुओमिन्ताङ्च्या एकमेव पुढाऱ्यानें आपली पगडी फिरविली. १९२५ च्या मार्च व एप्रिलमध्यें कॅन्टन व शाघाय येथें कम्यूनिस्टाचें कामगारावरील वजन कमी करण्याकरता अनेक कम्यूनिस्ट पुढाऱ्याना पकडण्यात आलें. कित्येकाना फासावर लटकावण्यात आलें. त्याच्या ताब्यातल्या कामगाराच्या युनियनच्याही कचेऱ्याची मोडतोड करून चिआङ काय़ी शेकच्या लष्कराने त्या आपल्या ताब्यात घेतल्या. जुलै महिन्याच्या अखेरीस चिआङ्नें कॅन्टन-मध्ये लष्करी कायदा पुकारला. सर्व सार्वजनिक सस्था, सभा, वर्तमान पत्रे, कामगार-शेतकऱ्याचीं स्वयसेवक दलें व सघ ही सर्व लष्करी कायद्याच्या नियत्रणाखालीं आलीं. यानतर तीन दिवसानी उत्तरेकडील मोहीम चालू असेपर्यंत कामगारानीं संप किंवा इतर चळवळी करता कामा नयेत, असा हूकुम काढण्यात आला. आगष्ट ९ रोजीं सरकारच्या विद्यमानें नेमण्यात आलेल्या लवाद कोर्टापुढे कामगारानीं आपल्या तक्रारी व मागण्या माडाव्या, असा हुकुम काढून सक्तीचा लवाद कामगारावर लादण्यात आला. काम-गारानीं कोणत्याही आकाराचें शस्त्र वापरता कामा नये, एकत्र जमून सभा घेता कामा नये किंवा मिरवणूकही काढता कामा नये असे हूकुम काढण्यात आलें. कॅन्टन, हॉङ्कॉङ् व शाघायमधील कामगाराचे सघ दडपून टाकण्या-करता चिआङ्नें लष्कराचाही उपयोग केला व सपवाल्यावर निर्दय-पणाचे हल्ले चढविले.

**शाघायचा सार्वत्रिक संप**—शाघाय तर सपाचें आगर बनलें होतें. १९२६ सालीं शाघायमध्ये १६५ कारखान्यातून व कपन्यातून १६९ संप झाले व त्यापैकीं शे. ५३ वर सप यशस्वी झाले या यशाकरता संप-

वाल्याना फारच किंमत द्यावी लागली. शांघाय जनरल लेबर यूनियन ही संस्था बेकायदा ठरविण्यात आली होती तरी अंतस्थरीतीने तिनें आपलें काम चालू ठेवले होतें. कामगारांची एकजूट मोडण्याकरता संपवाल्या पुढाऱ्याना अटक करणें व दंडपशाही करून संप निकालात काढणे, हा सरकारचा नेहमीचाच तरीका असतो आणि सरकारच्या या धोरणामुळे संपाना राजकीय स्वरूप प्राप्त होतें. शांघायचे संपवाले त्याच्याही पुढे गेले व त्यानीं शांघाय व त्याच्या आसपासचा मुलूख आपल्या कबजात घेण्याचा विचार चालविला. संपवाल्यांच्या या बेताला किआंडमधील एका लष्करी तुकडीने साथ दिली व बंडाचे निशाण उभारले. पण या तुकडीवरील सेनापति सन चुआंड फेंड त्यानें तें ताबडतोब मोडून काढलें. बंडाच्या पराभवाची बातमी शांघायला पोंचण्यापूर्वी रात्रींच पूर्व योजनेप्रमाणें संपवाल्यांतील कम्यूनिस्ट कामगारानीं पोलिस चौक्यावर हल्ले चढविले. पोलिसांच्या संख्याबलापुढे त्यांचें काहीं चाललें नाहीं. पोलिसांच्या दंडपशाहीच्या निषेधार्थ कामगारानीं जनरल लेबर यूनियन व कम्यूनिस्ट यांच्या नेतृत्वाखालीं ( २८ नोव्हेंबर १९२७ ) पासून डिसेंबर १२ पर्यंत प्रचंड सभा घेतल्या व निदर्शनें केलीं. कामगारांच्या या आकस्मिक उठावामुळें ब्रिटिश व अमेरिकन वसाहतींतील लोक घाबरून गेले. त्यानीं आपल्या वसाहतीच्या संरक्षणाकरता काटेरी तारांचीं कुंपणें घातलीं व तटबंदी उभी केली. शांघायमधील पोलिस कामगारांच्या या उठावाला थोपवू शकले नाहींत. ही संधी साधून जनरल लेबर यूनियनने सार्वत्रिक संपाची घोषणा केली. एकाद्या यंत्राप्रमाणें काटेकोरपणें कामगारानीं या घोषणेची अंमलबजावणी केली. अठ्ठेचाळीस तासात ३५०,००० कामगार आपल्या कारखान्यातून बाहेर पडले. ट्रॅमगाड्या बंद पडल्या, जहाजें किनाऱ्यावर जागच्या जागीं थोपून राहिलीं. पोस्टांच्या कचेऱ्याना कुलपें लागली. कारखान्यांतील एंन्जिनानीं शिटावर शिटा फुकल्या पण एकही कामगार कामावर गेला नाहीं. “ नागरिकांचें प्रतिनिधी मंडळ ” ही संपवाल्यांची घोषणा होती.

**शांघांयची कत्तल**—शहरातील पोलिसांच्या मदतीला आंतरराष्ट्रीय व फ्रेंच वसाहतींतील पोलिस येऊन मिळाले. कारखानदार व कम्यूनिस्ट

पुढारी याच्यात तडजोडीच्या वाटाघाटी सुरू झाल्या होत्या. पण तिन्ही ठिकाणच्या एकत्र मिळालेल्या पोलिसानीं निर्णयाची वाट पाहिली नाहीं. संपाचीं पत्रके वाटणाऱ्या कामगाराना व विद्यार्थ्याना त्यानीं अटक केली व रस्त्यावर जागच्या जागीं त्याच्यावर गोळ्या झाडून त्याना ठार केलें. शांघायचे पोलिस ली पाव चाङ्च्या हुकुमतीखालीं होते. लीनें नग्या तरवारी घेतलेल्या पोलिसाच्या तुकड्या शहरातल्या रस्त्यारस्त्यावर पाठविल्या. वाटेंत भेटतील त्याची कत्तल करीत हे सरकारी मारेकरी रस्त्यातून फिरत होते. रस्त्यावरील दुकानावर या पोलिसानीं हल्ले चढविले. हातगाड्यावर माल ठेवून फिरणारे फेरीवालेही या पोलिस मारेकऱ्याच्या तडाक्यातून सुटले नाहींत. शहरातील पूतुङ् नावाच्या एका भागात एक फेरीवाला " माय ता पिङ् " ( मी मोठे पाव विकतो ) असे ओरडत चालला होता. पण पोलिसानीं हा फेरीवाला "ता पाय पिङ्" (माघार घ्या, माघार घ्या.) असे ओरडत आहे,असें ठरवून त्याला गोळी घालून ठार केलें. एक ट्राम कंडक्टर व दोन धातू कारखान्यातील मजूर हॅडबिले वाटीत होते त्याना जागच्या जागीं ठार करण्यात आले. पश्चिम दरवाजावर भिंतीवर चिकटविलेले रंगीत वॉलपोस्टर वाचीत उभे असलेल्या लोकाना पकडून फासावर लटकण्यात आले. वसाहतीबाहेरील शहराच्या भागात लोकाच्या गर्दीत बोलत उभे असलेल्या तीन विद्यार्थ्यांना निर्दयपणे ठार मारण्यात आले. याप्रमाणे दोनशेवर लोकाना कठस्नान घालण्यात आलें. पोलिस अधिकाऱ्याचे एवढ्याने समाधान झाले नाहीं. दहशत बसविण्याकरता उंच काठ्यावर ठार मारलेल्या कामगाराची शिरें बांधून रस्त्यारस्त्यातून तीं मिरविण्यात आलीं.या अत्याचारामुळें कामगार अधिकच चवताळले. रस्तोरस्तीं कामगार व लष्करी शिपायी याच्यात जोराच्या चकमकी झाल्या. कामगारानीं हा लढा सुरू होण्यापूर्वीच आत्मसंरक्षणासाठीं हत्यारें जमविलीं होतीं. कम्युनिस्ट पुढाऱ्यानींही फेब्रुवारी २२ रोजीं संध्याकाळीं सहा वाजता कामगारानीं एकजुटीनें पोलिसावर हल्ला करावा, असे ठरविलें. ही चकमक फारच जोराची झाली व त्यात पोलिसाना हार खावी लागली. सार्वत्रिक संपाचा हा तिसरा होता. कामगारानीं पोलिसाशीं दोन हात करण्यात यश मिळविलें होतें. तरी या चकमकींत कामगाराचीच विशेष

प्राणहानी झाली व सर्व रस्ते कामगाराच्या रक्तानीं व मस्तकानीं भरून गेले. पण या पुढल्या दोन दिवसात कामगाराचा हा आवेश टिकला नाहीं. इकडे कम्युनिस्ट पुढाऱ्याबरोबर कारखानदाराचे प्रतिनिधी वाटाघाटी करीत होते. पण पोलिसाच्या अत्याचारापुढे कामगार तग धरू शकले नाहींत यामुळें कामगारानीं केलेला उठाव विरघळला व त्याबरोबरच साहजिकच वाटाघाटीही विरघळल्या.

**शांघायमधील दुसरा उठाव**—उत्तरेकडून रिकाम्या झालेल्या राष्ट्रीय सैन्याच्या तीन तुकड्या शाघायच्या रोखानें चालून येत होत्या. "शाघायवर हल्ला चढवू नका. तेथील साम्राज्यवाद्याबरोबर कटकट उत्पन्न करूं नका, थाबा" अशा तारा चिआङ् कायी शेककडून या पलटणीच्या अधिकाऱ्याकडे गेल्या. पण शहरातील कामगाराना थाबून राहण्याचे काहींच कारण नव्हतें. राष्ट्रीय लष्कर शाघायला इतक्यात येत नाहीं, असें पाहून जनरल लेबर युनियनने सार्वत्रिक सपाची पुन्हा घोषणा केली. एका महिन्यापूर्वी झालेल्या उठवाच्या आठवणी अजून बुजल्या नव्हत्या. पोलिसानीं केलेल्या अत्याचाराचा राग कामगाराच्या मनात डाचत होता. २१ मार्च (१९२७) रोजीं दोन प्रहरीं या सपाला सुरुवात झाली. शाघायमधील चिनी व्यपाऱ्यानीं व कारखानदारानीं उत्तरेकडील लष्कराचा अधिकारी लि पायी चुङ सी याला तारा केल्या पण चिआङच्या हुकुमाप्रमाणें त्यानें शाघायला येण्याचें नाकारलें.

पण शाघायमधील पोलिस लष्कराकरता मुळींच अडून राहिले नाहींत. शिरस्त्याप्रमाणें गिरण्याच्या दुपारच्या शिटा एकामागून वाजू लागल्या. व ठिकठिकाणीं जमाव करून राहिलेल्या सपावाल्यावर गोळ्याचे वर्षाव सुरू झाले. एक महिन्यापूर्वीच्या सपापेक्षाही या संपाचें स्वरूप अधिक व्यापक होतें. शाघायमधील प्रत्येक कामगार रस्त्यावर जमलेल्या सपवाल्याना येऊन मिळाला होता. दुकानांतील नोकर व भिकाऱ्याच्या टोळयाही या गर्दीत सामील झाल्या होत्या. ५००,००० ते ८००,००० कामगार या संपात सामील झाले होते. सपवाल्यानीं या खेपेला प्रतिकाराची तयारी चगल्याप्रकारें केली होती. कवाईत व बंदूक वापरण्यास शिकलेल्या ५००० निवडक कामगाराची

तुकडी पोलिसाचा प्रतिकार करण्यास सिद्ध ठेवण्यात आली होती. वीसाच्या व तीसाच्या हत्यारबंद कामगाराच्या तुकड्या करून मान्याच्या जागीं त्याना ठेवण्यात आले होतें. कवाइती कामगारापाशीं भरपूर हत्यारे होतीं त्याच्या जवळच्या हत्यारात मॉसर पिस्तुलेंच जास्त होतीं. शहरातील सात भागात एकाच वेळीं लढ्याला सुरुवात झाली. कामगाराचा भरवस्तीचा भाग चापेईखेरीज करून बाकी सर्व भागातील पोलिस चौक्या संपवाल्यानीं रात्र पडायच्या आतच आपल्या कबजात घेतल्या. पुष्कळ सोल्जरानीं व पोलिसानीं आपले यूनिफार्म फाडून टाकलें व आपल्या जवळचा दारूगोळा संपवाल्याच्या स्वाधीन केला. इतर भागातील पोलिसाकडूनही कामगारानीं हत्यारे मिळविलीं होतीं यामुळे संपवाल्याच्या कवाइती तुकड्यापाशीं आता हत्याराचा चागला पुरवठा झाला होता. पोलिस चौक्याच्याभोवतीं मेढेकोट ( बॅरीकेड ) उभे करण्याकरता घरातील लाकडी सामान, बाके, पेट्या, रस्त्यावर रचण्यात आल्या. दरवाजाच्या बिजागऱ्या मोडून टाकून त्याचाही हे मेढेकोट उभारण्यात उपयोग करण्यात आला. संपवाल्या कामगाराना अन्नाचा पुरवठा करण्याकरता या भागातील छोट्या व धुरकटलेल्या हॉटेलातून जणू काय चढाओढ चालली. स्त्रिया ऊन ऊन भाताच्या थाळ्या पोलिसाबरोबर लढत असलेल्या कामगाराना पोंचवीत होत्या. स्त्री व पुरुष कामगारानीं उजव्या हाताच्या दंडावर तांबड्या रुंद फिती बाधल्या होत्या. नवीन कामगार सैनिकाची ही निशाणीच होती. जवळ जवळ ५०,००० कामगार चापेईवर चालून गेले. याङत्सी पू नावाचा शहराचा एक भाग त्यानीं आपल्या कबजात घेतला व तेथून तीनतुङान नावाचें दुसरें एक ठाणे गाठले. पश्चिम शाघायमध्येही हाच प्रकार घडून आला. तेथील पोलीस चौक्या व त्यातील हत्यारें ताब्यात घेतल्यावर पुतू रोडवरील कामगाराच्या पहारेकरी तुकड्याना ते जाऊन मिळाले. चापेईच्या मध्यावर असलेल्या नॉर्थ स्टेशनवर भयंकर जोराची लढत झाली. रात्र पडल्यानंतर चापेईमधील रस्त्यारस्त्यावर सफेत रशियनाच्या भाडोत्री लष्कराबरोबर कामगाराच्या चकमकी झाल्या. या लष्करानें चिलखती गाड्यातून कामगारावर गोळ्याचा वर्षाव केला पण कामगारानीं या हल्ल्यानाही दाद दिली नाहीं. शाघायमधील

सर्व भाग कामगारांनीं आपल्या ताब्यात घेतला तरी कमर्शिअल प्रेसचा भाग अद्याप त्यांच्या ताब्यात आलेला नव्हता. या ठिकाणच्या संरक्षक तुकड्या-तील लष्करी शिपायांनीं कामगारावर मशिनगनचा मारा केला. लष्करी शिपायाच्या या क्रूरपणामुळें त्या भागातील नागरिक जनताही संतापून गेली. कामगाराच्या रक्षणाकरता त्यांनीं आपलीं घरें मोकळीं करून दिलीं. घराचा आश्रय करून लष्करी शिपायावर कामगारांनीं प्रतिहल्ला चढविला. नागरिकाच्या घरादारावर तोफाचा मारा करण्यास लष्करी शिपाई धजले नाहींत. २२ मार्च रोजीं सकाळीं कामगारांनीं कमर्शियल प्रेसवर चढाई केली व दोन प्रहरीं त्याच्यावर आपला कबजा बसविला. कमर्शियल प्रेस कामगाराच्या ताब्यात गेल्यावर त्याच्या सरक्षणास असलेल्या सफेत रशि-यनाच्या तुकड्या वसाहतीच्या भागात पळून गेल्या. याप्रमाणे शाघायचे सर्व भाग एकामागून एक कामगाराच्या कबजात गेले.

चिआङ् कायी शेक उत्तरेच्या मोहिमेहून परत आला व नान्किङ-कडे न जाता तो शाघायलाच उतरला. सर्व शाघाय कामगाराच्या कबजात असलेलें त्यानें पाहिले. आपल्या स्वतःच्या सामर्थ्यावर जिंकलेल्या शाघा-यचें सरक्षण करण्यास पांच लाखावर कामगार तयार होते. पोलिसच्या ऐवजी कामगाराचे २,७०० स्वयसेवक शहराचा बदोबस्त करीत होते. १,७०० रायफली व काहीं मशीनगन्स या स्वयसेवकापाशीं होत्या. उत्तरे-कडील लष्करापासून काबीज केलेला बराच दारूगोळाही या स्वयसेवकापाशीं-होता. याप्रमाणे आपल्याला वाटेल तेव्हा वाटेल तेवढे लष्कर उभारण्याची त्यांनीं तयारी ठेवली होती. यूनियनचा हुकूम मानण्यास शहरातील प्रत्येक कामगार स्त्री-पुरुष एका पायावर तयार होतीं. जनरल लेबर यूनियननें या सर्व परिस्थितीचा फायदा घेऊन हगामी सरकार स्थापन केलें. यूनियनमध्ये कम्यूनिस्टाचें वर्चस्व असल्यामुळे हें सरकार त्याच्याच नियत्रणाखालीं होतें. शाघायमधील कामगाराच्या जोरावर शाघायच्या आजूबाजूच्या प्रदेशावर ताबा बसविण्याची तयारी कम्यूनिस्टानीं केली होती.

चिआङ् कायी शेक शाघायमध्ये दाखल झाला त्यावेळीं त्याच्या जवळ फक्त ३००० शिपायाची लष्करी तुकडी होती आणि हे शिपायी

देखील कामगाराना केव्हा जाऊन मिळतील याचा नेम नव्हता. पाच तासाच्या अंतरावर हॅङ चौ येथें हो यिङ् चिन याच्या हाताखालीं १०,००० चें लष्कर होतें. कम्यूनिस्टांच्या प्रचारामुळें हे लष्करही आपल्या कितपत उपयोगी पडेल, याचीही चिआङला शंका वाटत होती. अशा परिस्थितींत कामगाराविरूद्ध प्रतिहल्ला चढवून कम्यूनिस्टांचा कांटा काढण्याचा आपला बेत सिद्धीस जाणार नाहीं, ही गोष्ट चिआङला पूर्णपणें समजली होती. कामगाराचा वाढता जोर पाहून परकीयांचे धाबे दणाणून गेले होते. कामगाराच्याविरुद्ध आपण कांहीं हालचाल केली तर आपल्या हाताखालचे नोकरच आपला फडशा उडवतील, अशी भीति त्याना वाटत होती.

**चिआङ कायी शेकचें धोरण**—"चिआङ कायी शेक यावेळी आपलें वजन कोणत्या पारड्यात टाकतो हे पाहिले पाहिजे. तो यावेळीं स्वस्थ बसेल तर त्याचा पक्ष आपल्या सर्व सेनापतींसह कम्यूनिस्ट पक्षात विलीन होण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे. लाल बावटेवाल्यापासून आपल्या देशबांधवाचें रक्षण करावयाचे असल तर चिआङ्नें यावेळीं निर्दयपणें तडकाफडकीचा उपाय योजला पाहिजे. स्वदेशाचा रक्षणकर्ता या नात्यानें डॉ. सन्यत्सेनच्या सत्यतत्वाचा पुरस्कार चिआङ् करतो कीं लाल बावटेवाल्याच्या चीनमध्ये उसळलेल्या महापुरात वाहून जातो ? चिआङ कायी शेक यावेळीं कोणतें धोरण स्वीकारतो ?" असे सडेतोड सवाल कुओमिन्ताङमधील उजव्या गटातर्फे व परकीय वसाहतवाल्यातर्फे केले जात होते.

शांघायच्या दक्षिण भागात चिआङ आपलें लष्करी ठाणे देऊन बसला होता. वरील प्रश्नानें त्याच्याही डोक्यात खळबळ उडवून दिली होती परकीय पत्रकाराच्या बातमीदाराबरोबर झालेल्या मुलाखतींत या प्रश्नावर प्रकाश पडेल असे विचार तो प्रकट करू लागला होता नान्किङमध्यें झालेल्या घटनासंबंधाने त्यानें या बातमीदारापाशीं दिलगिरी प्रदर्शित केली व या बाबतींत जबाबदार असलेल्या लोकाना शिक्षा केल्या जातील असें त्याने आश्वासन दिले. "चीनमधील राष्ट्रीयपक्षाचे लोक परकीय राष्ट्राचे स्नेही आहेत. सक्तीनें किंवा सामुदायिक अत्याचार करून परकीय वसाहतवाल्याच्या बाबतींत कसलाही बदल घडवून आणण्याची त्याची

इच्छा नाहीं." असे आपलें मत त्यानें या बातमीदारापाशीं प्रदर्शित केले. चिआड कायी शेक आपलें हें धोरण अमलात आणील, अशी आशा 'नॉर्थ-चायना डेली न्यूज' सारख्या परकीय वर्तमान पत्रातून प्रकट करण्यात येऊं लागली. चिनी बॅंकवाल्याना व कारखानदाराना चिआड कायी शेक आपलाच माणूस आहे, असे वाटत होतें. १९ मार्च ( १९२७ ) रोजीं शांघायमधील पन्नास बॅंकवाल्यानीं व कारखानदारानीं आपला संघ स्थापन केला व त्याच्यातर्फे एक शिष्टमंडळ चिआड्कडे पाठविण्यात आलें. चिआड्नें या शिष्टमंडळाचे मनापासून स्वागत केले. शांघायमध्यें शांतता व व्यवस्था ताबडतोब प्रस्थापित करण्याची किती आवश्यकता आहे, याचें महत्त्व या शिष्टमंडळानें चिआडला पटवून दिलें. या बाबतींत व्यापाऱ्याचाही चिआडला पूर्ण पाठिंबा आहे, असेंही त्यानें आश्वासन दिलें. केवळ शाब्दिक पाठिंब्यात अर्थ नाहीं, प्रत्यक्ष पैसे मोजले पाहिजेत ही गोष्ट चीनमधील पैसेवाले पूर्णपणें जाणून होते. आपला पाठिंबा प्रत्यक्ष रोख पैसे मोजूनच सिद्ध केला पाहिजे, हें लक्षात घेऊन ४ एप्रिल रोजीं चिआडला पहिला हप्ता म्हणून ३०,००,००० डॉलर कर्ज देण्यात आले. पुढें थोड्या दिवसात आणखी ७०,००,००० डॉलराचा दुसरा हप्ता देण्यात आला. याप्रमाणें एकूण १५०,००,००० डॉलराचें कर्ज चिनी बॅंकवाल्यानीं व कारखानदारानीं चिआडला दिले. कम्यूनिस्टाना चिरडून टाकण्याकरता व कामगाराच्या चळवळी हाणून पाडण्याकरता चिआड्वर याप्रमाणे पैशाचा पाऊस पाडण्यात आला होता. याशिवाय दोन आठवड्यानंतर नान्किङ येथें राष्ट्रीय सरकारची प्रस्थापना करण्याकरता ३००,००,००० डॉलराचे आणखी कर्ज त्याला मिळालें तें निराळेच.

शांघायवर आपला ताबा आहे, हें दाखविण्याकरता चिआड्नें आपल्या लष्करी स्टाफपैकीं एका इसमाची पोलिस कमिशनरच्या जागीं नेमणूक केली. आपल्या एका पित्त्याला त्यानें शांघाय भागाचा मॅजिस्ट्रेट नेमले. यानंतर ताबडतोब मार्शल लॉ पुकारण्यात आला. परवाना नसलेल्या कोणत्याही इसमानें आपल्याजवळ हत्यार ठेवता कामा नये, असें जाहीर करण्यात आलें. इतके सगळें केलें तरी कामगारावर प्रत्यक्ष हल्ला चढवून

आपल्या मनातील कम्यूनिस्ट द्वेष प्रकट करण्याची त्याची छाति नव्हती. कम्यूनिस्टाचें जनरल लेबर यूनियनमधील वजन कमी करण्याकरता त्यानें भांडवलवाल्याची नेहमींचीच फूट पाडण्याची युक्ति योजिली. तू युइ चेन नावाच्या आपल्या हस्तकाकरवीं त्याने " कामगार संयुक्त संघ " नावाची एक नवीन कामगार संघटना निर्माण केली. चिआङ्च्या या हस्तकानें या संघाची मदत घेऊन जनरल लेबर यूनियन मोडून काढण्याचा विडाच उचलला होता.शांघायमधले व शांघाय शहराबाहेरचे मवाली त्यानें या संघात सामील करून घेतले होते.पूर्व संकेतानुसार या नव्या संयुक्त कामगार संघातील शेकडो मवाल्यानीं जनरल लेबर युनियनच्या मुख्य ठाण्यावर ३० मार्च रोजीं जोराचा हल्ला चढविला. या हल्ल्यात ज. ले. यू. चे बरेच कामगार कामास आले व अनेकाना जखमा झाल्या. भांडवलवाल्यानी उभारलेल्या या संयुक्त कामगार यूनियनच्या हल्ल्याचा प्रतिकार करण्याकरता दुसरे दिवशीं ज. ले. यु. नें सार्वत्रिक संपाची घोषणा केली. शहरात ठिकठिकाणी संपवाल्या कामगाराच्या प्रचंड सभा भरविण्यात आल्या व नंतर कामगाराची प्रचंड मिरवणूकहि निघाली. शहरातील एका चौकात तयार ठेवलेल्या एका लष्करी तुकडीनें कामगारावर गोळीबार केला. गोळीबारात सहा कामगार ठार झाले व शंभरावर कामगाराना अटक करण्यात आली. विजयी राष्ट्रीय सेनेच्या हालचालींना अडथळा आणण्याकरता ज. ले. यू. चे कामगार प्रयत्न करीत आहेत, अशी या लष्करी तुकडींतील सैनिकाची समजूत करून देण्यात आली होती. या सैनिकानीं युनियनच्या शहरामधील सर्व कचेऱ्या उध्वस्त करून टाकल्या. युनियनतर्फे शहरात ठेवलेले स्वयंसेवक पकडण्यात येऊन त्याचे युनिफॉर्म फाडण्यात आले व त्याना निःशस्त्र करण्यात आले. या गडबडींत किती कामगार ठार झाले, याचा पत्ताही लागला नाहीं.

चिआङ् कायी शेकने नेमलेल्या अधिकाऱ्यानीं त्याच्या अनुमतीशिवायच कामगारावर हा अत्याचार चालविला आहे, अशा समजुतीनें ज. ले. यू नें या अधिकाऱ्याना योग्य त्या शिक्षा देऊन ताळ्यावर आणण्याबद्दल तारेनें विनति केली, पण चिआङनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. शांघायमधील जनतेची चळवळ कोणत्या थरावर पोंचली होती याची पूर्ण कल्पना

चिआङ्ला होती. वूहान सरकारच्या कुओमिन्ताङ्च्या डाव्या गटाशीं किंवा कम्यूनिस्टाशीं कोणत्याही प्रकारची तडजोड करण्याची त्याची इच्छा नव्हती. शांघायमधील कामगारांचें वर्चस्व नष्ट करण्याकरता लागणारें जरूर तें सामर्थ्य संपादन करण्याकरता त्याला वेळ पाहिजे होता. शांघायच्या कामगाराबद्दल व कम्यूनिस्टाबद्दल सहानुभूति वाटणाऱ्या आपल्या लष्करातील सैनिकाना काढून टाकून त्याच्या जागीं आपले हुकूम मानणारे सैनिक त्याला नेमावयाचे होते. कामगार चळवळीची व राजकीय चळवळीची जाणीव नसलेले लष्कर त्याला उभारावयाचें होतें. कम्यूनिस्टविरोधी आघाडी निर्माण करण्याकरता बेकार मवाल्याची लष्करात भरती करण्याचें काम त्याने जारीनें सुरू केलें होतें. ही सर्व तयारी चालू असताना कुओमिन्ताङमध्ये कोणत्याही प्रकारची फूट पडलेली नाहीं, असें तो दाखवीत होता. "कुओमिन्ताङमध्ये मुळींच फूट पडलेली नाहीं. सर्व सभासद एकजूट आहेत व त्याच्यात फूट पडण्याचाही संभव नाहीं." असें पत्रकाराच्या बातमीदाराजवळ त्याने बोलून दाखविले होतें. वूहान मध्यवर्ती कार्यकारी कमिटीचा अधिकार आपण पूर्णपणे मानण्यास तयार आहों, असें जपानी तोजो एजन्सीच्या प्रतिनिधीजवळ जाहीर रीतीनें त्यानें बोलून दाखविलें होतें.

कुओमिन्ताङ पक्षातील एक जबाबदार पुढारी वॅङ चिङ् वी याच सुमारास युरोपहून चीनमध्यें परत आला. त्याच्या आगमनाचा फायदा घेऊन ३ एप्रिल रोजीं चिआङ्नें पुढील मजकुराच्या तारा सर्व देशात पाठविल्या. "वॅङ् परत आल्यामुळे कुओमिन्ताङ्चे बळ आता वाढीस लागेल. देशहिताच्या सर्व बाबी आता त्याच्या मार्गदर्शित्वाखालीं अमलात येतील. कुओमिन्ताङ्च्या मध्यवर्ती कार्यकारी कमिटीचे नेतृत्व व तिच्या आज्ञा आम्हाला मान्य कराव्या लागतील."

चिआङ्चें हें कृत्य वॅङ्ला पसत पडलें नाहीं. कुओमिन्ताङ्मधील कम्यूनिस्टाचे वजन नाहींसें झालें पाहिजे या गोष्टीस वॅङची मान्यता होती. कम्यूनिस्ट पक्षापासून अलग होण्याची आवश्यकता त्याच्या मनालाही पटली होती पण याकरता चिआङनें ज्या तडकाफडकीचा अवलंब करण्याचे

योजलें होतें तो मार्ग त्याला पसंत नव्हता. सर्व काहीं तडजोडीचे व शांततेचे उपाय योजून पाहण्यात यावे, असें त्याचें मत होतें. याच्या उलट तडजोड नव्हे तर मशीनगन्सचाच या कामीं उपयोग करण्याचें चिआङ्ने व त्याच्या साथीदारानीं ठरविलें होतें आणि लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की, याच-वेळीं चिआङ् कायी शेक शांघायच्या कामगारांची लवकरच कत्तल करणार आहे, अशा बातम्या देशात सर्वत्र पसरल्या होत्या. एकीकडे चिआङ कायी शेक कुओमिन्ताङमधील एकीचे गोडवे गात होता व दुसरीकडे वरील बातम्या उठत होत्या. जनरल लेबर यूनियनच्या कामगारांचाही या बातम्या-वर विश्वास बसेना. वॅङ्च्या आगमनानंतर चिआङनें जाहीर रीतीनें कुओ-मिन्ताङमधील एकीसंबंधाचें आपलें धोरण जाहीर केलेंच होतें आणि वरील बातम्यामुळें जनतेचीं मनें चलबिचल होऊं नयेत म्हणून वॅङ चिङ वी व कुओमिन्ताङमधील दुसरा एक पुढारी चेन तू सू यानीं आपल्या दोघाच्या सहीने एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. शांघायच्या कत्तलीच्या अगदीं आदल्या दिवसापर्यंत आपल्या धोरणासंबधानें शांघायच्या जनतेला व काम-गाराना भ्रमात ठेवण्याच्या कटात वॅङ व चेनही सामील होते असें जरी म्हणता येत नसले तरी या जाहीरनाम्याचा परिणाम जनतेला शेवटपर्यंत भ्रमात ठेवण्यांत झाला हें मात्र खरें. हा जाहीरनामा पुढील प्रमाणें होताः—

**ढोंगी जाहीरनामा**—"क्रांतीच्या सामान्य भूमिकेवर आपण नेटानें उभे राहिलें पाहिजे. परस्पराविषयींच्या शंकाना आपल्या मनात वाव देता कामा नये. खोट्या बातम्या उठविण्याच्या प्रकाराचा धिक्कार केला पाहिजे व परस्परासंब-धानें आदर बाळगला पाहिजे. प्रत्येक गोष्ट मोकळेपणानें व उघड उघड चर्चा करून करण्यात आली पाहिजे. आपले राजकीय विचार भिन्न असतील पण तत्वाच्या बाबतींत आपण सर्वांनीं सहमत असलें पाहिजे. भावाभावात जसें प्रेम असतें त्याप्रमाणें दोन्ही पक्षानीं कळकळीच्या सहकार्यानें एकमेकाशीं वागलें पाहिजे. दोन्ही पक्षानीं याचा विचार करावा व क्रांतीचे मित्र निराश होतील व आमच्या शत्रूना आनंद होईल, असें कोणतेंही कृत्य आपल्या हातून होऊं देऊं नये. दोन्ही पक्षाचें यात कल्याण आहे." अशा आशयाचा हा जाहीर नामा होता.

चिआङ्काशी शेकच्या विश्वासातील हस्तक व कुओमिन्ताङ्मधील जबाबदार पुढारी अशा प्रकारचे जाहीरनामे ३ एप्रिल रोजीं प्रसिद्ध करीत असताना १२ एप्रिल रोजीं शांघायमधील कामगारांवर जोराचा हल्ला चढविण्यात येणार आहे व त्यांची कत्तल करण्यात येणार आहे, अशी शंका कोणाच्या मनात कशी येईल ? शांघायमधील कामगारांचा तर या पुढाऱ्यांच्या शब्दावर चांगलाच विश्वास होता. चिआङ्च्या संमतीनें त्याच्या एका हस्तकानें संयुक्त कामगार संघ स्थापून त्यातील मवाल्यांच्या सहाय्याने जनरल लेबर युनियनला मोडून काढण्याचा प्रयत्न केला व यूनियनच्या स्वयंसेवकांना नि:शस्त्र करण्यात आले तरी शांघायचे कामगार मुळींच नामोहरम झाले नव्हते. कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालीं आपल्या विसकटलेल्या संघटनेची त्यानीं पुन्हा जमवाजमव केली. यामुळें २१ मार्च ते १२ एप्रीलपर्यंतच्या तीन आठवड्यात शांघाय जनरल लेबर युनियनच्या सभासदांची संख्या ३५०,००० वरून ८५०,००० पर्यंत झपाट्याने वाढली. कामगारांचें हें वाढते सामर्थ्य पाहून शांघायमधील भांडवलवाल्यांच्या अंतःकरणात भयाचें कांपरें भरलें पण चिआङ्काशे शेक या परिस्थतींतही निर्धास्त होता. कुओमिन्ताङ्मधील एकीसबंधानें वारंवार जाहीर घोषणा करून आपल्या कारस्थानाचा सुगावा त्यानें कोणालाही लागू दिला नव्हता. १२ एप्रिलच्या कत्तलीच्या आदल्या दिवसापर्यंत कामगारांना त्याने एकीच्या भ्रमातच ठेवलें होते. हंगामी सरकारच्या जागीं चिआङ्नें नेमलेल्या हंगामी कमिटीच्या राजकीय खात्यातर्फे पत्रकें प्रसिद्ध करण्यात येत होतीं त्यात ७ एप्रिलपासून ११ एप्रिलपर्यंत “ राष्ट्रीय क्रांतीला मोडूं पाहणाऱ्या प्रतिगाम्यांना हाणून पाडा. ” “ तीन लोकतत्वांना जो कोणी विरोध करील तो क्रांतीचाही शत्रू आहे, असे समजा.” “ पिछाडीच्या फूटपाड्यांना हाणून पाडा. ” “ शांघायच्या नव्या हंगामी कमिटीला पाठिंबा.” “आम्ही लष्करी शिपायी आघाडीवर लढत आहों. पिछाडीवर असलेले कामगार कोणत्याही निमित्तानें अव्यवस्था निर्माण करणार नाहींत. ” अशा घोषणा प्रसिद्ध करण्यात येत होत्या.

याप्रमाणें आपण योजलेल्या हल्ल्याला अनुकूल अशी भ्रमाची भूमिका

चिआङ्नें अगदीं बेमालूमपणे तयार ठेवून योग्य संधीची तो वाट पाहात राहिला होता.

**शांघायमधील दुसरी कत्तल**—१२ एप्रिल रोजीं पहाटे चार वाजता चिआङ्ग कायी शेकच्या मुख्य ठाण्यातला बिगूल वाजला आणि शांघायबंदरात नांगर टाकून थांबून राहिलेल्या गनबोटींनें शहरातील कामगार भागाच्या रोखानें तोफांचा मारा सुरू केला. शहरातील चापेई, नान्ताव व पूतुङ्ग् वगैरे सात भागांवर ठिकठिकाणीं मोक्याच्या जागांवर रोखून ठेवलेल्या मशीन गन्समधून गोळ्यांचा वर्षाव सुरू झाला. या एकाएकीं सुरू झालेल्या हल्ल्याबद्दल कामगारवर्गाखेरीज दुसऱ्या कोणालाच आश्चर्य वाटलें नाहीं. कारण सर्व चिनी परदेशी अधिकाऱ्यांना मध्यरात्रींच गुप्तपणें या हल्ल्यासंबंधाची माहिती देण्यात आली होती. परकीय वसाहतींमधून संयुक्त कामगार संघाचे शेकडो मवाली निळे यूनिफॉर्म घालून या हल्ल्याकरता तयार ठेवण्यात आले होते. या मवाल्यांनीं आपल्या उजव्या दंडावर 'कामगार' या अक्षरांचीं सफेत लेबलें शिवून घेतलीं होतीं. हे सर्व मवाली ठरलेल्या वेळीं वसाहतींतून बाहेर पडले व पाई चुङ सी च्या लष्करी तुकडींत जाऊन मिळाले व त्यांनीं सर्वांनीं मिळून शहरात सर्वत्र पसरलेल्या कामगारांच्या मुख्य ठाण्यांवर व त्यांच्या वस्तींवर हल्ले चढविले. या ठिकाणचे सर्व स्वयंसेवक पकडण्यात आले. त्यांच्या हातातील केवळ शस्त्रेच नव्हे तर त्यांच्या अंगावरील कपडेही काढून घेण्यात आले. या ठिकाणीं ज्या कामगारांनीं प्रतिकार केला त्यांना गोळी घालून तेथल्या तेथे ठार करण्यात आले, बाकीच्यांना घराबाहेर काढून रस्त्यावर आणण्यात आले व तेथें त्यांची कत्तल करण्यात आली.

ज्या ठिकाणीं कामगारांची ताकद जास्त व त्यांचा प्रतिकार जोराचा दिसून आला त्याठिकाणीं लष्करी अधिकाऱ्यांनीं निराळेच डावपेंच लढविले. चापेईमधील जनरल लेबर यूनियनच्या मुख्य ठाण्यावर सकाळीं त्यांनीं हल्ला चढविला. जनरल लेबर यूनियनचीं कांहीं ठाणीं संयुक्त कामगारसंघाच्या मवाल्यांनीं हस्तगत केलीं. तरी यूनियनच्या व कम्यूनिस्टांच्या शहरभर पसरलेल्या संघटना चिआङ्ला नष्ट करता आल्या नाहींत.

चिआङ्नें एकाएकी स्वीकारलेल्या या धोरणामुळें कामगारांचे डोळे उघडले होते तथापि वरील सर्व अत्याचार नवीन स्थापन झालेल्या संयुक्त कामगार संघाच्या मवाल्यांनीं केलेले असल्यामुळे या बाबतींत चिआङ्ला जबाबदार धरला यावयाचें नाहीं असा तटस्थपणाचा बाह्य देखावा त्याच्या साथीदारांनीं कायम ठेवला होता. त्यामुळें शांघायच्या चापेई भागात रात्रीं झालेल्या कामगारांच्या प्रचंड सभेत स्वयंसैनिकांचीं हत्यारें परत देण्यात यावीं अशी चिआङ्च्या हंगामी समितीच्या अधिकाऱ्याकडे पुन्हा विनंती करण्याचा ठराव करण्यात आला. " कामगारांनीं वर्षानुवर्षे सुसंगतपणानें आतापर्यंत राष्ट्रीय सरकाराला मदत केली असून या सरकाराकरताच शांघायचा ताबा घेतला आहे. त्यांनीं नेहमींच शिस्तीचे पालन केलें आहे. राष्ट्रीय सरकारच्या कायद्याप्रमाणे ते आतापर्यंत वागले आहेत इतकेंच नव्हे तर या कायद्यांना पाठिंबाहि दिला आहे. " असें या सभेत कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीं प्रतिपादन केलें.

याच भागात १३ एप्रिल रोजीं दोन प्रहरीं कामगारांची आणखी एक प्रचंड सभा भरविण्यात आली. " स्वयंसैनिकांचीं हत्यारें परत करण्यात यावीं, संयुक्त कामगारसंघाच्या कामगारांना शिक्षा करण्यात यावी आणि जनरल लेबर यूनिअनचें रक्षण करण्यात यावें, अशा आशयाचे ठराव या सभेत करण्यात आले. या ठरावांना अनुसरून एक अर्ज तयार करण्यात आला व जनरल चाउ फेन्शी यांच्याकडे तो सादर करण्याकरता दुसऱ्या डिव्हिजनच्या मुख्य ठाण्याकडे सभेंतील कामगार मिरवणुकीनें निघाले. या मिरवणुकींत बायकामुलेंही सामील झालीं होतीं. कोणत्याही कामगाराच्या हातात कसल्याही प्रकारचे हत्यार नव्हतें. पाऊस पडत होता. मिरवणूक शांतपणे चालली होती. लष्करी ठाणे फार दूर राहिलें नव्हते. इतक्यात या रस्त्यावर सज्ज ठेवलेल्या मशीनगन्समधून मिरवणुकीवर गोळ्यांचा वर्षाव करण्यात आला. मिरवणुकींत जमलेल्या लोकांची पळापळ सुरू झाली. मिरवणूक मोडली तथापि गोळ्यांच्या फेरी एकामागून एक झडतच होत्या. रस्त्यावरून पावसाच्या पाण्यात कामगारांचें रक्त मिसळून त्याचे पाट रस्त्याच्या दोन्ही बाजूला वाहूं लागले. दुसऱ्या डिव्हिजन-

मधील शिपायानीं गल्लोगल्लीं शिरलेल्या कामगाराचा पाठलाग केला. घरातून शिरलेल्या कामगार स्त्रियानासुद्धा बाहेर ओढून त्याना शिपायानीं कापून काढलें. रस्त्यातून मरून पडलेल्या कामगार स्त्री-पुरुषाना व त्याच्या-बरोबर जखमी होऊन पडलेल्या लोकानाही लष्करी लॉऱ्यातून भरण्यात आले. मेलेल्या व जीवत असलेल्या सर्वानाच शहराबाहेर नेऊन पुरून टाकण्यात आलें. तीनशे कामगार मरण पावले व त्यापेक्षाही जास्त कामगार जखमी झाले, असा अंदाज प्रसिद्ध झाला पण या हत्याकाडात बळी पडलेल्या कामगाराची खरी गणति लागली नाहीं.

शाघाय येथील कामगाराच्या या कत्तलीबद्दल चिआङ कायी शेकने दिलागिरी प्रदर्शित केली का ? तसें करण्याचे कारण काय ? उलट शाघायचे कामगार प्रतिगामी आहेत, क्रातिकारक लष्कराच्या पिछाडीला ते अव्यवस्था माजवीत आहेत म्हणून त्याच्यावर गोळीबार करण्यात आला, असा जाहीर नामा चिआङनें प्रसिद्ध केला व क्रातीच्या कार्याचा नाश करण्याकरता उत्तरेकडील सुभेदाराबरोबर कम्यूनिस्ट कट करीत आहेत, असा आरोपही चिआङनें आपल्या या जाहीनाम्यात केला. अरेरावीची व दडपशाही कर-ण्याची चव एकाद्या लष्करी माणसाला लागली कीं, ती अमुक एक मर्यादे-पर्यंतच थाबते असें नाहीं. शाघायमधील कामगाराची व कम्यूनिस्टाची चिआङनें अमानुषपणें कत्तल उडविली व त्यानतर ज्या बड्या व्यापाऱ्यानीं व कारखानदारानीं त्याला कर्ज देण्याचे कबूल केलें होतें त्याच्यामागे तो लागला. कम्यूनिस्टविरोधी मोहीम येथवरच थाबेल असें लोकाना वाटलें होतें पण तसें झालें नाहीं. कम्यूनिस्टाची शिकार करण्याच्या निमित्तानें चागल्या गबर माणसाना पळवून दडवून ठेवण्यात येऊ लागले व मिलिटरी फडाला भरपूर रक्कम दिल्यावरच त्याची सुटका होऊं लागली. चौकशी नाहीं, न्याय नाहीं, लाखोपति लोकावरदेखील ते कम्युनिस्ट आहेत असा आरोप ठेवून पैसा उकळण्यात येऊ लागला. या तडाक्यात कोणाचेंही जीवित सुर-क्षित नव्हतें. कोणावर केव्हा काय प्रसंग येईल याचा नियम नाहीं अशी परिस्थिति चिआङनें शाघायमध्ये निर्माण केली होती. चीनमधील प्रसिद्ध कारखानदार युङ चिङनें कर्जाचे पैसे देण्याच्या बाबतींत थोडीशी काकू

केल्याबरोबर त्याला अटक करण्यात आली. ५,००,००० डॉलर चिआङ त्याच्यापाशी तावडतोब मागत होता पण युङनें २५०,००० डॉलरवर ही कटकट कशी तरी मिटवून घेतली. युङची ही दशा पाहून इतर व्यापाऱ्यांनीं भराभर आपल्या वाटणीचे पैसे देण्यास सुरुवात केली. चिआङने आपल्या वर्गावर असा जुलूम केला तरी कम्युनिस्टांना व त्यांचे अनुयायांना निर्दय-पणानें तो चिरडून टाकीत आहे, हे पाहून त्यांच्या मनाचें समाधानच झाले होतें.

शांघायमधील कामगारांच्या कत्तलीचा प्रकार शांघाय पुरताच थांबला नाहीं. निङपो, फूचाऊ, अमॉय, स्वाटो आणि कॅन्टन या शहरातील चिआङच्या हाताखालील लष्करी साथीदारांनीं त्या त्या ठिकाणीं काम-गारांच्या यूनिअन मोडून टाकण्याकरता तसल्याच रानटी दडपशाही उपा-यांचा अवलंब केला " कुओमिन्ताङमधील मतभेद मिटत चालले आहेत व दोन्ही पक्ष एकजूट होत आहेत." "चिआङने कामगारांचा विश्वासघात केला. तो देशद्रोही बनला." अशा दोन्ही प्रकारच्या बातम्या परदेशातील वर्तमान-पत्रातून प्रसिद्ध झाल्या. या घोटाळ्याचे मुख्य कारण असे कीं, शांघायच्या कत्तलीच्या बातम्या बाहेर परदेशात कोणाला कळू नयेत, अशा प्रकारची खबरदारी चिआङनें घेतली होती

शांघायमधील कामगारांच्या कत्तलीच्या बातम्या ऐकून यूरोपीय साम्राज्यवाद्यांचीं मनें मात्र हर्षभरित झालीं. चिआङ कायी शेकने काम-गारांच्या व कम्यूनिस्टांच्या बाबतींत स्वीकारलेले धोरण त्यांना अर्थातच पसंत पडले. चीनी राजकारणाचा कांटा आता भांडवलशाहीकडे झुकलेला पाहून त्यांना बरें वाटलें. चीनमध्ये चालू असलेली कामगारांची चळवळ हाणून पाडण्याची ताकद त्यांच्यात नव्हती. कामगारांच्या चढाईपुढे त्यांना सारखी हार खावी लागत होती. नान्किङवरील तोफांच्या मारामुळें त्यांना चंचू-प्रवेश करावयास अवकाश मिळाला व चीनी भांडवलशाहीशीं वाटाघाट कर-ण्यास त्यांनीं सुरुवात केली. एप्रिल १२ च्या शांघायच्या कत्तलीमुळें या वाटा-घाटी फलद्रूप होण्याच्या मार्गाला लागल्या. कोणत्याही राष्ट्राचे सामर्थ्य त्याच्या मागें असलेल्या लोकशक्तीत साठविलेले असतें. चिआङ कायी शेक

पाशीं केवढेंही लष्कर असलें तरी कोणतेंही राष्ट्रीय सरकार केवळ लष्कराच्या बळावरच चालू शकत नाहीं. चिनी राष्ट्रीय सरकार तर अद्याप बाल्यावस्थेतच होतें तेव्हा या सरकारात फूट पडलेली पाहून चिनी भांडवलवाल्याशीं आता ते अधिक तोऱ्याने वागू लागले. चिनी किनाऱ्यावरील मोऱ्याच्या जागीं असलेल्या बंदरातील परकीय लष्करात जोराची भरति करण्यात आली. परकीय सैनिकाच्या टोळक्यानीं हीं बंदरें भरून गेलीं. आपल्या आरमारी सामर्थ्याचें प्रदर्शन करण्याकरता ब्रिटिशानीं 'व्हिन्डिक्टिव्ह' नावाचे ९७५० टनाचें क्रूझर २१ एप्रिल रोजीं चीनी समुद्रात आणून उभे केले. हँकौ बंदरात ओळीनें अगोदरच दीड मैलपर्यंत उभ्या असलेल्या पस्तीस युद्धजहाजाच्या ओळींत हें क्रूझरही नागरून उभें करण्यात आले. ब्रिटन, जपान, अमेरिका, फ्रान्स, इटली वगैरे राष्ट्राच्या आरमारातील आणखी कांहीं जहाजें शांघायहून आलीं व या सगळ्या जहाजाची संख्या ४२ पर्यंत गेली. चीनमध्ये घडून येणाऱ्या हालचालींवर अवलंबून राहण्याचा किंवा या हालचालीमुळे आपल्या धोरणाला कितपत पाठिंबा मिळतो, हें पहात बसण्याचे कारण आता राहिलेलें नाहीं, असें बॅरन तानाकाने—जपानच्या नवीन पंतप्रधानाने—टोकियो येथे जाहीर रीतीनें बोलून दाखविले. चिआङ्ग काई शेकनें लालबावटेवाल्याना जो यशस्वी तडाखा मारला आहे त्यामुळें चीनच्या राजकीय परिस्थितींत ज्या प्रकारचा बदल घडून यावा, अशी आशा जपानी मुत्सद्दी करून राहिले होते ती त्याची आशा आता पूर्ण झाली आहे, अशा टोकियोंतील परकीय राष्ट्रातील पत्रकाराच्या प्रतिनिधींनीं आपापल्या पत्राकडे बातम्या पाठविल्या. वूहान सरकारचें वर्चस्व आता कमी झाले आहे व लवकरच ते कायमचे नष्ट झाल्याशिवाय राहत नाहीं. चीनच्या राजकारणात आता पूर्ण बदल घडून आला आहे, अशा आनंदाच्या बातम्या लंडनमध्ये प्रसिद्ध करण्यात आल्या. अमेरिकेच्या राजधानीच्या शहरातील वर्तमान पत्रातून मोठमोठे मथळे देऊन चीनकडील बातम्या प्रसिद्ध होत पण १२ एप्रिलनंतर या बातम्या पत्राच्या मुखपृष्ठावर न येता आतल्या पानातून कोठें तरी छापण्यात येऊ लागल्या.

ब्रिटिशाना वाटलेला आनंद तर ९ मे रोजीं हाऊस ऑफ कॉमन्सच्या

सभेंत परराष्ट्रखात्याचे सेक्रेटरी सर आस्टीन चेंबरलेन याच्या मुखानें प्रकट झाला. "दक्षिणेकडील पक्ष व राष्ट्रीय लष्कर दोघे मिळून दक्षिणोत्तर सर्व चीन पादाक्रात करतील, असे वाटलें होते पण नाकिन्ड्नें (अर्थात् चिआङ् कायीशेकनें) या विजयी मोहिमेला आळा घातला आहे. चिनी राष्ट्रीयानीं आपण होऊनच कम्यूनिस्टाना चागली शिक्षा दिली आहे. इतकी परिणामकारक व निर्दयपणाची शिक्षा कोणतेंही परराष्ट्र देऊ शकलें नसतें. शाघाय, कॅन्टन व इतर शहरातील जहाल संघटना मोडून काढण्यात आल्या असून त्यातून कामें करणाऱ्या पुढाऱ्याना फाशी देण्यात आलें आहे. हॅकौमधील राष्ट्रीय सरकारचे वरचष्म्याचे धोरण हाणून पाडण्यात आलें असून तें केवळ नावापुरतेंच सरकार राहिले आहे." शाघायमधील कामगाराच्या चळवळीला ताबडतोब तोंड द्यावे व आपल्या लष्कराच्या जोरावर त्याना चागली दहशत बसवावी, अशी तेथील ब्रिटिशाची इच्छा होती. चेंबरलेनने या बाबतींतील आपली भूमिका स्पष्ट केली व आपला मुखत्यार म्हणून चिआङ् कायीशेकला वावरूं देण्यात ब्रिटिश साम्राज्यवाद्याचें समाधान होईल, असेंही त्यानें सागितलें. यानंतर लवकरच हॅकौ येथील आपला ब्रिटिश प्रतिनिधी परत बोलावून वूहान सरकारशीं असलेला राजकीय सबध ब्रिटिश मुत्सद्द्यानीं तोडून टाकला.

---

# कॅन्टन् कम्यून

**कामगार संघांवर दंडपशाही**—चिआङ् काय्शी शेकनें १२ एप्रिल १९२७ रोजीं शांघाय येथे कामगारांची कत्तल केली व तेथील कामगार संघटनेचा धुव्वा उडविला. त्यावेळीं दक्षिणेतील सुभेदार ली चि सन् याच्या ताब्यात क्वाङ्तुङ् प्रांत होता. राष्ट्रीय सरकारचें ठाणें नान्किङहून हँकौला गेलें व चिआङ् काय्शी शेकच्या सेनापतित्वाखालीं चिनी फौजा उत्तरेकडील मोहिमेवर निघाल्या त्यावेळींच ली चि सनूनें क्वाङ्तुङ्वर आपला कबजा पूर्णपणें जमविला होता. ली चि सन् लष्करी अरेराव होता. आपल्या हातांत आलेली एका सबंध प्रांतावरील सत्ता तो गमावण्यास तयार नव्हता. क्वाङ्तुङ्वर आपल्या सत्तेची जमवाजमव होताच त्यानें साहजिकच त्या भागांतील कामगार संघटनांवर हत्यार उचललें व त्यांचा संप करण्याचा हक्क काढून घेऊन सक्तीची लवादपद्धति त्यांच्यावर लादली. १२ एप्रिलच्या शांघाय कत्तलीच्या बातम्या कानीं पडताच त्याच्या हातांत कोलित मिळाल्यासारखेंच झालें. १५ एप्रिल रोजीं चिआङ्प्रमाणें आपल्या प्रांतांतील कम्यूनिस्टांचेंही समूळ उच्चाटण करण्याचें त्यानें ठरविलें. कायदेशीर असलेल्या सर्व कामगार संघटनांवर छापे घालण्यांत आले व त्या बंद करण्यांत आल्या. दोन हजारांवर कामगारांना अटक करण्यांत आली. यांपैकीं शंभर स्त्री-पुरुष कामगार ठार करण्यांत आले. त्यांपैकीं बहुतेक सगळे कम्यूनिस्ट होते. आदल्या वर्षाच्या आक्टोबरमध्यें झालेल्या कॅन्टन हाँङ्कॉङ्मधील संपवाल्या स्वयंसैनिकांचीं पथकें संप मोडून गेला तरी अद्याप अस्तित्वांत होतीं. हीं पथकें ली चि सन्च्या डोळ्यांत खुपत होतीं. जोराच्या चकमकी झडल्यानंतरच या स्वयंसैनिकांना निःशस्त्र करतां आलें. कम्यूनिस्टांच्या नेतृत्वाला मान देणाऱ्या दोन हजार रेल्वे कामगारांना कामावरून काढून टाकण्यांत आलें आणि प्रतिगामी लोकांच्या ताब्यांत असलेल्या मेकॅनिक यूनियनमधील कामगारांना त्यांच्या जागीं घेण्यांत आलें. ली चि सनूनें चिआङ्चें आणखी एका बाबतींत अगदीं बरोबर अनुकरण केलें. कामगार संघटनेचा देखावा

कायम ठेवण्याकरता ट्रेड यूनियन-पुनर्घटना-कमिट्या त्याने स्थापन केल्या. क्वाड्-तुङ प्रांतातील इतर शहरातूनही अशीच दडपशाही करण्यात आली. खेड्यापाड्यातून शेतकरी संघावर लष्करी शिपायांनीं छापे घातले. संघातर्फे काहीं ठिकाणीं या हल्लयाचा प्रतिकार करण्यात आला. पण काहीं ठिकाणचे शेतकरी संघ अजीबात चिरडून टाकण्यात आले.

ली चि सन्‌च्या दडपशाहीच्या धोरणाचा निषेध करण्याकरता कम्यूनिस्टांनीं सार्वत्रिक संपाची घोषणा केली पण तो यशस्वी झाला नाहीं. क्वाड्तुङ् प्रांतातील बहुतेक कम्यूनिस्टांना भूमिगत व्हावें लागलें. पगारवाढ, कामाचे तास व कामगारांची राहणी वगैरेंच्या बाबतींत सहा महिन्यापूर्वी सार्वत्रिक संप लढवून कामगारांनी ज्या सवलती मिळविल्या होत्या त्या सर्व कारखानदारांनीं काढून घेतल्या. सर्व धंद्यातील दोन लाख कामगारांचें प्रतिनिधीभूत असलेलें क्वाङ्तुङ् कामगार प्रतिनिधीमंडळ लुप्त झालें व त्याची जागा बेकायदेशीर "स्पेशल कमिटीने" घेतली. पूर्वीच्या मंडळातील व काहीं नवीन निवडलेले प्रतिनिधी या स्पेशल कमिटींत घेण्यात आले होते. कॅन्टनमधील शंभर कामगार संघाचे काम ही कमिटी गुप्तपणे चालवीत होती.

**कम्यूनिस्टांचा पहिला उठाव**—क्वाङ्तुङ प्रांत ली चि सन्‌च्या ताब्यात होता तरी या सत्तेच्या विभागणींत वँङ् चिङ् वीचा दोस्त चँङ फा कुई नावाचा एक सुभेदार त्याचा प्रतिस्पर्धी बनला होता आणि या दोघात लवकरच लढाई जुंपण्याचा प्रसंग प्राप्त झाला होता. या आपसातील यादवीचा फायदा घेण्याचें शांघायमधील कम्यूनिस्ट मध्यवर्ती कमिटीने ठरविलें व क्वाङतुङमधील कम्यूनिस्ट प्रांतिक शाखेला पुढील आदेश पाठविला. "ली चि सन्‌च्या दडपशाहीला तोंड द्यावयाचें असेल तर क्वाङ्तुङ्मधील शेतकरी कामगार जनतेला आता एकच मार्ग उरला आहे व तो म्हणजे या आपसातील युद्धात होणाऱ्या कत्तलीची संधी साधून शहरातून व खेड्यापाड्यातून शेतकरी-कामकरी जनतेचा उठाव करणें हा होय. या प्रांतातील शेतकरी कामकरी संघटनांनीं एवढ्यावरच न थांबता लष्करातही आपल्या चळवळीचा प्रचार करावा व त्यांनाही बंडाचीं निशाणें उभारण्याकरता प्रवृत्त करावें आणि प्रत्यक्ष लढाईच्या वेळीं या सर्व उठावाचें एकीकरण

करून शेतकरी–कामगार–लष्करी सैनिक यांचीं पंचराज्ये स्थापन करण्या-करता सार्वत्रिक बंडात त्याचे रूपांतर करण्यात यावे." कम्यूनिस्ट पार्टी-जवळचें या वेळचें मनुष्यबल व द्रव्यबल अर्थातच कमी होते. पार्टीने उभार-लेल्या लष्करी पलटणींत कांहीं नॉन्‌कमिशन्ड ऑफिसर व व्हांपोआ लष्करा-तील कांहीं सैनिक होते. यांपैकीं २०० लोक कम्यूनिस्टपक्षाचे सभासद होते. कामगाराच्या लाल पथकातील कांहीं सैनिक सशस्त्र होते व इतर कामगा-रांनाही मिळविता आलीं तितकीं शस्त्रें देऊन सशस्त्र करण्यात आलें होते. या बंडात सामील झालेल्या एकूण सैनिकांची संख्या साडे चार हजार होती. याच्या उलट कॅन्टनमधील सरकारी सुसज्ज सैनिकांची संख्या ७००० वर होती. यांपैकीं १००० पोलिस व मेकॅनिकल यूनियनमधील १००० भाडोत्री मवाली कामगार होते. प्रत्यक्ष लढाईला सुरुवात झाल्यावर सरकारी पक्षाला हवें तितकें सैन्य मदतीला मिळण्याचा संभव होता. तर कामगारांच्या पक्षाला असें भरवशालायक सैन्य नव्हते. क्वाङ्‌तुङ् प्रांतात सर्वत्र पसरलेले शेतकरी संघ स्वयंस्फूर्तीने आयत्यावेळीं उठाव करतील, असा बंडवाल्यांना विश्वास वाटत होता.

कम्यूनिस्ट पुढाऱ्यांनीं केलेल्या अंदाजाप्रमाणें कॅन्टनपासून ४० मैलावर ली चि सन् व चॅग फा कुई या दोन्ही सुभेदारांमधील यादवीला नोव्हेंबरच्या तिसऱ्या आठवड्यात सुरवात झाली. २६ नोव्हेंबर रोजीं कम्यू-निस्ट पुढाऱ्यांनीं आपसात साधकबाधक विचार करून १३ डिसेंबर रोजीं बंडाचा उठाव करण्याचें निश्चित केले.

**कॅन्टन कम्यूनचा कार्यक्रम**—पण हा सगळा बेत आयत्या वेळीं बदलावा लागला. मध्यंतरीं वॅड चिङ वी शांघायला गेला असता त्याला या बंडाच्या तयारीचा सुगावा लागला. त्यानें तांबडतोब चॅड फाला तारेने ही वार्ता कळविली. चॅगनेंही तारेनें आपल्या एडीक्यांपला आपल्या आघाडी वरील तुकडीसह परत बोलावले व कॅन्टनला दाखल होण्याबद्दल कळविलें. बंडाची इतकी तयारी झाली होती कीं, शत्रूपक्षाला आपले बेत कळले म्हणून आयत्या वेळीं मागे घेणें शक्यच नव्हतें. उठावाची पहिली ठरविलेली तारीख दोन दिवस अलीकडे ओढण्यात आली. तरी १० डिसेंबर

( १९२७ ) रोजीं मध्यरात्रीपासून दोन्ही पक्षातील चकमकींना सुरुवात झाली. विद्युत्वेगानें कामगार लष्करी तुकड्यांनीं शत्रूपक्षाच्या सैन्या-वर एकामागून एक सारखे हल्ले चढविले व ते यशस्वीही ठरले. शत्रुपक्षातील सैनिकाना पाडाव करण्यात आले. त्याच्याकडून घेत-लेल्या रायफल्स कामगार सैनिकाना वाटण्यात आल्या. शहराच्या मध्यभा-गात कामगारसैनिकांनीं एकजुटीनें पोलिसांच्या तुकड्यांवर जोराचे हल्ले चढ-विले. केवळ पोलिसांचीं ठाणींच कामगार सैनिकांनीं आपल्या ताब्यात घेतलीं असे नाहीं तर याच भागात असलेल्या सरकारी लष्करी ठाण्यावरही आपला कबजा जमविला. चॅङ् फा कुईचे मुख्य ठाणे व ली ची सनूचा बांधलेला राज-वाडा कामगार लष्कराच्या हातीं लागला नाहीं. या दोन्हीं इमारतींकडून मशीनगन्सच्या फेरीवर फेरी सुटत होत्या. ११ डिसेंबर रोजीं पहाटे बहुतेक सर्व शहर कामगार सैनिकांच्या ताब्यात आले व सकाळीं सहा वाजता " कामगार–शेतकरी–सैनिक सोव्हिएट " कॅन्टनमधील मुख्य पोलिस ठाण्याच्या ऑफिसमध्ये स्थापन करण्यात आलें व कॅन्टनचा कारभार या पंचसरकारने आपल्या हातीं घतला. या पंचामध्ये तीन्ही वर्गांचे मिळून पधरा सभासद निवडण्यात आले होते. या नवीन पंचसरकारनें ताबडतोब राजकीय कैद्याना बंधमुक्त केले व एक हजारावर मुक्त झालेले हे कैदी काम-गार लष्करात सामील झाले. शत्रुपक्षाकडून मिळविलेलीं शस्त्रें या कैद्यामध्ये वाटण्यात आलीं. शहरात एकीकडून तोफा–बंदुकांचे आवाज घुमत होते तर दुसऱ्या बाजूला सोव्हिएट सरकारतर्फे आज्ञापत्रावर आज्ञापत्रें निघत होतीं. " बड्या भांडवलवाल्यांच्या मालमत्ता, बँका व पेढ्या जप्त करण्यात याव्या. श्रीमंतांचे वाडे सरकारने ताब्यात घेऊन त्यातून कामगारांच्या राहण्याची व्यवस्था करण्यात यावी. गहाणाचा व्यवहार करणाऱ्या सावकारांच्या पेढया ताब्यात घेऊन गहाणाचा सर्व माल त्या त्या मालकांच्या स्वाधीन करण्यात यावा " या कॅन्टन कम्यूनने कामगाराकरताही पुढील कार्यक्रम निश्चित केला होता. आठ तासांचा दिवस, पगार वाढ, बेकाराना कामगारांच्या मजूरी इतका भत्ता, सर्व मोठ्या धंद्यांचें राष्ट्रीकरण, चीनी कामगारांची राष्ट्रीय संघटना या नात्याने ऑल चायना ट्रेड यूनियन फेडरेशनला मान्यता.

कामगारवर्गाला सशस्त्र करण्यात यावे, सर्व राजकीय कैद्याना मुक्त करण्यात यावे, भाषण, मुद्रण व आचार स्वातंत्र्य व त्याचप्रमाणें कामगार संघ स्थापण्याचा व संप करण्याचा कामगाराचा हक्क मान्य करण्यात यावा इ. ”

**कॅन्टन कम्यूनचा नाश**—आपला स्वतंत्र कार्यक्रम जाहीर करून कॅन्टन कम्यून शहरावरील आपली सत्ता दृढमूल करू पाहत होते तर कामगाराचा हा उठाव हाणून पाडण्याकरता कॅन्टनवर चारी दिशाकडून राष्ट्रीय सैन्ये मजल दर मजल करीत धावून येत होतीं. चोहोकडून चालून आलेल्या या सैन्याचे संख्याबल ४५,००० होते. एवढ्या प्रचंड सैन्यापुढे कॅन्टन कम्यून कसे काय टिकाव धरणार ? पण कम्युनचे रेडगार्ड मुळींच डगमगले नाहींत. नदी किनाऱ्यावर वाळूचीं पोतीं रचून या रेडगार्डांनीं तटबंदी तयार केली व तिच्या आधाराने शत्रुसैन्याशीं ते लढत राहिले. नदीपलीकडील लष्करी पलटणींतून त्याच्यावर गोळीबार चालू झाला. गनबोटीमधून त्याच्यावर तोफाचा मारा करण्यात आला. मेकॅनिकल युनियनमधील एक हजार सशस्त्र मवाल्यानीं त्याच्या पिछाडीवर हल्ला चढावला. रेडगार्ड व त्याचे इतर साथीदार मिळून या तटबंदीमागून लढत राहिलेले एकंदर कामगार सैनिक फार फार तर तीन साडे तीन हजारपर्यंत होते. या चकमकीला १२ डिसेंबर रोजी संध्याकाळीं तोंड लागलें पण या थोड्याशा बहाद्दर लोकानीं दुसरे दिवशीं सकाळीं १० वाजेपर्यंत आपल्या जागा न सोडता लढत चालू ठेवली. शेवटीं शत्रूसैन्यानें अगदीं लगट केली त्यावेळीं त्यानी या तटबंदीचा त्याग करून माघार घेतली. ही माघार घेतानाही रस्तोरस्तीं तें शत्रुसैन्याशीं लढत राहिले व त्याचें कडे फोडून निसटून गेले. दोनप्रहरी शहरातील मध्यभागीं असलेल्या सरकारी कचेऱ्याजवळ उरल्या सवरल्या कम्यूनच्या सैनिकानीं चोहोकडून त्याच्यावर धावून आलेल्या सरकारी सैनिकाशीं दोनतासपर्यंत लढत दिली. जवळचा दारू गोळा संपला व त्यापैकीं अखेरचा सैनिक धारातीर्थी पडला तेव्हाच हें युद्ध थांबले. शहरातील कामगार वस्तीवरही व्हाम्पोआ लष्करातील सैनिकानीं हल्ला चढविला. कामगारानीं मोठ्या शौर्यानें या कवाइती सैन्याला तोंड देऊन पाच वेळा मागे हटावयास लावले. १०, २०, ३०, ४० कामगाराचे गट करून या सशस्त्र सैनिकाबरोबर ते लढत राहिले.

पण ही लढत फार वेळ टिकली नाही. घोडदळी लष्कराने या गटावर निर्दय-पणाचे हल्ले करून त्याना जमिनीवर लोळविले व त्याच्या प्रेतावरून आपले घोडे चालविले. हा लढा चालू असता शहरात ठिकठिकाणीं राष्ट्रीय सैनिकानीं व मेकॅनिकल यूनियनच्या मवाली सैनिकानी आगी लावल्या. कम्यूनचा नाश करण्याच्या कामीं चीनी, ब्रिटिश व जपानी गनबोटींनीं सहकार्य केले. या गनबोटींतून झालेल्या तोफाच्या माऱ्याने शहरच्या मध्यभागातील मोठ-मोठ्या इमारतींना आगी लागल्या व सेंट्रल बॅंकेच्या इमारतीचाही काही भाग जळाला. या परिस्थितीचा फायदा शहरातील गुन्हेगार वृत्तीच्या लोकानीं घेतला. त्यानी ठिकठिकाणीं मनसोक्त लुटालूट केली. याप्रमाणे ११ ते १३ डिसेंबर-पर्यंत तीन दिवस कॅन्टन शहरभर सर्वत्र दगेधोपे, लुटालूट, जाळपोळ व प्रत्यक्ष युद्धाच्या चकमकी चालू होत्या. कामगाराच्या रेडगार्डाचा प्रतिकार हाणून पाडल्यानतर हे हत्याकाड सपावयास पाहिजे होतें पण तसें झाले नाही. विजयाने मदोन्मत्त झालेल्या राष्ट्रीय सैन्यातील रानदाडग्या शिपायानीं शहरात गल्लोगल्लीं घरातून शिरून शेकडो तरुण स्त्रियावर अत्याचार केले व नतर त्याना रस्त्यावर ओढून आणून त्याना गोळया घालून ठार केले. केस बॉब केलेले असले कीं, ते जहालपणाचें लक्षण आहे, असें समजून त्या स्त्रियाना मुद्दाम पकडण्यात आले व हाल हाल करून त्याना ठार करण्यात आले. कम्युनिस्ट स्त्रियाच्या अगावर रॉकेल ओतून त्याना जिवतपणीं जाळण्यात आले. "कॅन्टनला या तीन दिवसात नरकपुरीचे स्वरूप प्राप्त झाले होते. रस्त्यातून, गल्ल्यातून, जिकडे पाहावे तिकडे स्त्रीपुरुषाचीं प्रेते पडलीं होतीं. या दिवसात खरोखरीच रस्त्यातून रक्ताचे पाट वाहिले. दगडा, विटा, बाबूचे भाले सर्व रस्ताभर पसरून पडलीं होतीं. रस्त्यावर पडलेलीं प्रेते मोटार लाऱ्यातून लाकडाप्रमाणें रचून शहराबाहेरच्या मैदानाकडे दफन करण्याकरता नेण्यात येत होतीं." अशी या प्रसगाची हृदयद्रावक कहाणी पेकिङ्च्या 'शुतिन्पाव' पत्राच्या बातमीदाराने प्रसिद्ध केली. क्रातिकारक कमिटीचा मुख्याधिकारी चॅङ् ताइ ली व पाच रशियन या कत्तलींत कामास आले व बाकीचे काहीं पुढारी शत्रूची फळी फोडून निघून गेले व न्यूमान वगैरे काहीं पुढारी लढाई सपल्यावर

शहरात झालेल्या दंगलीच्या वेळीं संधी मिळताच निसटून गेले. याप्रमाणें कॅन्टनमध्यें आदल्या दिवशीं प्रस्थापित झालेलें कम्यून दुसऱ्या दिवशीं खलास झालें व १३ डिसेंबर रोजीं कम्यूनच्या पोलिस क्वार्टरमधील मुख्य ठाण्यावरील लाल बावटा खालीं ओढण्यात आला.

शांघायच्या कत्तलीपेक्षा कॅन्टन कम्यूनचा नाश करण्याकरता चिआङ् कायी शेकच्या साथीदारानीं कॅन्टनमध्यें केलेली कामगाराची कत्तल व शहरातील नागरिकावर केलेले अत्याचार अधिक भयंकर स्वरूपाचे होते. शांघायमधील कामगारानीं केवळ सार्वत्रिक संपाचा पुकारा केला व सर्व शहर ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला पण कम्यूनिस्टाच्या नेतृत्वाखालीं कॅन्टनमधील कामगारानीं यापुढें जाऊन कॅन्टनमध्यें कामगार–शेतकरी–सैनिकाचें स्वतंत्र सोव्हिएट प्रस्थापित केलें, ही गोष्ट भांडवलशाहीशीं व परकीय साम्राज्यवाद्याशीं संगनमत करू पाहणाऱ्या चिआङ्ला व त्याच्या साथीदाराना कशी सहन होणार ! त्यानीं आपले होतें नव्हते तेवढें बळ खर्चीं घालून या कम्यूनचा धुव्वा उडविला.

एकाद्या चढाईच्या चळवळींत अपयश आले म्हणजे त्याचा दोष कोणाकडे, यासंबधाने स्वाभाविकच चर्चा सुरू होतात. तेव्हा अशा प्रकारच्या चर्चा होऊन परस्परावर दोषारोप लादण्यात येऊ नयेत. आपसात बेदिली वाढू नये. म्हणून चिनी कम्यूनिस्ट पोलिटिकल ब्यूरोने ३ जानेवारी १९२८ रोजीं या संबधात एक ठराव करून आपलें मत पुढीलप्रमाणें जाहीर केलें:—

" फक्त म्याड संधीसाधूच तेवढे असल्या उठावाला अकालिक धाडसी कर्म किंवा लष्करी शिपायानीं केलेला कट म्हणू शकतात. कम्यूनिस्ट पक्षाच्या कॅन्टन शाखेत व सेंट्रल कमिटीच्या सभासदात असल्या संधीसाधूवादाला अवकाश मिळालेला नाहीं. डिसेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात कॅन्टनमध्ये झालेला उठाव वर्गकलहाच्या विकासाचा व भौतिक परिस्थिति जुळून आल्यामुळें उत्पन्न झालेल्या प्रसंगाचा अपरिहार्य परिणाम होता. प्रत्यक्ष क्रांतिकारक सत्ता प्रस्थापित करण्यासाठीं उठाव करण्याशिवाय कॅन्टनमधील कामगार वर्गाला गत्यंतरच नव्हतें. "

" कॅन्टनचे बड हे धाडसी कर्म नसून सोव्हिएट सत्ता सघटित करण्याकरता कामगार वर्गानें केलेला तो शूर प्रयत्न होता. या बाबतींत कांहीं चुका झालेल्या असल्या तरी चिनी कामगारांचें अत्यत शौर्यशाली कृत्य म्हणून त्याची गणना केली पाहिजे." असा अभिप्राय या प्रसगानतर एक महिन्यानें भरलेल्या कम्यूनिस्ट इटर नॅशनलच्या कार्यकारी मडळाच्या सभेंत व्यक्त करण्यात आला.

**शेतकऱ्यावर वाढता जुलूम**—१९२७ मध्यें झालेल्या या दडपशाहीमुळे चीनमधील कामगार–शेतकरी चळवळीला मोठा धक्का बसला. किसान–कामागाराच्या सर्व सघटना मोडून टाकण्यात आल्या. जमीनींचे खड व कर भरमसाट वाढविण्यात आले. सुभेदाराच्या अरेरावीला पारावार राहिला नाहीं आणि या मनुष्यकृत सकटाच्या भरतींत दैवी आपत्तींचीही भर पडली. महापूर, दुष्काळ व उपासमार यानीं सर्व देशभर कहर करून सोडला १९२८ सालच्या दुष्काळात ६००,००,००० लोक उपासमारीला बळी पडले. यापैकीं खेडयापाड्यातील शेतकरीच बहुसख्य होते, हें सागावयास नको. १९३१ च्या महापुराने २५०,००,००० लोकाच्या उपजीविकेच्या साधनाचा नाश केला. जमीनीचे मालक असलेल्या शेतकऱ्याला सरकारी कर वगैरे भागवून जेमतेम कसे तरी वर्षभर जगता येईल, इतकीच धान्यसामुग्री त्याच्याजवळ राहू लागली. खडाने जमीन करणाऱ्याचे वार्षिक उत्पन्न ५०।६० रुपयावर येऊन पोंचलें. त्याच्यावरील सावकारी कर्जाचा बोजा वाढत चालला. या दिवसात जमीनदारीची साहाजिकच वाढ झाली. सावकारानीं व व्यापाऱ्यानीं आपला पैसा उद्योगधद्यात न गुतवता जमीनींत तो गुतविला व शेतकऱ्याकडून खडाच्या रूपानें उत्पन्नाचा तीन चतुर्थांश भाग ते बळकावू लागले. चीनमधील विशेषतः दक्षीण चीनमधील निम्यावर शेतकरी गुलामगिरीच्या अवस्थेला पोंचला. उपासमारीचे कढ सहन करीत जमीनदाराच्या व सावकाराच्या चैनी चालवाव्या, एवढेच त्याचें काम राहिलें.

**कामगाराची दैना**—१९२८ नतरच्या या दोन तीन वर्षांच्या कालात कामगाराची स्थितीहि निकृष्टावस्थेला पोंचली. शाघाय व कॅन्टन येथील अमानुष दड पशाहीमुळें कामगारसघटना मोडून गेल्या ही सधी साधून कार-

खानदारानीं मजुराच्या पगारात काटाकाटी करायला सुरवात केली. १९२८ सालीं मजुराच्या महिन्याचें उत्पन्नाचे प्रमाण निम्याने कमी होऊन ते द.म. १६ शिलिंगावर ( अदमासे १२ रु. ) येऊन पोचलें. कामगाराच्या कुटुंबातील बहुतेक सर्व माणसे कारखान्यात कामे करतात. एका कुटुंबात सरासरी पुरुष, स्त्रिया, मुले मिळून पाच माणसें कामावर जातात, असे गृहीत धरलें तरी त्या सर्वांचें एकूण द. म. मजुरीचें उत्पन्न ३८ शि. ( सरासरी २२ रु. ४ आणे ) पडूं लागलें. चिनी कामगाराची ही सर्वांत जास्त मिळकत होती. कामगाराकडून किती तास सारखें काम करून घ्यावें याचेही या दिवसात प्रमाण राहिले नाहीं. १२, १४ काहीं कारखान्यात १८, २२ व काहींतून ३६ तासपर्यंत, मध्यें फक्त खाण्यापुरतीच सवड देऊन मजुराकडून काम करून घेण्यात येऊ लागले. चिनी कामगार शेतकऱ्याच्या या निकृष्टावस्थेचा जागतिक आर्थिक परिस्थितीवरही परिणाम झाला व १९३० सालीं जगातील सर्व राष्ट्रावर कोसळलेल्या आर्थिक अरिष्टाला ४० कोटी चीनी जनतेचें कळसाला पोंचलेलें दारिद्र्य कारणीभूत झालें. १९३० च्या आरंभींच्या दिवसात चिनी जनतेतील शेकडा ९५ लोकावर या वेळीं अर्धपोटीं राहण्याचा प्रसग आला होता आणि यापैकीं शे. ३५ लोक तर अन्नाला मोताद झाले होते.

**कम्युनिस्टांचें नवीन धोरण**—याप्रमाणें चीनी कामगार–शेतकरी जनता सर्व काही गमावून बसली होती तरी एक गोष्ट तिने आपल्या हृदयाशीं चिकटून धरून ठेवली व ती गोष्ट म्हणजे स्वातन्त्र्याची इच्छा. सर्व प्रकारच्या पिळणुकीपासून मुक्त होण्याची तीव्र इच्छा. समाजातील सर्व वर्गांना पूर्ण स्वातन्त्र्य, हें चीनी क्रांतीचे ध्येय होते. अशा ध्येयावर पेटवलेली स्वातन्त्र्यज्योत कधींही विझत नसते. दैवी व मानवी आपत्तींनीं सर्वतोपरी गांजलेल्या परिस्थितींतही चीनी जनतेनें आपल्या सर्व शक्ति पुन्हा संघटित करण्याचा जोराचा प्रयत्न केला. या आपत्तींनीं ती मुळींच निराश झालेली नव्हती. चिनी कम्यूनिस्टाना तर निराशा ही काय चीज आहे, हें माहीत नव्हतें. कम्यूनिस्ट अन् निराशा या दोहींचें एकत्र अस्तित्व कधींच असूं शकत नाहीं. परमावधीची चिकाटी हा कम्यूनिस्टाच्या अंगच्या

एक विशेष गुण असतो. कम्यूनिझमच्या प्रतिष्ठापनेच्या दृष्टीनें यत्किंचित् जरी पाऊल पुढे पडत असेल तर त्याकरता सर्वस्वाचा त्याग करण्याची त्याची तयारी असते आणि याकरिताच आपसातील एकीकरता तो धडपडत असतो. जे आपल्याला मारखे पाण्यात पाहतात, आपलें अस्तित्वसुद्धा ज्याना सहन होत नाहीं त्याच्याशींसुद्धा ऐक्य करण्यास तो तयार असतो. आपल्याविरुद्ध कोणी कितीही कारवाया केलेल्या असल्या, आपले कितीही नुकसान केलेले असलें, आपल्या भाईच्या माना मुरगळल्या व त्याच्या कत्तली उडविल्या असल्या तरी त्या तो सर्व विसरतो व पुढील कार्यावर नजर देऊन एकीकरता त्याच्याशींही तडजोड करण्यास तो तयार असतो. या करताच त्यानीं १९२६–१९२७ पर्यंत चिआङ् कायी शेकबरोबर शक्य तितकें पडतें घेतले. पण चिआङ्ने व त्याच्या साथीदारानीं शाघायच्या सार्वत्रिक सपाचा धुव्वा उडवून व कॅन्टन कम्यून प्रस्थापित करणाऱ्या कामगाराच्या कत्तली करून आपले जनताद्रोही धोरण जाहीर केले. चिनी भाडवलशाहीशीं व परकीय साम्राज्यशाहीशीं सगनमत करून चीनी लोकशाहीचा व क्रातीचा विश्वासघात केला त्यावेळींच चीनमध्ये स्वतत्र कम्यूनिस्ट सत्ता प्रस्थापित करण्याच्या मार्गाला ते लागले. १९२७ सालीं शाघाय व त्याच्या पाठोपाठ झालेल्या कॅन्टनच्या कामगार कत्तलीनतर आपल्या सर्व सघटित शक्ति विस्कळित झाल्या आहेत, हें चीनी कम्युनिस्टाना दिसत होते तरी त्यामुळे मुळींच न डगमगता आपल्या हातीं राहिल्या साहिलेल्या शक्तींची पुनर्घटना करून चीनमध्ये स्वतत्र सोव्हिएट व स्वतत्र सत्ता प्रस्थापित करण्याचें त्यानीं ठरविलें व कुओमिन्ताङ्च्या सत्तेविरुद्ध बडाचे निशाण उभारले. सहाव्या कॉग्रेसमध्यें कम्यूनिस्ट इटर नॅशनलच्या सभासदानींही चीनी कम्यूनिस्टाच्या या धोरणास पुढीलप्रमाणें पाठिंबा दिला.

" यावेळीं चीनी कम्यूनिस्ट पक्षानें सोव्हिएट प्रस्थापनेचा व कामगाराच्या लोकसत्तामूलक हुकुमशाहीचा चीनी जनतेंत प्रचार करावा व जनतेने सशस्त्र होऊन क्रातिकारक बड करणे कसें अपरिहार्य आहे, हें त्याना समजावून सागावे. सत्ता धारण करणाऱ्या गटाला उलथून टाकणें व क्रातिकारक बडाच्या निदर्शनाकरता जनतेच्या शक्तींची जमवाजमव करणे, कसे

जरूरीचें आहे हेंही चिनी कामगार शेतकरी जनतेला समजावून द्यावें. राज्यसत्ता काबीज करणें, बंडाचीं साधनें या दृष्टीनें सोव्हिएटाची संघटना करणें, जमीनदाराच्या व बड्या मालमत्तावाल्याच्या मालमत्ता जप्त करणें व परकीय साम्राज्यवाद्यांना हाकून लावणें, या धोरणाचा सुसंगतपणें व मागेंपुढें न पाहता अवलंब करावा. क्रांतीच्या वाढत्या सामर्थ्यामुळें चीनी कम्यूनिस्ट पक्षाला असें आढळून येईल कीं, कुओमिन्ताङ्ची सत्ता उलथून टाकण्याकरता व भांडवलशाही लोकसत्तात्मक क्रांतीचें कार्य पूर्ण करण्याकरता सशस्त्र बंड उभारणें व त्याची तयारी करणें हाच एक व्यवहार्य व तावडतोबीचा मार्ग आहे."

चीनी कम्यूनिस्ट पार्टीनें कुओमिन्ताङ् सरकारविरुद्ध बंडाचें निशाण उभारण्याचें व चीनमध्यें स्वतंत्र सोव्हिएट सत्ता प्रस्थापित करण्याचें नवीन धोरण स्वीकारल्यावर पार्टीतील सर्व मतभेद नाहींसे झाले. शहरातून कामगार-संघटनेचें काम करणाऱ्या व खेड्यातून शेतकरी संघटना करणाऱ्या पार्टीतील कार्यकर्त्यांनीं आपसातील किरकोळ मतभेद बाजूला ठेवले व पार्टीने ठरविलेल्या वरील महान् कार्याकरता ते एकजूट झाले. पार्टीजवळ यावेळीं प्रत्यक्ष अशी फौज नव्हती. शांघाय व कॅन्टन येथें त्यांनीं दोन मोठ्या लढाया पार्टीच्या नेतृत्वाखालीं दिल्या होत्या. त्याचप्रमाणें चीनमधील खेड्यापाड्यातून शेतकऱ्यांनीं संघटितरीतीनें जमीनदाराविरुद्ध लढत चालविली होती. या लढाऊ कामकरी—शेतकरीवर्गांतूनच माउ च तुङ् व ज्यू दे प्रभृति कम्यूनिस्ट पुढाऱ्यांनीं लाल फौजा निर्माण केल्या. शांघाय व कॅंटनमधून बचावून आलेले सशस्त्र कामगार व कामगार स्वयंसैनिक व खेड्यापाड्यातील बंडखोर सशस्त्र शेतकरी यांची उरलीं सुरलीं पथकें पार्टीच्या पुढाऱ्यांनीं एकत्र आणलीं व लालफौजेचा पाया घातला.

लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, सत्ता काबीज करण्याची चीन-मधील यापुढची सर्व चळवळ माउ च तुङ् या अद्वितीय पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं सुरू झाली व आजही त्याच्याच नेतृत्वाखालीं चीनी कम्यूनिस्ट कुओमिन्ताङच्या प्रतिगामी सरकारविरुद्ध लढत आहेत.

———

# माउ च तुंङ्

**प्राथमिक शिक्षण**—माउ च तुङ् हा गरीब चीनी शेतकऱ्याचा मुलगा. त्याचा जन्म १८९३ मध्ये एका लहानशा खेड्यात झाला. वयाच्या आठव्या वर्षी माउ शाळेंत जाऊं लागला व पुढील पाच वर्षे खेड्यातल्या या शाळेंतच त्याने शिक्षण घेतलें. शाळेतल्या अभ्यासात त्याची प्रगति होऊं लागली. तो चांगले लिहू वाचू लागला त्यावेळीं त्याला दुसराच एक नाद लागला. वर्गाला लावलेल्या पुस्तकापेक्षा चीनी पुराणातल्या गोष्टींची व काव्यांचीं पुस्तकें त्याला जास्त आवडू लागलीं. या पुस्तकातील चीनी बंडखोराच्या गोष्टी त्याला फार आवडत. या पुराणातल्या लढवय्याच्या गोष्टी तो आपल्या शाळासोबत्याना सांगे तेव्हा हीं मुलेंहि असलीं पुस्तकें वाचू लागलीं. मास्तराला ही गोष्ट आवडली नाहीं. त्यानें हीं पुस्तकें वाचण्याची बंदी केली तसतशीं मुलें तीं आदरून वाचू लागलीं. हातात वर दिसायला वर्गाचें पुस्तक पण त्याच्या आत गोष्टींचे पुस्तक लपवून मुले ते वाचीत. या गोष्टींच्या बाबतींत माउला एक विशेष महत्त्वाची गोष्ट आढळून आली. सेनापति, सरकारी अधिकारी व विद्वान् यांच्याच संबंधाच्या या या गोष्टी असत. गोष्टींतला नायक कधींही शेतकरी असायचा नाहीं, हे पाहून त्याला आश्चर्य वाटे हे लोक जमिनींचे मालक होते, सत्ताधीश होते, जमिनीवर मेहनत मशागत करावी व राबून जमीन पिकवावी, हें शेतकऱ्याचे काम. तेव्हा या राबणाऱ्या लोकांची काय किंमत ? म्हणून या सर्व गोष्टींतून या जमीनींच्या मालकांचाच बडेजाव गायला जावा व त्यांच्या वैभवाचें व शौर्याचे स्तोम या गोष्टींतून माजविले जावे, हेंच स्वाभाविक आहे असे त्याला वाटू लागले " सावधगिरीचे शब्द " Words of warning " या नावाचें एक पुस्तक त्याला याच दिवसात वाचावयास मिळाले. हे पुस्तक त्याला फार आवडलें. रेल्वे, टेलीफोन, टेलीग्राफ या पाश्चात्य सुधारणा अमलात आणण्याकडे चीनी लोकाचे लक्ष नाहीं. यामुळेच चीन जगातील इतर राष्ट्रांच्या मागे पडला आहे व दुर्बल बनला आहे, अशी सुधारणावादी चीनी

लोकाची मतें या पुस्तकात प्रतिपादलीं होतीं. असलीं पुस्तकें वाचणे म्हणजे केवळ वेळेचा अपव्यय आहे, असें माउच्या बापाला वाटे. वर्गात लावलेलीं पुस्तकें माउनें वाचावीं व भराभर एका मागून एक परीक्षा पास होऊन वकील व्हावे व कोर्टातील आपल्या कामाला मदत करावी, ही बापाची इच्छा होती. पण ती सफल झाली नाहीं. वरील पुस्तकामुळें पाश्चात्य शिक्षण घेण्याची इच्छा माऊच्या मनात उत्पन्न झाली. शेतीच्या कामाचा त्याला कंटाळा आला. आपल्याला कोठें तरी शहरास पाठविण्याबद्दल त्याने बापाला विचारले. त्याला ही गोष्ट मुळींच पसत पडली नाहीं. बापलेकाचें या बाबतींत भाडण झालें. माउ घरातून पळून गेला. आपल्या एका कायद्याचा अभ्यास करणाऱ्या बेकार मित्राच्या गावीं तो जाऊन राहिला. या गावातल्या शाळेत त्यानें नाव घातलें. या शाळेंत एक जहाल मतवादी शिक्षक होता. बुद्ध धर्माविरुद्ध तो प्रचार करीत होता, त्याचप्रमाणे सगळ्या देवळातील मूर्ति काढून टाकून त्यातून शाळा स्थापन केल्या पाहिजेत, असें तो सांगत असे. जात्याच बंड खोर असलेल्या माउला हा मास्तर फार आवडत असे.

**लष्करात प्रवेश**—चांगशा शहरातील मिडलस्कूलमध्ये जाऊन आपलें शिक्षण पुढे चालू ठेवावे अशी माउची फार दिवसाची इच्छा होती. प्राथमिक शाळेंतील एका शिक्षकाने त्याला या कामीं मदत केली. चांगशा-मधील या शाळेत त्याला प्रवेश मिळाला पण पुढे अशा कांहीं गोष्टी घडून आल्या कीं, सहा महिन्यापेक्षा जास्त दिवस तो या ठिकाणीं राहू शकला नाहीं. " लोकशक्ति " ( मिन् ली पाव ) हें पहिले वर्तमानपत्र त्याला या ठिकाणीं वाचावयास मिळालें. मॅन्च्यू घराण्याविरुद्ध कॅन्टनमधील क्रांतीचा उठाव, बहात्तर वीरांचा प्रशंसनीय मृत्यू, सन्यत्सेनसंबंधाच्या गोष्टी त्याने या ठिकाणीं प्रथम ऐकल्या. क्रांतीच्या पहिल्या उठावाची ही वेळ होती. या सर्व गोष्टी ऐकून त्याचे मन इतकें प्रक्षुब्ध झालें कीं, त्यानें या विषयावर एक लेख लिहिला व शाळेच्या भिंतीवर तो चिकटवून टाकला. यावेळीं झेच्युआन्-हॅंकौ रेल्वे बांधण्याकरता परदेशी भांडवल देशात गुंतविता कामा नये याबद्दल व चीनमध्यें पार्लमेंट स्थापन करण्यात यावें, या मागणीच्या बाब-तींत देशात चळवळ चालू होती. मॅन्च्यू घराण्याबद्दलचें राजनिष्ठेचे चिन्ह

म्हणून चीनी जनतेवर लादलेल्या केसाच्या शेपट्याविरुद्ध मोहीम काढून चागशा येथील विद्यार्थ्यांनीं आपल्याला वाटणारा मॅन्च्यूद्वेष प्रकट केला. माउनें व त्याच्या एका स्नेह्याने प्रथम आपले शेपटे कापून टाकले. शेपटे कापून टाकण्याचें प्रथम कबूल करून वेळ आली तेव्हा प्रत्यक्ष कृति करण्यास कांहीं विद्यार्थी मागे पुढें पाहू लागले. माउनें व त्याच्या दोस्तानें या विद्यार्थ्यांना एकाकी गाठून त्याच्यावर हल्ला चढवला व त्याचे शेपटे कापून टाकले. त्याच्या कात्रीला दहापेक्षा अधिक लोकांचे शेपटे बळी पडले. वुहान-मधील क्रांतीच्या उठावानंतर हुनानमध्यें लष्करी कायदा पुकारण्यात आला. ली युआङ हुङ्च्या नेतृत्वाखालीं हा उठाव झाला होता. एका क्रांतिकारकानें शाळेत येऊन या संबंधांत आवेशयुक्त भाषण केले. प्रिन्सिपालनें या व्याख्यानास परवानगी दिली होती. वक्त्याच्या भाषणानंतर सात आठ विद्यार्थ्यांनीं प्रजासत्ताकराज्याच्या प्रस्थापनेबद्दल व या झगड्यात भाग घेण्यासंबंधानें भाषणें केलीं. या भाषणानंतर चार पाच दिवसांनीं ली युआन् हुङ्च्या क्रांतिकारक फौजेंत सामील होण्याचें माउनें व त्याच्या कांहीं मित्रांनीं ठरविलें व याकरिता त्यांनीं कांही थोडे पैसेही जमविले.

त्याच्या शाळेतील बरेच विद्यार्थी लष्करात सामील होत होते. क्रांतीचें कार्य पूर्ण करण्याकरता क्रांतीकरता उभारलेल्या प्रत्यक्ष लष्करातच तो शिरला या लष्करात दर महा सात डॉलर पगार त्याला मिळत होता. लाल फोजेचा सेनापति म्हणून पुढें त्याला जो पगार मिळत होता त्यापेक्षा हा पगार जास्त होता. महिन्याचा खर्च काटकसरीनें भागवून बाकीच्या पैशातून तो वर्तमान पत्रें विकत घेत असे. या पत्रातून समाजवादाचा उहापोह चालू होता. समाजवादावरील कांहीं पत्रकेंही त्याला या ठिकाणीं वाचावयाला मिळालीं. क्रांतीचा निर्णय अद्याप लागलेला नव्हता. पक्षाच्या नेतृत्वाबद्दल कुओमिन्ताङ्-मध्यें झगडा चालू होता. मॅन्च्यूविरूद्ध व युआन् शी कायीविरूद्धही लष्करी पथकें उभारण्यात येत होतीं. हुनानचें लष्कर त्यापैकींच एक होतें व प्रत्यक्ष लढाई सुरू करण्याच्याही तें बेतात होतें, पण इतक्यात सन्यत्सेन व युआन् शी कायी यांचें संगनमत झालें. उत्तर दक्षिणेचा मिलाफ झाला. नान्किङ् सरकारचे विसर्जन करण्यात आलें. तेव्हा क्रांतिकार्य समाप्त झालें अशा समजुतीनें

त्यानें लष्करी नोकरीचा राजीनामा दिला व पुन्हा तो अभ्यासाकडे वळला. कोणाची मदत न घेता स्वतःच अभ्यास करण्याचें त्याने या वेळीं ठरविले. हुनान प्रांतिक वाचनालयात तो नियमाने जाऊं लागला. सहा महिने स्वतः ठरविलेल्या वेळापत्रकाप्रमाणें त्यानें वाचन चालू ठेवले. या अवकाशात त्याचे इंग्रजीचें ज्ञानही चांगले वाढलें होतें. पण पैशाच्या अभावामुळे त्याला हा अभ्यासही सोडावा लागला. कोणत्या तरी शाळेत गेल्याशिवाय पैशाची मदत करण्यास घरची मंडळी तयार नव्हती याच वेळीं हुनान नॉर्मल स्कूलच्या जाहिरातीने त्याचें मन मोहून गेलें. या शाळेंत राहण्याची व जेवण्याची व्यवस्था थोड्या पैशात होते असे पाहून त्याच्या दोन मित्रानीं तेथेंच जाण्याचा त्याला आग्रह केला. प्रवेश परीक्षेकरता लागणारा निबंध तयार करण्याचे कामीं माउची मदत त्याना पाहिजे होती. या दोन्ही मित्राचे निबंध त्यानें लिहून काढले व स्वतःकरताही एक निबंध लिहिला. तीन्ही निबंध परीक्षकाना पसत पडले. वास्तविक या परीक्षेंत तो तीनदा पास झाला ! या शाळेंत तो पाच वर्षे राहिला व शेवटची परीक्षा पास होऊन त्याने तेथील डिग्री मिळविली.

या शाळेत शिकत असताना लोकपत्र ( मिन् पाव ) नावाच्या पत्राचें जुने अंक त्याच्या वाचण्यात आले. " तुङ् मिङ् हुई " नावाच्या क्रांतिकारक गुप्त मंडळाची माहिती याने या अंकातून वाचली. या मंडळाच्या चळवळी व क्रांतिकारक कार्यक्रमही त्याला या पत्राच्या जुन्या अंकातून वाचावयास मिळाला व त्यालाही आपण असे एकादे मंडळ काढावें, असें वाटू लागलें. व हळू हळू तरुण मंडळींशीं सहवास ठेवून व त्याच्याशीं चर्चा करून त्यानें एक मित्रमंडळ आपल्याभोवतीं जमा केलें व कांहीं दिवसानीं " लोक-शिक्षण मंडळ " नावाचें एक मंडळ त्यानें स्थापन केलें. भारदस्त व गंभीर मनोवृत्तीची ही मंडळी होती. क्षुल्लक व क्षुद्र गोष्टींसबंधाने त्याच्यात कधींच चर्चा चालायच्या नाहींत. ते जे कांहीं बोलत, करीत, त्याच्या मागें कांहीं तरी विशिष्ट हेतू असायचा. प्रेम किंवा मजा करायला त्याना वेळ नव्हता. देशाची आजची परिस्थिति आणीबाणीची आहे. ज्ञानसंपादनाची यावेळीं अत्यंत जरूरी आहे, स्त्रिया व किंवा व्यक्तिविषयक गोष्टींचा विचार करीत

राहण्याची किंवा त्यासंबधाने गप्पा मारीत बसण्याची ही वेळ नाहीं, असे त्याना वाटे. तो चौदा वर्षांचा असताना त्याच्या आईबापानीं वीस वर्षांच्या एका मुलीशीं त्याचें लग्न लावून दिलें होते. तिच्याबरोबर त्यानें कधींच सहवास केला नाहीं आणि पुढेही हीं नवरा बायको कधीं एकत्र राहिलीं नाहींत आणि आता तर ती आपली बायको आहे, असें न समजण्यापर्यंत त्याची मजल गेली होती. स्त्रियाच्या सौंदर्यासबधानें चकाट्या पिटणें हा तरुण मुलाचा सहज स्वभाव, पण या मडळीच्या बोलण्यात या विषयाला मज्जाव होता. देशकार्यात पडल्यावर केव्हा कोणता प्रसग येईल याचा नियम नाहीं. याकरता आपलें शरीर मजबूत व काटक असायला पाहिजे. याकरिता ही तरुण मडळी हिवाळयाच्या सुटीत शेतातून व शहराच्या तटबदीवर फिरायला जात असत. पाऊस पडत असताना अगातले शर्ट काढून ते पावसातून फिरत व पावसाळी स्नान, असें त्याला नाव देत. उन्हाळयात कडक ऊन्ह पडले असताना असेच फिरायला निघत व या व्यायामाला सूर्यस्नान असे नाव देत. वादळी हवेंत असेच उघडे होऊन ते खेळत व त्याला वादळी स्नान असें म्हणत. बर्फ व धुकें पडत असताना उघड्यावर ही मडळी निजत व नोवेंबर महिन्यात नदीच्या थडगार पाण्यात पोहत राहात. माउवर व त्याच्या साथीदारावर त्याच्या पुढच्या आयुष्यात जे खडतर प्रसग आले त्यावेळीं या कसरतींचा व शरीर काटक बनविण्याच्या त्याच्या या व्यायामाचा त्याना फार उपयोग झाला यात शकाच नाहीं. माउनें १९१७ मध्ये स्थापन केलेल्या या मडळाचे ८० सभासद होते व यापैकीं बरेच लोक पुढें कम्यूनिस्ट पार्टीत शिरले, पार्टीची जबाबदारीची कामे त्यानीं केलीं व चीनी क्रातीच्या इतिहासात आपलीं नावे त्यानीं अजरामर करून ठेवलीं. हुपे भागातील तरुण मडळींनीं याच वेळीं “ समाज हितवर्धक मडळ ” ( शिन्-मिन् शिअ हुई ) नावाची सस्था काढली व या सस्थेचेही सभासद पुढें कम्युनिस्ट पार्टीत सामील झाले. चीनच्या राजधानीच्या शहरात, पेपिङ्मध्यें याच धर्तीवर एक तरुणाचें मडळ प्रस्थापित झालें व तेहि पुढे कम्यूनिस्ट बनलें. शाघाय, हॅड्चौ, हॅकौ, तिन्चिन् वगैरे शहरातूनही अशाच प्रकारचीं जहाल तरुण मडळें निघालीं होतीं. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, चीन-

मध्यें सर्वत्र पसरलेल्या या तरुण मंडळाच्या कार्याला " नव जवान " ( शिन् छिङ् निन् ) नावाच्या मासिकाकडून स्फूर्ति मिळत होती. हें प्रसिद्ध मासिक चेन् तू सूच्या संपादकत्वाखालीं चालू होतें. चेन् तू सू हा ख्यात-नाम निबंध लेखक व विद्वान होता. पेकिंङ राष्ट्रीय विद्यापीठाच्या वाङ्मय शाखेचा बरींच वर्षे तो प्रमुख होता. " वाङ्मय पुनरुज्जीवन बाल संस्था" असें या शाखेला नाव देण्यात आलें होतें. चेन् हाच या संस्थेचा प्रमुख चालक होता. प्राचीन मृत व हजारो शब्द पाठ करावयास लावणारी चिना भाषा त्याज्य ठरवून तिच्या जागीं प्रचलित एक हजार शब्दांनीं युक्त अशी सुट सुटीत राष्ट्रभाषा चेन्ने बनविली व ती लवकरच लोकप्रिय झाली. मोठ्या प्रमाणावर ज्ञानप्रसाराला सोयीची अशी ही भाषा होती. चेन्चे " नव-जवान " मासिक याच भाषेत निघत होतें. चीनमधील कम्युनिस्ट पार्टी चेन्नेंच प्रस्थापित केली. पुष्कळ दिवस या पार्टीचा तो प्रमुख चालक होता. १९३३ साली कुओमिन्ताङ्ग पक्षाच्या मध्यवर्ती कार्यकारी मंडळाचा तो सभासद झाला. कुओमिन्ताङ सरकारनें त्याला अटक केली व चौकशीचा फार्स करून दीर्घ मुदतीच्या कैदेची शिक्षा त्याला देण्यात आली.

**राजकीय चळवळींत प्रवेश**—नॉर्मल स्कूलच्या अभ्यासक्रमाच्या शेवटच्या वर्षी माउची आई वारली. नॉर्मल स्कूलचा ग्रॅज्युएट झाल्यानंतर पेकिंङला जाण्याचें त्यानें ठरविलें. हुनान प्रांतातले पुष्कळ विद्यार्थी फ्रान्सला जाण्याच्या विचारानें पेकिंङला चालले होते. " काम करा व शिका " या योजनेप्रमाणें फ्रान्समधील एखाद्या युनिव्हर्सिटींत पाश्चात्य शिक्षण घेण्याचा त्याचा विचार होता. फ्रान्सला जाणाऱ्या या विद्यार्थ्यांबरोबर तो १९१९ च्या प्रारंभीं शांघायला गेला. तिकीटापुरते पैसेदेखील त्याच्या खिशांत नव्हते. मित्र मंडळीकडून उसनवार पैसे घेऊन तो कसा तरी शांघायला येऊन पोंचला. प्रवासांत असतांना त्याची मनीबॅग व चपलाही कोणी चोरून नेल्या. शांघायला आल्यानंतर फ्रान्सला जाणाऱ्या विद्यार्थ्यांकरता फंड गोळा करण्यात आले, त्यापैकीं कांहीं पैसे माउलाही मिळाले. याप्रमाणें खर्चाची थोडीशी सोय झाल्यावर तो चांगशाला परत आला व त्यानें यापुढें राजकीय चळवळींत प्रत्यक्ष भाग घेण्यास सुरुवात केली. विद्यार्थ्यांच्या चळवळींतच

अर्थात् त्यानें प्रथम लक्ष घातले. हुनानमधील विद्यार्थ्यांनीं चालविलेल्या " शिआङ् चिआङ् " या पत्राचे संपादकीय काम त्याने हातीं घेतले. दक्षिण चीनमधील विद्यार्थी चळवळीचा जोरदार पुरस्कार या पत्रातून करण्यात येत असे. अर्वाचीन सांस्कृतिक व राजकीय मतप्रणालींचा अभ्यास करण्याकरता ' सांस्कृतिक ग्रंथमंडळ ' नावाची एक संस्था चांगशा येथें स्थापण्यांत आली. आरंभापासून या संस्थेच्या कामात माउने कळकळीनें भाग घेतला होता. ही नवीन निघालेली. संस्था व पूर्वीचे चांगशा येथील समाज हित-संवर्धक मंडळ या दोन्ही संस्थांनीं हुनानच्या त्यावेळच्या जुलमी अधिकाऱ्या-विरुद्ध चळवळ चालविली. या अधिकाऱ्याच्या जुलमाविरुद्ध विद्यार्थ्यांनीं सार्व-त्रिक संपही केला. पेकिङ्पर्यंत हें गाऱ्हाणें नेण्यात आलें पण त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं. या अधिकाऱ्याने उलट विद्यार्थ्यांतर्फे निघणारें ' शिआङ् चिआङ् ' या पत्राच्या प्रकाशनास बंदी केली.

समाजहितसंवर्धक मंडळाचा प्रतिनिधी या नात्यानें माउ पेकिंङला गेला. त्याठिकाणीं लष्करी सत्ताविरोधी चळवळींत त्यानें भाग घेतला. या चळवळीचा रोख हुनानच्या जुलमी अधिकाऱ्याविरुद्धही होता. शेवटीं या अधिकाऱ्याची बदली होऊन त्या ठिकाणी नवीन अधिकारी नेमण्यात आला. १९१९ मध्यें तो दुसऱ्यादा शांघायला आला. याठिकाणीं प्रसिद्ध कम्यूनिस्ट पुढारी चेन् तू सू व इतरही काहीं पुढाऱ्यांच्या भेटी घेऊन हुनान-मधील विद्यार्थी चळवळीला त्यानें पाठिंबा मिळविला. चेन् तू सूबरोबर हुनान प्रांताच्या पुनर्घटनेसंबंधानें त्याने चर्चा केली. ही पुनर्घटनेची चळवळ चालविण्याकरता संघ स्थापन करण्याच्या योजनेसंबंधानेही त्यानें त्याच्याशीं विचारविनिमय केला. या सर्व तयारीनिशीं तो चांगशाला परत आला व या नवीन संघाच्या प्रस्थापनेच्या कामाला तो लागला. या ठिकाणीं त्यानें शिक्षकाची नोकरी धरली. उरलेल्या वेळात समाजहितसंवर्धक मंडळाचें काम तो करीत होता. हुनानच्या स्वातंत्र्याची प्रांतिक स्वायत्ततेची चळवळ या मंडळानें या वेळीं हातीं घेतली होती. हुनानी स्वातंत्र्यवाद्याची चळवळ इतकी फोफावली कीं, या लोकांनीं हुनानी पार्लमेंटची बैठक चालू असता तिच्यावर हल्ला चढविला व पार्लमेंटच्या इमारतीवर असलेलें चीनी सरकारचें

निशाणे खालीं ओढून तीं फाडून टाकलीं. सरकारने नेमलेले जमीनदार व भांडवलवाले या पार्लमेंटचे सभासद होते. पार्लमेंट-वरील हल्ला ही हुनानमधील चळवळीच्या दृष्टीने एक मोठीच गोष्ट होती. या मंडळातर्फे १९२०सालीं रशियन आक्टोबर क्रांतीच्या वर्षदिनानिमित्त प्रचंड मिरवणूक काढण्यात आली. पण पोलिसांनीं ती मोडून टाकली. १९२० च्या हिवाळ्यामध्ये राजकीय भूमिकेवर कामगार संघटनेच्या कामाला त्यानें हात घातला. पेकिंगला गेले असताना त्यानें "कम्युनिस्ट जाहीर नामा" "वर्गकलह" व "समाजवादाचा इतिहास" हीं तीन पुस्तकें त्याने वाचलीं. या पुस्तकांनीं माउ च तुङ्चा मार्क्सवादांत प्रवेश करून दिला, इतकेच नव्हे तर या पुस्तकांतील विचारांच्या मननाने त्याला पूर्ण मार्क्सवादी बनविलें. याच वेळीं त्याने याङ कायी हुइशीं लग्न केलें. पेकिंग राष्ट्रीय विद्यापीठाची ती एक विद्यार्थिनी होती. चिनी लोकशाहीच्या क्रांतीच्या चळवळींत चिनी तरुणांचें नेतृत्व तिच्याकडे होतें. कम्युनिस्ट पार्टींतही अत्यंत कर्तृत्वान् स्त्री म्हणून तिची प्रसिद्धी होती. हुनानमधील जहाल तरुणांतील हा अनुकरणीय विवाह होता.

**कम्युनिस्ट पार्टीचा सभासद**—माउ च तुङ मार्क्सवादी झाला होता पण कम्युनिस्ट झाला नव्हता. पण तो योग लवकरच आला. १९२१ च्या मेमध्ये शांघाय येथें कम्यूनिस्ट पार्टीच्या प्रस्थापनेची सभा झाली. या प्रारंभींच्या सभेला माउ व त्याचे इतर १२ हुनानी दोस्त हजर होते. याच वर्षाच्या आक्टोबरमध्यें हुनानमध्यें कम्यूनिस्ट पार्टीची पहिली प्रांतिक शाखा उघडण्यात आली व या शाखेचा तो सभासद झाला. इतर प्रांतांतून व शहरांतूनही पार्टीच्या शाखा स्थापन करण्यात आल्या. मध्यवर्ती पार्टी कमिटीचें ऑफिस अर्थात् शांघाय येथें ठेवण्यात आलें.

याच वेळीं फ्रान्समध्यें पॅरिस येथें चीनी कम्यूनिस्ट पार्टीची संघटना करण्यात आली. "काम करा व शिका." या योजनेप्रमाणे फ्रान्समधील निरनिराळ्या विद्यापीठांतून शिकणाऱ्या कामगार विद्यार्थ्यांनीं पॅरिसमधील चीनी कम्यूनिस्ट पार्टीच्या संस्थापनेंत भाग घेतला होता. चाउ एन् लाइ, लो लिसान, चाइ हो शिंङ व त्याची पत्नी शाङ् चेन् यू यांनीं पार्टीच्या

संघटनेंत प्रमुखत्वानें भाग घेतला होता. जर्मनीमध्येहि यानंतर थोड्या दिवसांनीं चीनी कम्यूनिस्ट पार्टी स्थापन करण्यात आली. लाल फौजेचा आजचा सेनापति जू दे व चिङ ट्वा विद्यापीठाचा प्रोफेसर चेंङ् शेङ् फू याच्या नेतृत्वाखालीं ही पार्टी संघटित करण्यात आली. मास्को व टोकिओमध्येहि याच वर्षांत त्या त्या ठिकाणच्या चिनी कम्यूनिस्टांनीं आपल्या पक्षाच्या शाखा उघडल्या

१९२२ च्या मे महिन्यात हुनानमध्यें कम्यूनिस्ट पार्टीची शाखा उघडण्यात आली. माउ च तुङला या शाखेचा सेक्रेटरी निवडण्यात आलें.

१९२३ मध्ये कॅन्टन येथे भरलेल्या कम्यूनिस्ट पार्टीच्या तिसऱ्या कॉंग्रेसमध्यें उत्तरेकडील लष्करशाहीविरूद्ध संयुक्त फळी उभारण्याकरता कुओमिन्ताङ्बरोबर सहकार्य करण्याचा महत्वाचा ठराव करण्यात आला. १९२४ च्या उन्हाळ्यात कुओमिन्ताङ् पक्षाची पहिली कॉंग्रेस कॅन्टन येथें भरविण्यात आली. या कॉंग्रेसला माउ हजर होता. या सभेनंतर कम्यूनिस्ट पार्टीच्या कार्यकारी मंडळाचा सभासद व कुओमिन्ताङ् पक्षाच्या कार्यकारी मंडळाचा सभासद या दोन्ही नात्यानें संयुक्त आघाडीच्या प्रचाराचें काम त्याने केले.

शांघाय येथे आजारी पडल्यामुळे विश्रांतीकरता तो हुनानला परत आला. पण विश्रांति घेण्याचें बाजूलाच ठेवून हुनानमधील वर्गजागृत लढाऊ वृत्तीच्या शेतकऱ्यांच्या संघटनेच्या कामाला त्याने हात घातला व थोड्याच दिवसात आपल्या साथीदारांच्या मदतीनें हुनान प्रांतात प्रमुख ठिकाणीं किसान संघाची त्यानें प्रस्थापना केली. कम्यूनिस्ट पार्टीने शेतकरी समाजात चालविलेले हें काम जमीनदार वर्गाला अर्थातच पसंत पडलें नाहीं. माउ च तुङला अटक करण्यात यावी, अशी त्यांनीं प्रांताच्या गव्हर्नरापाशीं मागणी केली. गव्हर्नरानें त्याला पकडण्याकरता एक लष्करी पथक पाठविलेलें पाहून तो कॅन्टनला पळून गेला. कॅन्टनमध्यें असताना कुओमिंताङच्या राजकीय खात्यातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या राजकीय साप्ताहिकाच्या संपादकाची जागा त्याला देण्यात आली. किसान चळवळींतील कार्यकर्त्यांना शिक्षण देण्याचे कामही त्याला यावेळीं देण्यात आले होते. या शिक्षणाचा

अभ्यासक्रम माउनेंच तयार केला होता. कॅन्टनमध्ये सुरू केलेल्या या अभ्यास मंडळात शिक्षण घेण्याकरिता चीनमधील एकवीस प्रांतांतील शेतकरी संघाचे प्रतिनिधी आले होते. अंतर्मंगोलियांतीलही कांहीं विद्यार्थी या शिक्षणाचा लाभ घेण्याकरता कॅन्टनला आले होते. कुओमिन्ताङ् पक्षाच्या किसान कामगार या दोन्ही आघाडींचे प्रमुख यावेळीं कम्यूनिस्ट होते, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.

**अखिल चीनी किसान संघ**—कम्यूनिस्ट पार्टीच्या किसान आघाडीची सर्व जबाबदारी माउवर टाकण्यात आली होती व तिला अनुसरून किसान संघटनेसंबधानें अनेक लेखही त्याने यावेळीं लिहिले होते. हुनानी शेतकऱ्यांच्या संघटनेचा त्याला प्रत्यक्ष अनुभव होता. तेव्हा या अनुभवाच्या आधारावर व या बाबतींत त्याने जो अभ्यास केला होता त्याला अनुसरून "चिनी समाजातील निरनिराळ्या वर्गांचे पृथक्करण" हे पत्रक त्याने लिहिले. याच वर्षाच्या मे महिन्यात शांघाय येथे चिआङच्या नेतृत्वाखालीं कुओमिन्ताङ्ची दुसरी कॉंग्रेस भरली. शांघायमध्ये असताना किसान आघाडीचे काम माउकडे देण्यात आलें होतें यानंतर हुनानमधील किसान चळवळीचें निरीक्षण करण्याकरता त्याला तिकडे पाठविण्यात आलें. हुपे, क्याङ्सी व फुकीन या व विशेषतः हुनान प्रांतात १९२७ च्या वसंत ऋतूच्या सुमारास ही चळवळ इतकी जोराने फोफावली कीं, कुओमिन्ताङ्ला तिचें भय वाटू लागलें. सरकारी बडे अधिकारी व सेनानायक ही चळवळ दडपून टाकण्यात आली पाहिजे, हे किसान संघ 'उडाणटप्पू लोकांचे संघ' आहेत, त्यांच्या चळवळी व मागण्या वाजवीपेक्षा फाजील स्वरूपाच्या आहेत, असे म्हणू लागले.

**कुओमिन्ताङविरुद्ध बंडाचा उठाव**—१९२७ मधील शांघाय व कॅन्टनमधील अघोर कत्तलीनें चीनी कम्यूनिस्ट पार्टीची वाताहात झाली खरी पण त्यामुळे चिआङ कायी शेकचे व कुओमिन्ताङ्चें भांडवलशाही धार्जिणे धोरण चांगलें उघडकीला आले व चीनी कम्युनिस्टांना आपलें क्रांतिकार्य पुढें चालविण्याकरता व डॉ. सन्यत्सेनचा तीन लोकतत्वात्मक कार्यक्रम पूर्णपणें अमलात आणण्याकरता नवी विटी, नवें राज्य उभारावें लागलें. या

नंतर पार्टीनें उघडपणें शक्य झालें त्या त्या ठिकाणी आपलीं सोव्हिएटें स्थापन केलीं व सत्ता काबीज करण्याकरता आपल्या हाताखालीं असलेल्या कुओमिन्ताङच्या लष्कराचेंच लाल फौजेत रूपांतर करून कुओमिन्ताङ्-विरुद्ध बंडें उभारण्याची तयारी केली. नान्चाङ्मधील ऐतिहासिक बंड हें या धोरणापैकींच पहिलें पाऊल होतें. हो-लङ् व ये तिङ यांनीं आपल्या हाता-खालच्या वीसाव्या पलटणीच्या जोरावर १ आगस्ट १९२७ रोजी या बंडाचा उठाव केला होता. लाल फौजेचा भावी सर सेनापति जू दे यानेंही आपल्या पलटणीसह हो लङशीं या बंडाच्या कामीं सहकार्य केलें होतें. नानचाङच्या कब्जानंतर चीनमधील कम्युनिस्ट सत्तेला ज्याप्रमाणें सुरुवात झाली त्याचप्रमाणें या बंडानंतर प्रसिद्ध चीनी लाल फौजेच्या उभारणीलाही सुरुवात झाली.

'पावसाळी पिकाचें बंड' या नावानें सर्वत्र प्रसिद्धीस आलेल्या बंडाची तयारी करण्याकरता माउ च तुङ्ला चांगशाकडे पाठविण्यात आलें. पुढील पांच तत्वांवर या बंडाच्या संघटनेची आखणी करण्यात आली होती. (१) कुओमिन्ताङ्शीं असलेला संबंध पूर्णपणे तोडून टाकणें. (२) किसान-कामगारक्रांतिकारक सैन्याची उभारणी करणें. (३) लहान, मध्यम, व बड्या सर्व जमीनदारांच्या मालमत्ता जप्त करणें. (४) कुओमिन्ताङ् सरकारशीं संबंध नसलेली स्वतंत्र कम्यूनिस्ट सत्ता हुनान प्रांतांत प्रस्थापित करणें. (५) खेड्यापाड्यांतून सर्वत्र सोव्हिएटें (पंचराज्यें) स्थापणें.

**चीनमधील पहिलें सोव्हिएट**—वरील कार्यक्रमाप्रमाणे हुनान-मधील किसान संघाच्यातर्फे व्यापक प्रमाणावर बंडाचा उठाव करण्याकरता किसान–कामगार फौजेच्या पहिल्या तुकडया संघटित करण्यात आल्या. किसान–कामगार क्रांतिकारक लष्कराची ही पहिली फौज होती. हान यांङ्-मधील खाणी कामगार प्रमुखत्वानें या पहिल्या तुकडींत होते. हुनानमधील आणखी दोन जिल्ह्यांतील किसान स्वयंसैनिकांना संघटित करून क्रांतिकारक लष्कराची दुसरी फौज उभारण्यात आली. वॅङ् चिङ् वींविरुद्ध बंड करून उठलेल्या वुहान सरकारच्या त्या वेळच्या संरक्षक सैन्याला हाताशीं धरून तिसऱ्या क्रांतिकारक फौजेची उभारणी करण्यात आली. नवीन

भरती करून पहिल्या फौजेंतील झालेली नुकसानी भरून काढण्यात आली व माउ च तुङ या फौजेचा पुन्हा सेनानायक झाला. १९२७ च्या हिवाळ्यात पहिल्या फौजेने चिङ् कान्शानमधील आपलें ठाणें मजबूत राखलें आणि पुढे लवकरच नोवेंबरात हुनानच्या सरहद्दीवरील चालिन भागात कम्यूनिस्ट पार्टीचें पहिलें सोव्हिएट प्रस्थापित करण्यात आलें. लोकशाही तत्वावर या सोव्हिएटचा कार्यक्रम आखण्यात आला होता व त्याची क्रमाक्रमानें प्रगति होईल, असें नेमस्त धोरण ठेवण्यात आलें होतें. जमीनदार वर्गाला नामोहरम करण्याकरता त्याच्या वाड्यावर हल्ले करावे, ते जाळून टाकावे व हातीं सापडतील त्या जमीदाराना ठार करावे, अशा जहाल धोरणाचा पुरस्कार करणारी काहीं मडळी पुढे आली पण माउनें या धोरणाला पाठिंबा दिला नाहीं. १९२८ च्या मेमध्यें जू दे आपल्या फौजेसह चिङ कान्शान् येथे माउ च तुङ् ला येऊन मिळाला. माउच्या प्रगतीपर नेमस्त धोरणाला त्यानेंही पाठिंबा दिला. जमीनीची वाटणी करणें व सोव्हिएट प्रस्थापित करणें या दोन्ही कार्यक्रमावर माउ व जू दे याचें संगनमत झालें व वरील गोष्टी अमलात आणण्याकरता हुनान, क्वाङ् सी व क्वाङ्-तुङ्-प्रांताच्या सरहद्दीवरील जिल्ह्यातून सोव्हिएटें प्रस्थापित करण्याची योजना त्यानीं तयार केली.

**लाल फौजेची उभारणी**—याच सुमारास चीनच्या इतर भागातूनही लाल फौजा उभारण्यात आल्या व हुपे प्रांताच्या पूर्व व पश्चिम भागात बडाचे उठाव करण्यात आले. नवीन सोव्हिएट जिल्हे निर्माण करण्याच्या कामीं या बंडाचा फार उपयोग झाला. किआङ्सीमधील कम्यूनिस्टानीं ली येन लुङ्च्या नेतृत्वाखालीं बडें उठवून सोव्हिएट प्रस्थापनेला योग्य अशी भूमिका तयार केली. या लोकातूनच पुढे तिसऱ्या फौजेची उभारणी झाली.

चिङ्कान्शान् व त्याच्या नजीकचा डोंगर लाल फौजेचा बाले किल्ला होता. सफेत लष्करानें ( कुओमिन्ताङ सरकारच्या लष्करानें ) ही टेकडी सर करण्याचा दोनदा प्रयत्न केला पण या दोन्ही प्रसंगीं लाल फौजानी या लष्कराचा पराभव केला. या विजयी फौजा चिङ् कान्शानला परत आल्या

त्यावेळीं त्याची पुनर्घटना करून त्यातून प्रसिद्ध चौथ्या लाल फौजेची उभारणी करण्यात आली. जू देला या फौजेचा सेनापति नेमण्यात आलें. चिङ्कान्शान्ला यावेळीं आणखीही कांहीं लाल सैनिकांच्या तुकडया आल्या. कुओमिन्ताङ् लष्करातीलच बेदिल झालेल्या या तुकड्या होत्या. या तुकडयांची पुनर्घटना करून पांचवी फौज निर्माण करण्यात आली. चिङ्-कान् शान्च्या डोंगरावर याप्रमाणे सर्व लाल सेना जमा झाल्यामुळें सेनेंतील शिपायांचे खाण्यापिण्याचे फार हाल होऊं लागले. हिवाळ्याकरता लागणारे ऊबदार कपडेही त्यांच्यापाशीं नव्हते. तथापि सैनिकांचा उत्साह कमी झाला नव्हता. " भांडवलशाहीचा नाश करा अन् भुस्सा खा " अशी एक घोषणा यावेळीं सैनिकांतून प्रचलित झाली होती ! ! किआङ् सी प्रांतात चौथ्या फौजेने यानंतर मोहीम सुरू केली व त्या भागातील बहुतेक सर्व तालुक्यांच्या गांवांतून सोव्हिएटे स्थापन करण्यात आलीं. या भागातून चालू असलेल्या जनतेच्या लढाऊ चळवळींचा कम्यूनिस्टांना फायदा घेता आला व लाल फौजेचे महत्त्व वाढत चाललें.

**लालफौजेतील शिस्त**—याप्रमाणें लाल फौजेची संख्या वाढत चालली व तिचें वजनही वाढत चाललें त्याबरोबर या फौजेतील सैनिकांच्या शिस्तीसंबधानेंही या फौजेंतील लहान मोठ्या अधिकाऱ्यांना विचार करावा लागला. कामगार शेतकरी वर्गातील उत्साही तरुणांना सशस्त्र करून या फौजांतून घेण्यात आले. आरंभीं सहजच या सैनिकांमध्यें मवालीपणा, बेफिकीरवृत्ति व गबाळेपणा दिसून आला. रोजच्या कांहीं तरी पराक्रमाच्या हालचाली कराव्या, नवीन नवीन भागांतून फेर फटका करावा, असे या सैनिकांना वाटणें साहजिकच होतें. तारुण्यसहज उत्साहानें व साहसी कृत्यें करण्याच्या हौसेमुळें लाल फौजेत सामील झालेल्या यातरुण सैनिकांत शिस्त निर्माण करणे प्रथम थोडे जड गेलें. पण माउ च तुङ्, जू दे, हो लग वगैरे कर्तृत्ववान् व शुद्ध चारित्र्याच्या पुढाऱ्यांच्या वजनामुळें व सहवासामुळें या सैनिकांत शिस्तीची आवड उत्पन्न होऊं लागली. १९२९ च्या डिसेंबरांत चौथ्या फौजेतर्फे भरलेल्या पार्टीच्या परिषदेंत या विषयासंबधानें मुख्यत्वानें चर्चा करण्यात आली. लोकशाहीसंबधाच्या विलक्षण कल्पनांनीं व पार्टीच्या

धोरणासबंधाच्या गैरसमजामुळेही सैनिकाच्या शिस्तींत ढिलेपणा आला होता. परिषदेंत या गोष्टी सबंधानेही चर्चा होऊन लोकशाहीच्या योग्य कल्पना देण्यात आल्या व सैनिकाच्या मनातील पार्टीच्या धोरणासबधाचे गैरसमजही दूर करण्यात आले. या सैनिकातील ट्रास्कीपथीय गटानें अतिरेकी कृत्ये करून लाल फौजेत घोटाळा माजविण्याचा प्रयत्न केला होता पण प्रत्यक्ष अनुभवानें हें अतिरेकी धोरण कसें चुकीचे आहे, हे दाखवून देण्यात आले व या धोरणाचा पुरस्कार करणाऱ्या काही प्रमुख लोकाना त्याच्या जबाबदारीच्या कामावरून दूर करण्यात आलें.

**गनीमी डाव पेंच**—या परिषदेनतर कियाङसीमध्ये सोव्हिएट सत्ता निर्माण करण्याचा जोराचा प्रयत्न करण्यात आला व पुढील तीन चार महिन्यात कियाङ्सीचा दक्षिण भाग लाल फौजेच्या ताब्यात आला व सोव्हिएट प्रातातील मध्यवर्ती ठाणे याच भागात प्रस्थापित करण्यात आले. याच सुमारास कुओमिन्ताङ्च्या लष्कराच्या काही पथकानीं बडाचे निशाण उभारलें.या पथकाचे नायक आपाल्या सैन्यासह लाल फौजेला येऊन मिळाले तेव्हा या पथकाची पुनर्घटना करून तिसऱ्या फौजेत त्याना सामील करण्यात आलें. १९२७ मध्ये झालेल्या शाघाय व कॅन्टनमधील किसान-कामगारांच्या कत्तलीनंतर सत्ता काबीज करण्याचे व स्वतःची फौज उभी करण्याचें धोरण स्वीकारण्यात आलें, त्याप्रमाणे १९२७ नतरच्या दोन तीन वर्षांत हुनान, हुपे, कियाङ्सी या प्रातातील १९ जिल्ह्यातून सोव्हिएटे निर्माण करण्यात आली. लाल फौजेचीही झपाट्यानें वाढ होत गेली. १९२८ मध्यें लाल फौजेतील सैनिकाची एकूण सख्या १०,००० होती. १९२९ मध्ये ती २२,००० झाली व १९३० मध्ये ती ६२,००० वर गेली. कुओमिन्ताङ्ग सरकारच्या लाखानीं मोजता येणाऱ्या सैन्याच्या दृष्टीनें वरील संख्या काहींच नव्हे हें खरें असलें तरी लाल फौजेनें आपल्या या अल्पसख्याबलाचें वैगुण्य नाना युक्तिप्रयुक्तींनीं युक्त असलेल्या गनीमी काव्याचें धोरण स्वीकारून भरून काढले. शत्रू अंगावर चालून आला कीं पिछेहाट करावी, शत्रू आपली चढाई थाबवून छावणी करून राहील त्यावेळीं त्याच्या छावणीवर गुप्तपणे एकाएकी हल्ला चढवून व लुटालूट करून त्याला त्रास द्यावा, शत्रू लढाई टाळण्याच्या

बेतात आहे, असे दिसताच त्याच्यावर हल्ला चढवावा व शत्रु-सैन्याने पिछेहाट करून पाठ फिरवली कीं, त्याचा पाठलाग करून त्याला सतावून सोडावे. लाल फौजेच्या गनीमी काव्याचे हे चार डाव होते. शत्रू-वर हल्ला चढविताना आपल्या सर्व फौजा एकत्र आणून जोराचा हल्ला चढवावा व हल्ल्याचा हेतू सिद्ध झाला कीं, आपल्या फौजाची पागापाग करावी. लाल फौजेच्या गनीमी काव्यातील हें रहस्य होतें. कोठें तरी स्थिर राहून किंवा ठाणे देऊन राहून शत्रूशीं लढावयाचे नाहीं. शत्रूवर एकाएकी हल्ला चढवून त्याची दाणादाण उडवून द्यावयाची व त्याचा नाश करावयाचा या गनीमी धोरणामुळे लाल फौज संख्येनें थोडी असली तरी ती अजिंक्य बनली होती.

**जनतेची फौज**—लाल फौज जनतेची फौज होती. किसान-कामगार जनतेतून स्वयंस्फूर्तीने निर्माण झालेली अशी ती फौज होती. भाडोत्रीपणाचा लवलेशही या फौजेत नव्हता. यामुळे या फौजाची पथके ज्या खेड्यापाड्यातून किंवा त्याच्या आसपास मुक्काम करीत त्यावेळीं खेड्यापाड्यातील शेतकरी त्याचे आनंदाने स्वागत करीत व त्याच्या सुखसोयी करण्याकरता अहमहमिकेने झटत. लाल फौजाची पथके खेड्यापाड्यावरून जाताना, तेथे मुक्काम करताना किंवा तेथून छावण्या हलविताना तेथील जनतेला यत्किंचितही तोशीस लागेल, असें कृत्य कोणीही करता कामा नये, असे कडक हुकूम लाल फौजेच्या सेनानायकानीं दिलेले असत. गरीब शेतकऱ्याच्या मालमत्तेची कोणत्याही प्रकारची अफरातफर करता कामा नये व जमीनदाराच्या मालमत्ता ताब्यात घेतल्या तर त्याची व्यवस्था लावण्याकरता सैन्याच्या मुख्याधिकाऱ्याच्या किंवा तेथे सोव्हिएट अस्तित्वात असेल तर त्या सोव्हिएट सरकारच्या स्वाधीन कराव्या, असा कडक नियम घालून देण्यात आला होता. खेडेगावातून व शेतातील शेतकऱ्याच्या झोपड्यातून लाल सैनिक मुक्कामाकरता राहिले तर त्या झोपड्यातून बाहेर पडताना त्याची फाटके जेथल्या तेथे बसवावीं, निजण्याकरता दिलेल्या चटया ज्याच्या त्याच्या स्वाधीन कराव्या, शेतकऱ्याशीं सभ्यपणानें व नम्रपणानें वागावें, जमलें तर त्याना मदत करावी, त्याच्याकडून घेतलेल्या सर्व वस्तू परत

करावया, आपल्या हातून शेतकऱ्याची काही नुकसान झाली असल्यास ती भरून द्यावी, शेतकऱ्याशीं प्रामाणिकपणें चोख व्यवहार करावा, विकत घेतलेल्या वस्तूचे पैसे देऊन टाकावे व गावाचे आरोग्य बिघडेल, असे कोणतेंहि कृत्य करूं नये, असे लहानसहान नियमसुद्धा लाल सैनिकाकरता घालून देण्यात आले होते व त्याचा कोठेही भग न होईल अशी खबरदारी घेण्यात येत होती. या कडक शिस्तीमुळे लाल सैनिकाबद्दल ते जातील त्या त्या ठिकाणच्या लोकाना त्याच्याबद्दल आपलेपणा वाटूं लागला असल्यास त्यात काहींच नवल नव्हतें. लाल फौज जनतेची होती. सर्व प्रकारच्या पिळणुकीपासून जनतेला मुक्त करून जनतेचें खरे खुरे राज्य प्रस्थापित करण्याकरता तळहातावर शिर घेऊन ती लढत होती, हें पाहून लाल फौजेबद्दलचा जनतेच्या मनातील आदर व प्रेम शतपटीने वाढले होते व त्याचे प्रत्यतर म्हणून तरुण किसान व कामगार लाल सैन्यात अहमहमिकेने भरती होत होते. लाल फौज व तिचे पुढारी ज्या ज्या ठिकाणीं गेले त्या त्या ठिकाणीं त्याना सोव्हिएट सत्ता स्थापण्यात भराभर यश मिळत गेलें, त्यातील त्याचे मुख्य कारण लाल सैनिकाबद्दल जनतेला वाटणारा आदर व प्रेम हेंच होते. आणि या प्रेमाच्या जोरावरच चीनी कम्युनिस्ट पार्टीचे पुढारी चीनमध्यें सत्ता काबीज करण्याचा कार्यक्रम झपाट्यानें अमलात आणीत होते.



# कम्यूनिस्टांवरील मोहिमा

कियाङ्सी प्रांताच्या दक्षिण भागात सोव्हिएट सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर लाल फौजेनें १९२९ च्या एप्रिलांत या प्रांताच्या उत्तरेकडे आपला मोर्चा वळविला. या भागांतील बरीचशीं शहरें तिनें आपल्या ताब्यांत घेतलीं व कुओमिन्ताङ्च्या फौजेला ठिकठिकाणीं खडे चारले. चीनी किसान-कामगार क्रांतिकारक कमिटी याच वेळीं नेमण्यांत आली व माउ च तुङ्ला या कमिटीचा अध्यक्ष निवडण्यांत आलें. कियाङ्सीप्रमाणें हुनान-मध्येही लाल फौजेचें वजन सर्वत्र वाढलें होतें. हुनानी शेतकरी समाजांत माउचें नाव सर्वतोमुखीं झालें होते. माउला पकडून देणारास, मग तो जिवंत असो वा मृत असो, मोठीं बक्षिसें लावण्यांत आलीं होतीं. माउप्रमाणें जु दे व इतर कम्यूनिस्ट पुढाऱ्यांच्या बाबतींतही अशींच बक्षिसें जाहीर करण्यांत आलीं होतीं. या पुढाऱ्यांच्या जमीनी जप्त करण्यांत आल्या होत्या व त्यांचे नातेवाइक हातीं सांपडले तर त्यांनाही ठार करण्यांत येत होते किंवा त्यांचा छळ करण्यांत येत होता. कुओमिन्ताङ् सरकारनें माउ च तुङ्ची जमीन जप्त केली. माउच्या बायकोला, त्याच्या मुलाला, बहिणीला, बायकोच्या दोघां भावांना पकडण्यांत आलें बायकोला व बहिणीला फांशी देण्यांत आलें व बाकीच्यांना कांहीं दिवस डांबून ठेवून नंतर सोडून देण्यांत आलें.

**पहिली मोहिम**—कियाङ्सीभागांत आपला जम बसविल्यानंतर चांगशा शहर हस्तगत करण्याकरतां पहिली व तिसरी फौज तिकडे पाठविण्यांत आली. पण कुओमिन्ताङ्च्या लष्करी बंदोबस्तापुढें लाल फौजांचे कांहीं चाललें नाहीं. या शहराला घातलेल्या वेढ्याच्या वेळीं कुओमिन्ताङ्च्या लष्कराबरोबर लाल फौजेची मोठी चकमक उडाली. शत्रू सैन्याच्या दोन पलटणीही लाल सैनिकांनीं बरबाद केल्या पण अखेर कुओमिन्ताङच्या लष्कराचा जय झाला व लाल फौजेला या शहराचा नाद सोडावा लागला. फेङ यू शिआङ व चिआङ काये शेक यांच्या आपसांतील युद्धाचा फायदा आपल्याला घेतां येईल या कल्पनेनें लाल फौजांनीं चांगशावर हल्ला चढ-

विला होता पण ही कल्पना चुकीची ठरली. लाल फौजा च्यागशाहून मागे हटल्या तरी हुनान, कियाङ सी वगैरे प्रातातील त्याचे सामर्थ्य मुळींच कमी झालेलें नव्हतें. हें पाहून नान्किङ सरकारने कम्युनिस्टाचा काटा कायमचा काढून टाकण्याकरता लाल फौजावर एका मागून पाच मोहिमा केल्या. कम्युनिस्ट विध्वसंनाच्या या पाच मोहिमापैकीं पहिली मोहिम १९३० च्या अखेरीला सुरूं झाली. नान्किङ सरकारच्या एक लाख फौजेनें लाल मुलखाला वेढा दिला व पाच निरनिराळ्या मार्गांनीं ती या मुलखात शिरू लागली. या सेनेचे अधिपत्य लू ताइ पिङकडे होते. या सेनेविरुद्ध अवघी ४०,००० फौज लाल सेनापतींना एकत्र करता आली. लाल फौज सख्येनें याप्रमाणे कमी होती तरी गनीमी डावपेचाच्या जोरावर नान्किङ सरकारच्या विस्कळितपणे पसरलेल्या पलटणींवर तिनें अकल्पित हल्ले चढविले, त्याना जेरीस आणलें व १९३१च्या जानेवारींत ही मोहीम पूर्णपणें पराभूत करण्यात आली.

**दुसरी मोहीम**—यानतर फक्त चार महिन्याचा विसावा घेऊन नान्किङ् सरकारनें कम्यूनिस्टावरील दुसऱ्या मोहीमेला हात घातला. या खेपेस पहिल्या मोहिमेच्या दुप्पट २००,००० सैन्य लाल प्रातावर चालून आले. नान्किङ् सरकारचा युद्धखात्याचा प्रधान हो यिङ्चिङ् वरील प्रचड सैन्यानिशीं कम्यूनिस्टावर स्वारी करून आला होता. या खेपेस निरनिराळ्या सात मार्गांनीं लाल मुलखात शिरण्याचा डाव टाकण्यात आला होता. पहिल्या मोहिमेनंतर थोडयाच दिवसानीं ही दुसरी मोहीम सुरू झाली. लाल फौजेची परिस्थिति अत्यंत आणीबाणीची होती. मुलुख लहान, युद्धसाधनाची कमतरता, शत्रू सैन्याचा चोहोंकडून वेढा, अशा, स्थितींतही लाल फौजेने यत्किंचितही न डगमगता या प्रचड सेनेला तोंड दिले. ही प्रचडसेना सात मार्गांनीं लाल मुलखात शिरू लागली, ही गोष्ट कम्यूनिस्टाना पथ्यावरच पडली. या सैन्याला त्यानीं समोरा समोर मुळींच तोंड दिलें नाहीं. या साती मार्गातून शिरणाऱ्या सैन्यावर गनीमी काव्याचा अवलब करून निरनिराळ्या वेळीं कम्यूनिस्टानीं आकस्मिक हल्ले चढविले. शत्रूसैन्याला चागले आत येऊ द्यावयाचे व त्याच्यावर एकदम चोहों बाजूने तुटून पडायचे, त्याची पिछाडी मोडून काढून व मूळ सैन्यापासून त्याला अलग करून मारून काढावयाचें,

या डावपेंचाचा अवलब करून सरकारी सैन्याचा त्यानीं ठिकठिकाणीं पराभव केला. लाल फौजेच्या या धडाक्यापुढें चौथ्या मार्गातून घुमणाऱ्या सरकारी सेनेनें माघार घेतली व पाचव्या मार्गातील सैन्य तर लाल फौजेनें अजीबात निकालातच काढलें. ही मोहीम सुरू झाल्यापासून चौदा दिवसात लाल फौजेनें एकदर सहा लढाया मारल्या व नान्किङ् सरकारच्या सैन्याला पीछेहाट करावयास भाग पाडलें.

**तिसरी मोहीम**—दुसऱ्या मोहिमेच्या या पराभवामुळे चिआङ-कायी शेक अधिकच खवळला. लाल डाकूचा अखेरचा समाचार घ्यावयाचा, यापुढें त्याचा मागमूसही उरू द्यावयाचा नाहीं, अशा निश्चयानें चिआङ कायी शेक यावेळीं बाहेर पडला होता. या मोहिमेसाठीं ३,००,००० सैन्याची त्याने जमवाजमव केली स्वतःच त्याने या प्रचड सैन्याचें आधिपत्य स्वीकारलें. सरकारी लष्करातील अगदीं निवडक सेनापती त्यानें आपल्या बरोबर घेतले व लाल फौजेवर एकदम तुटून पडून तिची पाळेंमुळें खणून टाकण्याचें त्यानें ठरविले. रोज ६० मैलाची मजल मारीत सोव्हिएट मुलखात तो एकाएकी दाखल झाला. चिआङचे हें धोरण लाल फौजवाल्याना पथ्यावर पडले. चिआङच्या फौजेला त्यानीं आतवर येऊ दिलें व नंतर तिला चोहोबाजूनें वेढून तिचा निःपात करण्यास सुरवात केली. चिआङ्चें भाडोत्री अवाढव्य सैन्य कम्यूनिस्टाच्या गनीमी काव्याच्या चढाईपुढें टिकाव धरू शकलें नाहीं. लाल फौजेच्या तुकड्या केव्हा कोणीकडून येऊन हल्ला चढवतील, याचा नियम नसल्यामुळें चिआङच्या लष्करातील सैनिकाची तिरपीट उडाली. चिआङ्च्या सैन्याची पिछाडी मोडून काढून बाहेरून या सैन्याला मिळणारी सर्व मदत हाणून पाडण्याकरता लाल फौजेच्या अधिकाऱ्यानीं निरनिराळया तुकड्याची योजना केली होती व ३०,००० सैनिकाची प्रमुख फौज चिआङच्या लाल मुलखात शिरलेल्या लष्कराचा समाचार घेत होती. चिआङच्या सेनेशीं झालेल्या अगदीं पहिल्या चकमकींत लाल फोजेने सरकारी सैन्याच्या बऱ्याच तुकड्या पाडाव केल्या, बराच दारूगोळा, तोफा व युद्धसामुग्री हस्तगत केली. यानतर सारखे पाच दिवस चिआङच्या सेनेच्या निरनिराळ्या

भागावर आकस्मिक हल्ले चढवून तिला त्यानीं अगदीं जेरीस आणून सोडलें. लाल फौजेच्या गनीमी काव्यामुळें चिआङ्ची प्रचंड सेना लाल मुलखांत प्रगति करूं शकली नाहीं. उलट बाहेरचा सगळा संबंध तुटून जागच्या जागीं कुचंबून राहिल्यामुळे या सेनेच्या हालास पारावार राहिला नाहीं. सप्टेंबरमध्यें चिआङ कायी शेंकने आपला पराभव कबूल करून लाल मुलखातून आपले सैन्य बाहेर काढण्यास सुरुवात केली व आक्टोबरमध्यें या मुलखाला रामराम ठोकला. आपल्या मुलखातून बाहेर पडल्यावर या सेनेचा पाठलाग करण्याच्या भानगडींत लाल फौज पडली नाहीं.

**जपानी स्वारी**—कुओमिन्ताङ व कुन्च्याङताङ ( चिनी कम्युनिस्ट पार्टी ) याच्यात चालू असलेल्या यादवीचा जपाननें अर्थात्च फायदा घेतला. १९३१ च्या सेप्टेंबरमध्ये जपानने मॅन्च्युरियावर हल्ला चढविला. १९२९ मध्ये जपाननें शान्तुङ्मधून आपले सैन्य काढून घेतले. जपानमधील जहाल पक्षाच्या लोकाना सरकारचे हें धोरण पसंत नव्हते. चीनवर स्वारी करण्याची संधी ते पाहात होते. दक्षिण मॅन्च्युरियामध्ये आपलें लष्कर ठेवण्याची मोकळीक जपानला यापूर्वीच मिळाली होती. चिनी जपानी तहानेंच जपानला अशी मोकळीक देण्यात आली होती. चीनमध्यें या खेपेस प्रवेश करण्याकरता जपानला कांहीं तरी निमित्त पाहिजे होतें. ते त्याला लवकरच मिळालें. मॅन्च्युरियातील रेल्वेवर एके ठिकाणीं स्फोट झाला. जपानला एवढें निमित्त पुरे झालें. त्याने मुकडेनवर हल्ला चढवून ते आपल्या ताब्यात घेतलें.

मॅन्च्यूरियावर स्वारी करून जपानने तेथील राज्यसत्ता काबीज केली व त्याबरोबरच तेथील कारखाने, रेल्वे, खाणी, बँका ताब्यात घेऊन आर्थिक आक्रमणही केलें. या वेळीं देशातील सर्व सामर्थ्य एकवटून नान्किङ् सरकारनें जपानी आक्रमणाचा प्रतिकार करण्याचे ठरविलें नाहीं तर उलट ही बाब राष्ट्रसंघापुढे विचाराकरता मांडण्याची परकीय साम्राज्यवाद्यानीं दिलेली सल्ला त्याला योग्य वाटली. तिकडील चिनी लष्करी सेनापति चँङ् सू लिआङ यास जपानला प्रतिकार न करण्याचा हुकूम पाठविला. चीनमधील तिन्ही ईशान्य प्रांतांत चँङचे सैन्य या वेळीं नव्हतें. पेपिङ राजधानीच्या आसपास सुरूं झालेल्या बंडाळीचा बीमोड करण्याच्या कामीं तें गुतलें होतें. मॅन्च्युरि-

यातील स्थानिक फौजाजवळ बेताबाताचीच युद्धसामुग्री होती. नानकिङ् सरकारच्या हुकमाशिवायच या फौजानीं जपानी आक्रमणाला तोंड दिलें. या फौजामध्येंही एकजुटीचा अभाव होता व परस्पर दळणवळणही नव्हतें, यामुळें या प्रतिकाराचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अशा परिस्थितींत जपाननें अवघ्या तीन महिन्यात सबंध मॅन्च्युरिया घशात घातला असल्यास त्यात कांहींच नवल नव्हते.

यानंतर जपानने मॅन्च्युरियात बाहुली सरकार स्थापण्याचें ठरविलें. या बाबतींत चीनचा व परकीय साम्राज्यवादी सरकाराचा आपल्याला विरोध होता कामा नये म्हणून जपाननें १९३२ च्या डिसेंबरमध्ये शांघायवर चाल केली. शांघायमधून जपानला बाहेर घालवून देण्याच्या बाबतींत अमेरिका व इंग्लंड येथील मुत्सद्द्यात जोराच्या वाटाघाटी सुरू झाल्या व त्या सुरू असताना जपाननें मॅन्च्यूकोचे ( मॅन्च्यूरियाचे ) बाहुली सरकार निर्माण केले. शांघायच्या स्वारीचा उद्देश याप्रमाणे सफल झाल्यावर जपानने त्यापुढें पाउल टाकलें नाहीं. मॅन्च्यूरियात थोडेसें स्थिरस्थावर झाल्यावर जेहोल प्रांताकडे जपानी लष्करानें आपला मोर्चा वळविला. मॅन्च्यूरियाप्रमाणें अवघ्या दोन महिन्यात हा प्रांत हस्तगत करून तो मॅन्च्यूकोला जोडून टाकला.

जपाननें मॅन्च्यूरियावर स्वारी करून आपले खरें मुलुखगिरीचे स्वरूप प्रकट केलें. राष्ट्रसंघाशीं असलेला आपला संबंध तोडून टाकला, नवराष्ट्र करारांच्या अटी धाब्यावर बसविल्या व जगावर महायुद्धाचा प्रसंग येणार अशी परिस्थिति निर्माण केली, तरी साम्राज्यवादी बड्या राष्ट्रांना त्यात कांहींच गैर वाटले नाहीं, उलट समाधानच वाटले. ब्रिटनने व फ्रान्सनें तर जपानच्या या कृत्याबद्दल आपली स्पष्ट संमतीच दर्शविली. राष्ट्रसंघातील चिनी प्रतिनिधीनें जपानच्या या अन्यायाविरुद्ध राष्ट्रसंघाकडे दाद मागितली. अमेरिकेच्या प्रतिनिधीनें राष्ट्रसंघाला मदत करण्याचें आश्वासन दिलें पण ब्रिटनचा प्रतिनिधी सर जॉन सायमन जिनीव्हाला पोंचल्याबरोबर तडजोडीची बोलणीं करण्यास त्यानें सुरुवात केली आणि कालहरण करण्याकरता चौकशी कमिशन नेमण्याची सूचना राष्ट्रसंघापुढे मांडली. ही सूचना मान्य करण्यात आली. लिट-

नच्या प्रमुखत्वाखालीं चीनला कमिशन पाठविण्यात आलें. एकीकडे कमिशनची चौकशी चालू होती तर दुसरीकडे जपान चीनमध्यें आत आत घुसत चाललें होते. जिनीव्हा येथें पत्रकाराच्या प्रतिनिधीपुढें या संबधात आपलें मत व्यक्त करताना सर जॉन सायमनने स्पष्टपणें जाहीर केलें कीं, " जपानला विस्तार पावण्याची इच्छा आहे. ग्रेटब्रिटननें पूर्वी जें केलें तीच गोष्ट जपान आज करीत आहे. इतिहासातील ज्या गतिमान् शक्तींनीं आम्हाला हिंदुस्थानकडे ओढून नेलें व ज्या शक्ति जपानच्याही मनात मॅन्च्यूरियात जाण्याची प्रेरणा करीत आहेत त्या शक्तींना राष्ट्रसंघ पूर्ण वाव देत नाहीं, हीच या बाबतींतील अडचण आहे. "

ब्रिटिशाच्या पाठिंब्याला पूरक होतील अशा वल्गना जपाननेंही चालू ठेवल्या होत्या. अतिपूर्व राष्ट्रातून पसरत चाललेल्या कम्यूनिझमला व हिंदुस्थानावरील सोव्हिएट आक्रमणाला आळा घालण्याची जरूरी आहे, असे जपान सर्व जगाला सांगत सुटलें होतें व जगातील प्रतिगामी पत्रें जपानच्या या वल्गनाना जोरानें साथ देत होतीं. लिटन कमिशनने मॅन्च्यूकोच्या बाहुली सरकारला मान्यता दिली नाहीं. अमेरिकेनें अर्थात् या रिपोर्टाबद्दल आपली संमती दर्शविली. ब्रिटननें तसें काहींच केले नाहीं. उलट ब्रिटिश कारखानदार संघाने मॅन्च्यूकोला शुभाशीर्वाद देणारें शिष्टमंडळ पाठविलें.

**राष्ट्रीय सरकारचें दुटप्पी धोरण**—जपानी आक्रमणाला तोंड द्यावयाचें तर नान्किङ सरकारपुढें तीन मार्ग मोकळे होते ( १ ) आपल्या अंतर्गत धोरणात पूर्णपणें बदल करून परिणामकारक रीतीने जपानला प्रतिकार करावा. ( २ ) परकीय राष्ट्रें आपल्याशीं मित्रत्वानें वागतील या आशेनें त्यांच्यावर अवलंबून राहावें. ( ३ ) किंवा जपानला शरण जावें. पण नान्किङ सरकारनें अर्धवट धोरण स्वीकारलें, त्यामुळें त्याची केविलवाणी स्थिति झाली. जपानपुढे राष्ट्रसंघाचेंही काहीं चालत नाहीं तेव्हा जपानला शरण गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें काहीं म्हणू लागले व त्यांचेंच मत जवळ जवळ प्रभावी ठरलें. वॅङ चिङ्गू वी मुख्य प्रधान व परराष्ट्र खात्याचा प्रधान झाला व त्याने जपानशीं सलोख्याचा तह केला. लाल बावटेवाल्यांच्या चळवळींमुळें जपानला थोपवून धरण्याकरता सैन्य पाठविता आलें नाहीं, असें

त्यानें निमित्त केलें. याप्रमाणें वँडच्या कारकीर्दीत नान्किङ सरकारने एकीकडे जपानची समजूत काढण्याचें व दुसरीकडे कम्यूनिस्टाशीं वेर बाधून आपसातील युद्ध चालू ठेवण्याचें, असे दुटप्पी धोरण स्वीकारलें. महसूल खात्याचा प्रधान टी. व्ही. सुग याने वँड्च्या या धोरणाचा निषेध करण्याकरता आपल्या जागेचा राजीनामा दिला. जपाननें जेहोल प्रातावर स्वारी केली त्या वेळींच त्याच्यावर प्रतिहल्ला चढवावा, असें सुगचे मत होतें. पण वँडच्या हातात प्रधानकींची सूत्रे असल्यामुळे त्याच्या या मताचा काहीं उपयोग झाला नाहीं. सर सेनापति चिआङ काथी शेक वँड्च्याच मताचा असल्यामुळें सुगच्या या मताला कोण विचारणार ? टी. व्ही. सुग चिआङ्चा मेहुणा होता. चिआङची मेहुणी व डॉ. सन्यत्सेनची पत्नी चिङ्लिङ व त्याचा मुलगा सन फो यानाही चिआङचे व वँडचें हें धोरण पसत नव्हते. पण कम्यूनिस्टाचा नाश करण्याचें ककण हाती बाधलेल्या चिआङनें आपल्या या वजनदार आप्तेष्टाचाही सल्ला धाब्यावर बसविला.

**जपानविरोधी आघाडी**—जपानशीं समजुतीनें वागण्याचें नान्किङ सरकारचे धोरण चिनी कम्यूनिस्टाना पहिल्यापासूनच मान्य नव्हतें. चिआङ् काथी शेकनें चिनी भाडवलशाहीशीं सगनमत करून कम्यूनिस्टावर हत्यार उचललें होतें आणि आता तर जपानसारख्या लष्करशाहीचा पुरस्कार करणाऱ्या साम्राज्यवादी सरकारशीं मिळतें घेण्याचे धोरण त्यानें स्वीकारलें, ही गोष्ट चिनी कम्यूनिस्टाना कधींच संमत होण्याजोगी नव्हती. १९२७ पासून चिनी कम्यूनिस्टानीं नान्किङ् सरकारशीं फारकत करून चीनमध्ये स्वतत्र सोव्हिएट प्रस्थापित करण्याचे व त्याबरोबरच लष्करी सामर्थ्य वाढविण्याचें धोरण स्वीकारलें होतें . आपल्यावर तीन वेळा चालून आलेल्या नान्किङ् सरकारच्या सैन्याला तस्वीरीतीनें हात दाखविला होता. १९२७ मध्यें कॅन्टन व शाघाय येथे कामगाराची कत्तल करण्यात आली पण या दहशतीचा काहीं उपयोग झाला नाहीं. यानतर एक दोन वर्षांत तेथील कामगार पुन्हा सघटित झाले व १९३० सालचा व त्याहून अधिक उत्साहानें १९३१ सालचा मे दिन त्यानीं साजरा केला. मॅन्च्यूरियावर जपाननें आक्रमण केलें. या आक्रमणामुळे त्या भागातील कामगार सघटनेला उत्तेजनच मिळालें.

जपानी आक्रमणानंतर मॅन्च्यूरियातील कामगार संघटनेला नवीनच वळण मिळालें. या चळवळींतूनच जपानविरोधी स्वयंसैनिक दलें निर्माण झालीं व या दलाचेंच पुढें मॅन्च्यूरियन गनीमी फौजांत रूपांतर झालें. या फौजांतील प्रमुख अधिकाऱ्यांत कम्यूनिस्टांचाच विशेष भरणा होता. जपानी आक्रमणानंतर चीनमध्यें सर्वत्र जपानीमालावरील बहिष्काराच्या चळवळीची प्रचंड लाट उसळली. चिनी विद्यार्थ्यांनीं या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला होता. चीनमधील शहरोंशहरीं जपानविरोधी निदर्शनेंही त्यांनीं केलीं. शांघाय-मधील जपानी मालकीच्या गिरण्यांतील कामगारांनींही सार्वत्रिक संप पुकारून जपानच्या या आक्रमक धोरणाचा निषेध केला. कम्यूनिस्टांच्या सोव्हिएट भूमींतील नागरिकांनीं हजारों डॉलरांची मदत पाठवून या सार्वत्रिक संपाला पाठिंबा दिला. चीनी राष्ट्रीय क्रांतिकारक चळवळीच्या आघाडीचीं हीं पहिलीं पाउलें होतीं. जपाननें शांघायवर केलेल्या हल्ल्याला तोंड देणाऱ्या १९ व्या रूट फौजेला शहरांतील संपवाल्या कामगार स्त्री पुरुषांनीं हरएक प्रकारें मदत केली.

**सोव्हिएट चीनची पहिली कॉंग्रेस**—१९३१ सालीं दक्षिण व मध्य चीनमधील बऱ्याच भागांत सोव्हिएटें प्रस्थापित करण्यांत आलीं होतीं. सोव्हिएटांचें मुख्य ठाणें या वेळीं किआंड्सी प्रांतांत होतें. जुइ चेन् हें या वेळचें त्यांचें राजधानीचें शहर होतें. जू दे व माउ च तुङ् यांच्या हाताखालील मुख्य फौजा याच भागांत होत्या. कम्यूनिस्टांचें दुसरें सत्ता केंद्र हुनान प्रांतांत होतें आणि फुकीन, क्वाङ्-तुङ् व हुपे या जवळच्या प्रांतांतही अनेक ठिकाणीं सोव्हिएट सत्तेचीं ठाणीं प्रस्थापित करण्यांत आलीं होतीं.

१९३० सालीं चिनी कम्यूनिस्टांनीं शांघाय येथें पहिली कॉंग्रेस भरविण्याचा प्रयत्न केला. पण तो अपयशी ठरला. परकीय राष्ट्रांच्या पोलिसांनीं या कॉंग्रेसची तयारी करणाऱ्या लोकांना नेमकें पकडून त्यांना नान्किङ सरकारच्या स्वाधीन केलें. सरकारच्या अधिकाऱ्यांनीं आयत्या हातांत सांपडलेल्या या कम्यूनिस्टांना फांसावर चढविलें हें सांगावयास नकोच. यानंतर जपाननें मॅन्च्यूरियावर स्वारी करून नान्किङ सरकारचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें. नान्किङ सरकारच्या वॅङ् व चिआङ्प्रभृति मुत्सद्यांनीं

जपानचा प्रतिकार करण्याचे सोडून त्याच्याशीं सलोख्याचें धोरण ठेवण्याचें ठरविलें. चीनी कम्यूनिस्टाना ही गोष्ट अर्थातच मान्य नव्हती. पण जपानविरोधी शक्ति संघटित करून त्याना यशस्वी रीतीनें तोंड द्याव- याचें तर चीनमधील कम्यूनिस्टाचें स्थान कायम व मजबूत करणें अत्यत जरूरीचें होतें आणि याच हेतूनें नान्किंग सरकारनें चालविलेल्या जुलमा- पासून व छळापासून थोडीशी उसत मिळताच १९३१ च्या डिसेंबरमध्ये चीनमधील सोव्हिएट लोकसत्ताक राज्याची पहिली कॉंग्रेस भरविण्यात आली. सोव्हिएट सत्तेची संघटना, कामगारवर्गासबधाचे कायदे, जमीनीबाबतचे कायदे, आर्थिक धोरण, अल्पसख्याक जमातींसबधाचें धोरण, लाल फौजेची उभारणी व तिची शिस्तवार सघटना वगैरे महत्वाच्या गोष्टींचा या कॉंग्रेसमध्यें निर्णय घेण्यात आला. कॉंग्रेसच्या या अधिवेशनानतर लगेच चीनी कम्यू- निस्ट पार्टीची सेंट्रल एक्झिक्यूटिव्ह कमिटी निवडण्यात आली व सोव्हिएट सरकारचे प्रमुख अधिकारी व सेंट्रल कमिटीची सयुक्त बैठक भरून वरील सर्व कायद्याचा व सघटनाचा पुन्हा विचार करण्यात आला व जरूर त्या पुरवणी कायद्याचे मसूदेहि तयार करण्यात आले. याप्रमाणे सर्व महत्वाच्या मूलभूत रचनात्मक गोष्टींचा विचार करून चीनमध्यें चीनी कम्यूनिस्टानीं स्वतत्र लोकसत्ताक सोव्हिएट चीन अस्तित्वात आणले.

**मूलभूत हक्क**—सोव्हिएट चीनची ही लोकशाही कामगार किसानाची लोकशाही आहे. सोव्हिएटची सर्व सत्ता किसान व लाल फौजेचे सैनिक याच्या हातात केंद्रीभूत झालेली आहे. चीनी समाजातील सर्व राबणाऱ्या जनतेला आपले स्वतःचे प्रतिनिधी निवडण्याचा हक्क असून या सत्तेची पूर्ण अमलबजावणी करण्याचा अधिकार या प्रतिनिधीच्या हातीं देण्यात आलेला आहे. श्रम न करणाऱ्या जमीनदाराना व भांडवलवाल्याना स्वाभा- विकच मत देण्याचा हक्क देण्यात आलेला नाहीं. मगोली, तिबेटी, कोरियन, माउ व याव यासारख्या अल्पसख्याक जमातींना स्वयनिर्णयाचा हक्क देण्यात आला आहे. भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य, स्त्रीदास्यविमोचन, किसान-कामगाराचें सघटनास्वातंत्र्य वगैरे जनतेचे सर्व मूलभूत हक्क मान्य करण्यात आले आहेत. सोळा वर्षां

वरच्या सर्व स्त्री-पुरुष नागरिकाना मतदानाचा हक्क देण्यात आला आहे. कॉंग्रेसच्या या अधिवेशनामध्यें मध्यवर्ती कार्यकारी मडळाचीही निवडणूक करण्यात आली व राज्यसत्तेची सर्व सूत्रें त्याच्या हातीं देण्यात आली. या मडळानें दैनदिन कारभार पाहण्याकरता निरनिराळ्या खात्यावर अधिकारी नेमले. साम्राज्यवादाच्या जोखडापासून चीनची मुक्तता करून त्याला पूर्ण स्वतत्र क णे, सर्व विषमतामूलक तह, सवलति व चीनमध्ये लष्कर ठेवण्याचे परराष्ट्राचे हक्क नाशाबित करणें, या ध्येयानें चीनी सोव्हिएट प्रेरित झालें होतें. कोणत्याही परकीय भाडवलवाल्याला सोव्हिएट चीनमध्ये भाडवल गुतवावयाचें असेल तर सोव्हिएट यूनियनचे कायदे त्यानें पाळले पाहिजेत, ही अट मान्य झाल्यावर नवीन करार करूनच त्याला कारखाना काढण्यास परवानगी देण्यात यावी. चीनच्या मागासलेल्या भागात असलेल्या सरजामदाराच्या, जमीनदाराच्या, लष्करशहाच्या व इतर खासगी बड्या मालदाराच्या जमीनी व मालमत्ता जप्त करण्यात याव्या, अशी तरतूद जमीनविषयक कायद्यात करण्यात आली व जमीन नसलेल्या शेतकऱ्याना व गरीब शेतकऱ्याना या जप्त केलेल्या जमीनी देण्यात आल्या. शेतकऱ्याजवळच्या जमीनी सारख्या प्रमाणात असाव्या, अशी तरतूद नसल्यामुळे थोड्या अधिक श्रीमत असलेल्या शेतकऱ्यापाशीं त्याच्या जमीनी राहू देण्यात आल्या व बाकीच्या जमीनींची योग्य वाटणी होईल, अशी व्यवस्था कायद्यात करण्यात आली.

कामगारासबधाच्या कायद्यानें आठ तासाचा दिवस मान्य केला. धोक्याचें काम असेल तर यापेक्षाहि कमी वेळ कामगाराकडून काम घेण्यात यावें व वयात न आलेल्या मुलाना आठापेक्षा कमी तास काम देण्यात यावे, असें ठरविण्यात आलें. मुलाना कारखान्यात कामावर ठेवावयाचे असल्यास त्याचें वय निदान चौदा तरी असलेंच पाहिजे असा नियम करण्यात आला. याशिवाय विम्याच्या योजना, सुट्टीचे दिवस, आजारीपणातील रजा, बाळतपणाच्या दिवसातील भत्ता, सप करण्याचा हक्क, कामगारसघ, सामुदायिक करार, कारखान्यातील कमिट्या या सबधाचेही कायदे करण्यात आले.

सर्व प्रमुख धंद्याचें राष्ट्रीयकरण करण्यात यावे आणि कामगारासबंधानें करण्यात आलेले कायदे मान्य करणारानाच इतर कारखाने काढण्याची परवानगी देण्यात यावी. खासगी उद्योगधंद्याना उत्तेजन देण्यात यावे. गिऱ्हाइकाच्या सहकारी संस्था, त्याचप्रमाणें औद्योगिक व शेतीविषयक सहकारी पत-पेढ्या काढण्याच्या कामीं खास लक्ष देण्यात यावें. भागीदाराशिवाय कामगाराना व गिऱ्हाइकाना या सहकारी संस्थाचे सभासद होण्याचा हक्क देण्यात यावा. सरकारी बॅंका स्थापन करण्यात याव्या. गहाणाचा व्यवहार करणाऱ्या पेढ्याचे राष्ट्रीकरण करण्यात यावें. व्याज बट्टयाचा धंदा बंद करण्यात यावा. जुन्या जमान्यातील नाना प्रकारच्या कराच्या जागीं एकमात्र वाढता कर (Single progressive tax) ठेवण्यात यावा. याप्रमाणें सोव्हिएट चीनचें आर्थिक धोरण वरील तत्वावर निश्चित करण्यात आलें.

" लाल फौज, राजकीय फौज आहे. राबणाऱ्या जनतेच्या अंतरराष्ट्रीय कर्तव्याची जाणीव असलेली व या जाणीवेला पोषक, असे शिक्षण घेतलेली अशी ही सेना आहे. " असे एका ठरावानें जाहीर करण्यात आलें. क्रांतिकारक लष्करी कौन्सिल नेमण्यात आलें व या सेनेच्या प्रमुख अधिकाऱ्याचीही नेमणूक करण्यात आली. फौजेच्या राजकीय शिक्षणाकरता स्वतंत्र खातीं उभारण्यात आलीं व त्या मार्फत शाळा काढण्यात आल्या वर्तमानपत्रें काढण्यात आली. लाल फौजेंतील सैनिकाना जमीनी देण्यात याव्या, त्याच्या गैरहजरींत शेत कसण्याच्या कामीं त्याच्या कुटुंबाना मदत करण्यात यावी, फौजेंत असेपर्यंत सैनिकाला करमाफ असावे, प्रवास खर्च व टपाल खर्च त्याच्याकडून घेऊ नये, कमी दरानें त्याला लागणाऱ्या जिनसा देण्यात याव्या, त्याच्या मुलाना मोफत शिक्षण देण्यात यावें, म्हातारपणीं त्याला पेन्शन देण्यात यावें, फौजेत नोकरी करीत असताना त्याच्या संमतीशिवाय त्याच्या बायकोला घटस्फोट करण्याची परवानगी देण्यात येऊ नये, वगैरे गोष्टीही या फौजविषयक ठरावात नमूद करण्यात आल्या.

**जपानी आक्रमणाबाबतचें धोरण**—या कॉंग्रेसमध्येंच माउ च तुङ्‌ला मध्यवर्ती कामिटीचा अध्यक्ष व जु दे यास लाल फौजेचा सर सेनापति निवडण्यात आले. १९३१ मध्यें कम्युनिस्ट पार्टीचे मुख्य ठाणें सोव्हिएट

भूमींत हलविण्यात आलें व माउ च तुङलाच पार्टीच्या मध्यवर्ती कमिटीचा सेक्रेटरी निवडण्यात आलें. " जपानी साम्राज्यशाहीच्या आक्रमणाला तोंड देण्याकरता व चीनच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचे रक्षण करण्याकरता जनतेला सशस्त्र करून राष्ट्रीय क्रांतिकारक युद्धाची घोषणा करण्यात यावी. " हें चिनी कम्यूनिस्ट पार्टीचें जपानी आक्रमणाबाबतचें धोरण जाहीर करण्यात आले. कॉंग्रेसच्या अधिवेशनानंतर पांच महिन्यांनीं १९३२ च्या एप्रिलमध्यें पार्टीची ताकद चांगली संघटित झाली आहे, असें पाहून चीनी सोव्हिएट सरकारनें जपानविरुद्ध युद्ध पुकारलें आणि जपानशीं युद्ध करण्यास सज्ज असलेल्या कुओमिन्ताङ फौजेशीं पुढील तीन अटींवर ऐक्य करण्याची तयारी दर्शविली. ( १ ) सोव्हिएट मुलखाविरुद्ध चालू असलेलें युद्ध थांबविण्यात यावें. ( २ ) जनतेला लोकशाहीचे हक्क देण्यात यावे. ( ३ ) जपानविरोधी स्वयं-सैनिकांची संघटना करावी, जनतेला सशस्त्र करण्याची परवानगी द्यावी. याप्रमाणे जपाननें चीनवर आक्रमण केल्यानंतर पहिल्यापासून सोव्हिएट सरकारनें व कम्यूनिस्ट पार्टीनें संयुक्त आघाडी निर्माण करण्याच्या राष्ट्रीय प्रयत्नाला हात घातला, हें लक्षात ठेवण्यासारखे आहे. अशा रीतीनें सोव्हिएट चीनमध्ये लोकसत्तात्मक प्रगतिपर धोरण स्वीकारल्यामुळे व त्याबरोबर जपानी आक्रमणाला कट्टर प्रतिकार करण्याचें निशाण हातात घेतल्यामुळे चीन-मधील कम्युनिस्ट पार्टीचे व सोव्हिएट सरकारचें सामर्थ्य वाढत चाललें व चीनमध्यें ते अधिकाधिक लोकप्रियही होत चाललें असल्यास त्यात कांहींच नवल नव्हते.

**जपानशीं संगनमत**—पण नान्किङ् सरकारची परिस्थिति याच्या अगदीं उलट झाली. जपाननें तीन चार महिन्यात मॅन्च्युरिया प्रांत गिळ-कृत केला व जेहोल प्रांतातही आपले हात पाय पसरले व त्याच्या नेहमींच्या धोरणाप्रमाणें या दोन्ही प्रांतातील उद्योगधंदेही झपाट्यानें आपल्या ताब्यात घेण्यास सुरुवात केली व सर्वच चीन राष्ट्र कबजात घेण्याच्या तयारी चाल-विली, असें दिसत असतांना नान्किङ् सरकारनें जपानबरोबर समझौत्याचें धोरण स्वीकारलें. ही गोष्ट चीनमधील कोणत्याही पक्षाला व जनतेला पसंत पडली नाहीं. नान्किङ् सरकारच्या या धोरणाचा सर्वत्र धिक्कार करण्यात

आला. याप्रमाणें सर्व चीनमध्यें आपली छीः थू· होऊ लागली याचा राग नान्किड सरकारने चीनी कम्युनिम्ट पार्टीवर काढण्याचें ठरविलें. चीनमध्यें सोव्हिएट सत्ता निर्माण होणे व चीनी कम्युनिस्ट पार्टीचें सामर्थ्य वाढत जाणें, चिआड कायी शेक व वॅड प्रभृति नान्किड सरकारच्या मुत्सद्याना व लष्करशहाना केव्हाही पसत नव्हतें. म्हणूनच जपानी लष्करशाहीशी समझौता व कम्युनिस्टासारख्या शुद्ध लोकसत्तावाद्याविरुद्ध आपसातील युद्धाचें धोरण नान्किड सरकारने स्वीकारलें होतें. चीनमध्ये आपसातील युद्धाला सुरवात व्हावी, ही गोष्ट जपानच्या पथ्यावरच पडली व नान्किड सरकारला गोंजारून त्यानें या युद्धाला भरती येईल, अशाप्रकारचें धोरण स्वीकारलें. १९३३ सालीं जर्मनींत नाझींची सत्ता प्रस्थापित होण्यापूर्वी जर्मन लष्करी सल्लागार नान्किड् दरबारनें आपल्या दिमतीला ठेवले होते. या लोकानींही नान्किड् सरकारला या कामीं भर दिली व त्याला मदतही केली. ब्रिटिश सरकारही अप्रत्यक्ष रीतीने का होईना, तत्परतेने नान्किड् सरकारच्या मदतीला धावलें. ब्रिटिश सरकारनें आपल्या युद्धजहाजाच्या जोरावर याङ्त्सी नदीचा जलमार्ग नान्किड् सरकारच्या लष्कराच्या हालचालींना मोकळा करून दिला. नदीच्या तीरावरील आपल्या तोफा कम्युनिस्टानीं डागल्या पण ब्रिटिश तोफापुढे त्याचें काहीं चालले नाहीं. गहू व कापूस पिकविण्याकरता १९३० च्या सुमारासच अमेरिकेनें नान्किड सरकारला कर्ज दिलें होतें, अर्थात् या कर्जातील बराचसा भाग कम्यूनिस्टविरोधी मोहिमेंत नान्किड् सरकारनें खर्च केला.

**चौथी मोहीम**— जपानी आक्रमणाविरुद्ध कम्युनिस्टाच्या सूचनेप्रमाणें सयुक्त आघाडी न बनवता जपानशीं व इतर साम्राज्यवादी राष्ट्राशीं सगनमत करून कम्युनिस्टाविरुद्ध पुन्हा मोहिम सुरू करण्याची नान्किड सरकारने तयारी केली त्यावेळीं आत्मसरक्षणाकरता चीनी कम्यूनिस्टाना आपलें सामर्थ्य सघटित करणें भागच पडलें. कम्यूनिस्ट पार्टीच्या पहिल्या कॉंग्रेसनतर थोड्याच दिवसात नान्किङ्ग सरकाराविरुद्ध निङ्गपू भागातील शेतकऱ्यानीं बंडाचा उठाव केला. या बडाचा बीमोड करण्याकरता कुओमिन्ताडची २८ वी रूट फौज पाठविण्यात आली. या फौजेच्या हातून

बडखोराचें पारिपत्य तर झालेंच नाहीं तर उलट या प्रचंड फौजेपैकीं २०,००० सैनिक लाल फौजेला येऊन मिळाले व या सैनिकाचा उपयोग करून जू दे नें ५ व्या लाल फौजेची उभारणी केली. १९३२ मध्यें नान्किंड सरकारच्या फौजेचा चॅंग ही येथें लाल फौजेनें पराभव केला व तें शहर आपल्या ताब्यात घेतलें व चिआङ्‌ कायी शेकच्या लष्कराच्या आघाडीवर हल्ला करून त्या आघाडीवरचींही कांहीं ठाणीं लाल फौजेनें आपल्या कब-जात घेतलीं. अशारीतीने लाल फौजेला सारखे यश मिळत चाललेलें पाहून चिआङ्‌ कायी शेकने १९३३ च्या एप्रिलमध्यें चिनी सोव्हिएट मुलखावर चौथी मोहीम काढण्याचें ठरविलें. आपल्याबरोबर २,५०,००० फौज घेऊन चिआङ्‌ कायी शेक कम्यूनिस्ट मुलखावर चालून आला. पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, लाल फौजेचा सहार होण्याऐवजीं नान्किंड सरकारच्या इभ्रतीच्या नाशालाच ही मोहीम कारणीभूत झाली. या मोहिमे-तील अगदीं पहिल्या चकमकींतच लाल फौजांनीं चिआङचे दोन सेना-विभाग निःशस्त्र केले व दुसऱ्या दोन सेनाविभागाच्या सेनानायकावर गर्दी करून त्याना कैद केलें. चिआङच्या फौजेंतील ५९ व्या पलटणीचा अर्धा अधिक धुव्वा उडविला व ५२ वी पलटण तर पूर्ण निकालातच काढली. चिआङच्या अत्यंत भरवशाच्या २१ व्या पलटणीवर लालसैनिकांनीं यानंतर हल्ला चढविला व तिलाही पूर्णपणे निःशस्त्र केलें. या चकमकींत तिच्या सेनानायकालाही भयंकर जखमा झाल्या. याप्रमाणे एकामागून एक पराभव झाल्यामुळे चिआङ कायी शेकने सोव्हिएट मुलखात पुढें चाल करून न जाता आपल्या फौजेच्या ढाला परत फिरविल्या. या मोहिमेनंतर चिआङने आपल्या एका सेनानायकाला चेन चेङला लिहिलेल्या पत्रात "आपल्या सबंध आयुष्यात आपला इतका अपमान कधींही झाला नाहीं." असे कळविले व "लाल फौजेशीं लढणें हें सबध आयुष्याचें काम आहे" असे चेन्‌ चेंङनेंही आपल्या मित्राजवळ बोलून दाखविलें व ही मोहीम तशीच रेटून पुढें नेण्यास त्यानें संमति दिली नाहीं. चिआङ कायी शेकनें त्याला अर्थातच तावडतोब कामावरून दूर केलें.

**पांचवी मोहीम**—या पराभवामुळें मुळींच नाउमेद न होता

चिआङ काई शेकने सोव्हिएट मुलखावरील पाचव्या व अखेरच्या मोहिमेची तयारी केली. या खेपेस चिआङनें आपल्या सर्व फौजा एकत्र आणल्या व एक लाख सेनेनिशीं तो लाल फौजेवर चालून आला. या प्रसंगीं त्यानें नवीन डावपेंच लढविलें होते. शत्रूच्या मुलखाला चोहोंकडून वेढून बाहेरच्या जगाशीं त्याचा अजीबात संबंध तोडून टाकावयाचा, शत्रूवर जोरानें चाल तर करावयाचीच पण त्याच बरोबर ठिकठिकाणीं मोर्चेबंदी करून आपली फौज मागे हटू द्यावयाची नाहीं, या डावपेंचाचा थोडा फार उपयोग आपल्या जर्मन सल्लागाराच्या शिफारशीप्रमाणें चौथ्या मोहिमेंत त्यानें करून पाहिला होता पण या खेपेस बरोबर प्रचंड फौज घेऊन हे डावपेंच पूर्णपणें अमलात आणण्याचें त्यानें ठरविलें व त्यात त्याला यशही मिळालें. ही मोहीम लाल फौजेनें एक वर्षभर थोपवून धरली उभयपक्षीं बरेंच नुकसान झालें पण लाल फौजेला अखेर माघार घ्यावी लागली. पूर्वीप्रमाणें आपले गमीनी हल्ले चढवायचे सोडून लाल फौजेनें केवळ आत्मसंरक्षणाचें धोरण स्वीकारले व कांहीं प्रसंगीं चिआङच्या सैन्याला समोरासमोर तोंड दिलें. या चुकामुळे सर्व अर्वाचीन युद्धसाधनांनीं युक्त असलेल्या चिआङ् काई शेकच्या प्रचंड सैन्यापुढें लाल फौजेचें कांहीं चाललें नाहीं.

१९३३ च्या आक्टोबरमध्ये ही मोहीम सुरू झाली व ती चालू असतानाच १९३४ च्या जानेवारींत जू चीन येथें चिनी सोव्हिएटाच्या कॉंग्रेसचे दुसरें अधिवेशन भरविण्यात आलें. या अधिवेशनात माउ च तुङनें पहिल्या अधिवेशनानंतरच्या कम्युनिस्ट हालचालींचा विस्तृत अहवाल सादर केला. १९३२ च्या फेब्रुवारींत म्हणजे ही मोहीम सुरू होण्यापूर्वी दोन महिने चिनी कम्युनिस्टांनीं युद्ध पुकारलें होते. त्यामुळें जपानही सोव्हिएट मुलखावर केव्हा चाल करून येईल, याचा नेम नव्हता. चिआङ काई शेकच्या एका मागून एक होत असलेल्या मोहिमा व आज ना उद्या निश्चितपणे आपल्यावर होणारी जपानची स्वारी या दोन्हीं संकटांना यशस्वी रीतीनें तोंड द्यावयाचें असल्यास किआङसी प्रांतातील आपलें ठाणें हालवून वायव्य भागातील शेन्सी प्रांतात तें कायम करणें जरूर आहे, असें या अधिवेशनापूर्वीच चिनी कम्यूनिस्ट पुढाऱ्यांनीं ठरविलें होतें.

चिअड कायी शेकनें सुरू केलेल्या या पाचव्या मोहिमेत कम्युनिस्ट संहाराचा उद्देश पूर्णपणे साध्य झाला, असें नान्किड सरकारला वाटलें, पण त्याची ही कल्पना सर्वथैव चुकीची ठरली. सोव्हिएट मुलखाला चोहोंकडून भरभक्कम वेढा घालून त्यानें पिंजऱ्यात कोंडल्याप्रमाणें कम्युनिस्टांची अवस्था करून सोडली होती व या पिंजऱ्यातून आता ते बाहेर पडू शकत नाहींत, असें नान्किड सरकारला वाटू लागलें होतें. नान्किडच्या फौजेनें घातलेला हा वेढा आर्थिक दृष्ट्या कम्युनिस्टांना अत्यंत जाचक झाला, यांत शंका नाहीं. सोव्हिएट मुलखातील जनतेला या काळात मीठदेखील मिळेनासें झालें होतें. विमानातून चालू असलेल्या रोजच्या बॉम्बफेकीमुळें व मशीनगनच्या अविरत माऱ्यामुळें सोव्हिएट मुलखातील हजारो शेतकऱ्यांचा, नागरिकांचा व सैनिकांचा संहार झाला. या शेवटच्या मोहिमेच्या वेळीं झालेल्या लहान मोठ्या चकमकींत चाउ एन लायच्या मताप्रमाणें लाल फौजेंतील ६०,००० सैनिक निकामी झाले. याशिवाय बिनलष्करी जनतेचा किती संहार झाला याची गणतीच नाहीं. या मोहिमेंत नान्किंडच्या लष्करानें जो सोव्हिएट मुलुख हस्तगत केला त्यातील लोकवस्ती उठून गेल्यामुळें व कांहीं ठिकाणीं लोकांच्या सरांस कत्तली केल्यामुळें सोव्हिएट मुलुखातील कांहीं भाग निर्मनुष्य झाले. या मोहिमेंत नान्किड सरकारच्या लष्कराचेंही भयंकर नुकसान झालें. कियाडसी प्रांतांतील सोव्हिएट विभाग हस्तगत करीत असतांना प्रत्यक्ष लढाईत व उपासमारीनें १०,००,००० लोक मृत्युमुखीं पडले, असें कुओमिन्ताडनें जाहीर केलें. याप्रमाणें उभयपक्षीं इतका अपूर्व संहार झाला व पाचवी मोहिम अखेर अनिर्णायक ठरली. लाल फौजेचा समूळ नाश करण्याचा चिआडकायी शेकचा हेतू सफल झाला नाहीं.

---

# अभिनव चीनचे प्रणेते







डॉ. सन्यत्सेन

मॅडाम सन्यत्सेन







माउ च तुंङ

जनरल जू दे


चिनी कम्यूनिस्टांची
सहाहजार मैलांची
पल्लेदार दौड
जेहोल
निगशिया
कानसु
होपे
होनान
हुनान
फुकेन
युनान
पोर्ट आर्थर

# पल्लेदार दौड

**अपूर्व योजना**—वर सांगितल्याप्रमाणे लाल फौजेच्या जबाबदार सेनानायकाची सभा याच वेळीं कियाङ्सी प्रांतातील सोव्हिएट राजधानींत भरविण्यात आली व या प्रांतातून पिछेहाट घेऊन सोव्हिएट चीनचे मुख्य ठाणे चीनच्या वायव्य प्रदेशात, सर्व बाजूनीं सुरक्षित अशा शेन्सी प्रांतात हलविण्याचे ठरविण्यात आले. दक्षिणेमधील कियाङसी प्रांतातील जू चीन या पहिल्या राजधानीपासून वायव्येकडील शेन्सी प्रांतातील येनान ही नवी राजधानी ६००० मैलावर होती. म्हणजे हिंदुस्थानच्या दक्षिणोत्तर लांबीच्या तिप्पट अंतरावर होती. हे अंतर एक वर्षात काटायचें, असें चीनी सोव्हिएट पुढाऱ्यानीं ठरविले होतें. केवळ लाल फौजेचें मुख्य ठाणेच या नवीन राजधानींत स्थापावयाचे असा कम्यूनिस्टाचा विचार नव्हता तर या प्रांतातील लहान मोठे कारखानेही तिकडे हलविण्याचा बेत त्यानीं केला होता. हा सर्व प्रवास पायीं करावयाचा होता. जगातील अत्यंत दुर्गम मार्गातून वाट काढीत वरील ठिकाणीं जावयाचें होते. बैल गाड्यासुद्धा न जातील अशाही वाटातून आपला सर्व लवाजमा त्याना न्यावयाचा होता, अत्यंत उच्च पर्वत-राजींवरून त्याना चढायचें उतरायचे होतें व आशियातील अत्यंत दुर्लंघ्य महानद ओलाडून त्याना पलीकडे जावयाचें होते. चीनी कम्यूनिस्टानीं केलेली ही पल्लेदार दौड म्हणजे आरंभापासून अखेरपर्यंत एक मोठी लढाई होती. अखिल जगाच्या इतिहासात तोड सापडायची नाहीं, अशी ही अर्वाचीन कालातील इतिहासप्रसिद्ध पल्लेदार दौड होती. बरोबर हजारो सैनिक घेऊन लांबवर मजला मारीत दिग्विजय करीत जाणें वेगळें आणि एका प्रांतातील जनतेचा संबंध संसार जशाचा तसा हलवून भोंवतीं पडलेल्या शत्रू-सैन्याच्या वेढ्यातून मार्ग काढीत व अत्यंत कठिण अशा नैसर्गिक अडचणींना तोंड देत हजारो मैलावर जाऊन नवा संसार थाटणें व शत्रूला आपल्यावर हल्ला चढवता न येईल अशा भागात आपल्या फौजेचें ठाणें स्थापणें हें

अगदींच निराळें. पण चीनी कम्युनिस्टानीं आपली ही अपूर्व योजना यशस्वी रीतीने पार पाडून जगाच्या इतिहासात आपले नाव अजरामर करून ठेवलें आहे.

**दौड सुरू झाली**—किआङ्सी प्रातातून इतक्या झपाट्यानें व गुप्तपणे ही पिछेहाटीची दौड सुरु करण्यात आली कीं, लाल फौजेचे ९०,००० सैनिक मजलावर मजला मारीत पुढें निघून गेले तरी कित्येक दिवसपर्यंत हा काय प्रकार चालला आहे, याची दादही कुओमिन्ताङच्या मुख्य ठाण्यातील लोकाना लागली नाहीं. किआङ्सीच्या दक्षिण भागात हे सैनिक प्रथम एकत्र जमा झाले व उत्तर आघाडीवरील प्रत्यक्ष फौजेंतील सैनिक काढून घेऊन व त्या ठिकाणीं कम्यूनिस्टाच्या दोस्त तुकड्यातील सैनिक ठेवून या पीछेहाटीला त्यानीं सुरुवात केली. या सर्व हालचाली नेहमीं रात्रींच चालत. दक्षिण कियाङ्सीमधील यू तू ठाण्याजवळ सर्व लाल फौजेची जमवाजमव झाली त्या वेळीं या पल्लेदार दौडीवर निघण्याचा हुकुम देण्यात आला. ही दौड १६ आक्टोबर १९३४ रोजीं सुरू झाली.

या सैनिकाच्या दोन तुकड्या करण्यात आल्या. एक पश्चिमेकडून व एक दक्षिणेकडून. याप्रमाणें तीन रात्री चालून गेल्यानंतर चौथ्या रात्रीं अगदीं अनपेक्षितपणें एकत्र येऊन हुनान व क्वाङ् तुङ्मधील नान्किङ् लष्कराच्या मोर्चेबंदीवर त्यानीं हल्ले चढाविले. या मोर्चाच्या जागा आपल्या ताब्यात घेतल्या व आश्चर्यचकित झालेल्या शत्रुसैनिकाना त्यानीं पळवून लावलें. या मोर्चेबंदीचीं सर्व ठाणीं व खदकाच्या जागा ताब्यात घेतल्यामुळें दक्षिण व पश्चिम या दोन्ही दिशाकडील मार्ग त्याना मोकळे मिळाले व ही स्फूर्तिदायक दौड तिकडूनही झपाट्याने सुरू झाली.

लाल फौजेच्या या मुख्य पलटणीखेरीज वृद्ध, तरुण, स्त्रीपुरुष, मुले, कम्यूनिस्ट, कम्यूनिस्टेतर असे हजारो शेतकरी या दौडींत सामील झाले. तोफखान्यातील तोफा व त्याचे भाग निरनिराळे करण्यात आले. त्याचप्रमाणें कारखान्यातील यंत्रसामुग्री अलग अलग करण्यात आली व हे सर्व सामान खेचरावर व गाढवावर लादून ही विलक्षण स्वारी मार्गास लागली. कियाङ्सीमधून लाल फौजेच्या मुख्य पलटणी याप्रमाणें निघून गेल्यावर

नान्किङ् सरकारचे सेनानायक जागे झाले व त्या प्रांतातील शहरें काबीज करण्याच्या उद्योगास ते लागले. हजारो किसान स्वयंसैनिकांनी व दोस्त सैनिकांनीं नान्किङ्च्या या चढाईला शेवटपर्यंत तोंड दिलें स्वयंसैनिकांच्या या प्रतिकारामुळें नान्किङ्चे लष्कर या भागातच अडकून राहिलें व चीनच्या वायव्य भागाकडे निघून जाणाऱ्या लाल फौजेंतील मुख्य पलटणींना आपला पुढील मार्ग काटण्यास चांगलीच सवड मिळाली. नान्किङच्या लष्कराने कियाङसी, फु कीन व कुइ चौमधील लाल फौजेनें मोकळीं सोडलेलीं कांहीं ठाणीं हस्तगत केलीं. पण पिछाडीचे रक्षण करण्याकरिता राहिलेल्या स्वयंसैनिकांच्या तुकड्यांनीं १९३७ पर्यंत तीं मोठ्या हिंमतीनें लढविलीं व नान्किङचे बरेंचसे लष्कर दक्षिणेंत गुंतवून ठेवलें.

**पहिल्या नऊ लढाया**—चीनमधील नैऋत्य भागातील सोव्हिएट मुलखाभोंवतीं नान्किङ सरकारच्या लष्कराचा जबरदस्त वेढा पडला होता. साऱ्या यांत्रिक तोफांचीं जाळीं विणूनच जणू काय या वेढ्यातील व्यूहरचना करण्यात आली होती. ही मोर्चेबंदी मोडून काढून वेढ्यातून बाहेर पडल्याशिवाय लाल फौजेला पश्चिमेकडील मार्ग मोकळा होणें शक्य नव्हते. पण लाल फौजेतील सैनिकांनीं यांत्रिक तोफांच्या माऱ्याना न जुमानता मोठ्या शिताफीनें कियाङ्सी प्रांताच्या सरहद्दीवर असलेली ही वेढयाची तटबंदी ता. २१ आक्टोबर रोजीं मोडून काढली व यापुढेंही एक महिन्याच्या अंतरानें हुनान प्रांतातील दोन ठिकाणच्या वेढयांना न जुमानता त्यातून ते आपल्या सर्व लवाजम्यासह बाहेर पडून झेच्युआन प्रांतात शिरले व या ठिकाणच्या चौथ्या फौजेला येऊन मिळाले. कियाङ्सीपासून झेच्युआन प्रांतापर्यंतच्या दौडींत एकूण नऊ लढाया त्यांना द्याव्या लागल्या. कियाङसी प्रांतातून निघाल्यापासून हा सगळा लवाजमा बरोबर वायव्य दिशेकडेच चालला होता यामुळें या दौडींतील लाल फौजा कोणत्या भागात असतील याचा नक्की अंदाज नान्किङ्ग फौजेला बांधता येऊं लागला. ही दौड यशस्वीरीतीनें आपल्या इच्छित स्थळीं पोंचण्याच्या दृष्टीने लाल फौजेचें हें धोरण चुकीचें होतें असें ठरलें. ही चूक सुधारण्याकरता नवीनच डावपेंच लढविण्यात आले. ही दौड एकाच दिशेने चालू न ठेवता तिच्या दिशा

वारंवार बदलण्यात आल्या. या युक्तीमुळें नान्किङच्या विमानी दलाची सुद्धा फसगत होऊं लागली. हे डावपेच सुरू केल्याबरोबर अगदीं जरूरीचें तेवढेच सामान या दौडींतील लोकानीं आपल्याजवळ ठेवलें व बाकीचें काहीं मागे टाकून दिलें व काहीं ठिकठिकाणीं पुरून टाकून ते पुढें जाऊं लागले. दिवसापेक्षा रात्रीच्या मजला मारणें अधिक सोयीस्कर, असे या वेळेपासून ठरविण्यात आलें.

**लाल फौजेंत नवी भरती**—या दौडीवर निघालेले लोक क्षेच्यूआन प्रातात याङत्सी नद ओलाडणार असा अदाज बाघून चिआङ् काथी शेकने आपले हजारो सैनिक हुपे व अनहुई प्रातात माघारे घेतले, नावाच्या साह्यानें हे सगळे याङत्सीपलीकडे नेले व लाल फौजेचा उत्तरेकडला मार्ग रोखून धरण्यात आला दोन लाख सैनिक आपला मार्ग सर्वप्रकारें रोखून उभे आहेत, असें समजल्याबरोबर लाल फौजेने ती दिशाच सोडून दिली व क्षेच्यूआन प्राताच्या राजधानीला वर्तुळाकार उलट वळसा घालून कुई चौ प्रात ओलाडला व उत्तरेकडे जाण्याऐवजीं ते दक्षिणेकडे वळले. आयत्या वेळीं बदललेल्या या धोरणामुळें कुई चौ प्रात ओलाडण्यासच लाल फौजेला चार महिने जास्त लागले. एवढ्या अवकाशात या भागातील नान्किंट सरकारच्या पाच सेनाविभागाना त्यानीं गारद केले. कुई चौच्या गव्हर्नरचे मुख्य ठाणें ताब्यात घेतलें. दौड चालू असताना जे जे प्रदेश वाटेंत लागले त्या त्या ठिकाणीं कम्यूनिस्ट प्रचाराचें कार्य चालूच होतें. कुई चौ भागात कम्यूनिस्ट पुढाऱ्याचा प्रचार चागलाच यशस्वी झाला. या प्रातातील २०,००० तरुणाना त्यानीं लाल फौजेंत दाखल करून घेतले. प्रातातील खेड्यातून व शहरातून मोठमोठ्या सभा घेऊन ठिकठिकाणीं तरुण कम्यूनिस्टाचे गट त्यानीं सघटित केले. या भागात कम्यूनिस्टाचें फारसें नुकसान झालें नाहीं पण याङत्सी ओलाडण्याचा सवाल दत्त म्हणून उभा पुढें होताच.

**अयशस्वी पाठलाग**—लाल दौडवाले दक्षिणेकडे वळलेले पाहताच चिआङ्नें तिकडचेही नद ओलाडण्याचे मार्ग रोखून धरले व याच भागात आपण लाल बावटेवाल्याना कायमचे बरबाद करून टाकणार, अशी आशा त्याला वाटू लागली. लाल फौजेला याङ्त्सी ओलाडू द्यावयाची नाहीं व

नैऋत्येकडील तिबेटच्या पाणथळ भागात हाकून लावून तिला कायमची मूठमाती द्यायची, असा चिआडचा बेत होता. "याङत्सीच्या दक्षिण भागात कम्युनिस्टांचें नाम व निशाण पुसून टाकण्यावरच राष्ट्राचे व आपल्या पक्षाचें भवितव्य अवलंबून आहे." अशा तारा त्यानें आपल्या निरनिराळ्या सेनापतींना व प्रांतिक सुभेदारांना केल्या. चिआडने आपल्या फौजेची दिशा बदलल्याबरोबर लाल फौजेनेही ताबडतोब आपला मोर्चा आणखी दक्षिणेकडे वळविला व ती युनान प्रांतात शिरली. याच ठिकाणीं ब्रम्हदेश व इंडो चायना यांच्या सरहद्दी चीनला लागलेल्या आहेत. चार दिवसांची तडफदार मजल मारून लाल फौजा आपल्या सर्व लवाजम्यासह यूनान फू ( यूनानची राजधानी ) पासून दहा मैलांवर दाखल झाली, असें पाहताच तेथील सुभेदार लुङपिन यानें आपल्या जवळची सर्व सेना आवेशानें एकत्र गोळा करून बचावाची तयारी केली. कुइ चौमधून निघालेलें चिआडचें लष्करही लाल फौजेच्या मागे लागलें. स्वतः चिआड व त्याची पत्नी युनान फू येथें होतीं. लाल फौज युनान फूजवळ आल्याबरोबर तेथून ती दुसरीकडे निघून गेली व त्यांनीं फ्रेंच रेल्वे गाठली. नान्किडच्या विमानांचा एक मोठा ताडा रोजच्या रोज लाल दौडवाल्यावर बॉबचा वर्षाव करीत होता पण त्याला दाद न देता ते सारखे पुढें पुढेंच चालले होते. युनान फूवर चालून येण्याची लाल फौजेची केवळ एक हूल होती. चिआड्ला चकविण्याचा तो एक डाव होता. लाल फौजेच्या मुख्य पलटणी झपाट्यानें पश्चिमेकडे चालून जात होत्या. लेङ कायजवळ याङत्सी ओलांडण्याच्या उद्देशानें लाल सेनापतींनीं हा डाव रचला होता पण तो यशस्वी ठरला नाहीं. चिआडला लाल फौजेच्या या हालचालींचा सुगावा लागला व त्यानें या भागात नद ओलांडण्याचे जे थोडे मार्ग होते ते सर्व आपल्या ताब्यात घेतले. नदाच्या उत्तर तीरावरील सर्व बोटी जाळून टाकण्याचा हुकूम सोडला व आपल्याबरोबर लुङ युनचीही फौज घेऊन तो लाल फौजेवर चालून आला. पण लाल फौजेंतील एका पथकानें एकाएकीं एका रात्रीं आपला मोर्चा बदलला. नान्किङ फौजेच्या ठाण्याला त्यानें एक मोठा वळसा घातला. रात्रीं व दिवसा सारखी दौड करून ८५ मैलांचें अंतर त्यांनीं तोडलें. त्याच

दिवशीं संध्याकाळीं नदीच्या उताराची दुसरीच जागा त्यानीं गाठली.पाडाव केलेल्या नान्किङ् सैनिकाचे पोषाक त्यानीं चढविले व या उताराजवळील शहरात शिरून तेथील संरक्षक सैनिकांच्या तुकडीला स्वस्थपणाने निःशस्त्र केले. नान्किङ सरकारच्या सैनिकाचे पोषाक असल्यामुळे शहराच्या संरक्षक तुकडीला हे लोक आपलेच आहेत, असें वाटलें आणि यामुळेच या लाल फौजेच्या पथकाला त्यानीं आपल्यात मिसळू दिले. नदाच्या उत्तरतीराकडील बोटींचा अद्याप नाश करण्यात आलेला नव्हता. लाल फौज सगळी आपल्या आवाक्यात असताना बोटी काय म्हणून जाळायच्या, या कल्पनेने त्या अद्याप शाबूत ठेवण्यात आल्या होत्या. पण या बोटी दक्षिण तीराकडे आणायच्या कशा ? रात्र पडल्यावर लाल सैनिकानीं गावच्या पाटलाला बोलावून आणले. कांहीं सरकारी शिपायी या बाजूला आहेत तेव्हा उत्तरेकडल्या बोटींच्या खलाशाना या बाजूला एक बोट पाठविण्याबद्दल आरोळी देण्याचा हुकुम त्यानीं केला. सरकारी शिपायाकरता बोट मागितल्यावर कोणाला कसलीच शंका येण्याचें नव्हते. बोट आल्याबरोबर "नान्किङ्" पोषाखात असलेले लाल सैनिक तिच्यावर चढले. बोटींतून ते उत्तर तीरावर गेले. याप्रमाणे क्षेच्युआनची सरहद्द तर त्यानीं गाठलीच. तेथील पाहारेकऱ्याच्या ठाण्यात त्यानीं शांतपणें प्रवेश केला. पाहारेकरी शिपायी गप्पा मारीत व खेळत बसले होते. त्याच्या बंदुका भिंतीशी टेकून ठेवण्यात आल्या होत्या. लाल सैनिकानीं या सर्व शिपायाना "हॅन्ड्स अप" (दोन्ही हात वर करण्याचा) हुकुम दिला. सर्व पाहारेकरी आश्चर्याने मुग्धच झाले. आपण लाल फौजेचे कैदी झालो आहो याची त्याना कल्पनाही आली नाहीं. कारण लाल फौज अद्याप तीन दिवसाच्या अंतरावर होती, हे त्याना माहीत होतें.

पुढे गेलेल्या या लाल पथकाने इतकी तयारी केली तोपर्यंत सबंध लाल फौजही एक मोठा वळसा घेऊन या ठिकाणीं येऊन पोंचली. नदीपार होणें ही आता फार सोपी गोष्ट झाली. सहा बड्या बोटी नऊ दिवसपर्यंत लाल फौजेचा सर्व लवाजमा नदीपलीकडे वाहून नेत होत्या. याप्रमाणें पल्लेदार दौडीवर निघालेले कम्यूनिस्ट क्षेच्यूआन प्रांतात मुळींसुद्धा प्राणहानी न

होता येऊन पोचले. पलीकडचा काठ सुरक्षितपणे गाठल्याबरोबर लाल सैनि-कानीं सर्व बोटींना आगी लावून त्या भस्मसात करून टाकल्या. लाल फौजेच्या या हालचाली इतक्या झपाट्याने झाल्या होत्या कीं, चिआङ् काय़ी शेकला या हालचालीची बातमी लागून तिला गाठण्याकरता नान्किङ्चें लष्कर घेऊन तो झपाट्याने निघाला तरी त्याला दोन दिवस उशीर लागला. याङत्सी दुथडी भरून चालली होती. बोटी जळून गेल्या होत्या, दक्षिण तीरावर सरकारी सैन्य येऊन ठाकले. सगळी लाल फौज आपल्या लवा-जम्यासह पलीकडेच आनंदाने वावरत आहे, हे त्याना दिसत होतें. लाल फौजेवर जो डाव करण्याचा चिआङ्चा बेत होता तो त्याच्यावरच उलटला " लाल फौज समूळ बरबाद करणें हा काही दिवसाचा प्रश्न आहे " असें आपल्या नान्किङ्कडील साथीदाराना कळविणाऱ्या चिआङ्ची उमेद मावळून गेली व लाल फौजेचा विजय पाहून बोटें मोडीत बसण्याशिवाय त्याला गत्यंतर राहिले नाही. पुन्हा दुसरी उताराची जागा त्याला शोधून काढावी लागली ही जागा गाठीपर्यंत सरकारी सैन्याला २०० मैलाचा फेरा घ्यावा लागला. तोपर्यंत लाल दौडवाले त्याला हुलकावणी देऊन दुसरी-कडेच निघून गेले होते, हे पाहून चिआङ्ने विमानानें झेच्युआन प्रातात प्रवेश केला व त्या ठिकाणीं सरकारी सैन्याची जमवाजमव करून तातू नदीच्या आणखी एका मार्ग्याच्या ठिकाणीं लाल फौजेला अडविण्याचे त्यानें ठरविले

**कोंबडीच्या पिलाचें रक्त**—तातू नदी ओलांडून जायचे तर तीवर फक्त एकाच ठिकाणीं एक पूल होता आणि ही जागा इतकी अडचणीची व नाजूक होती कीं, या ठिकाणीं जर नदीपलीकडे जाण्यात कम्यूनिस्टाना यश आलें नसते तर पलेदार दौडीतील एकही प्राणी शिल्लक राहिला नसता. या वेळीं यत्किंचितही न विश्रांति घेता सुवर्णवालुका नदीच्या ( याङत्सीला या भागात हे नाव देण्यात आलें आहे ) उत्तर भागात लाल फौजेने आपला ताबडतोब मुक्काम हलविला व झेच्युआन प्रातातील सफेत व काळ्या लोलो लोकाच्या स्वतंत्र टोळीवाल्याच्या मुलखात ते शिरले. लोलोंच्या मुलखात गेल्याबरोबर त्याच्याशीं तडजोडीचीं बोलणीं करण्याकरता लाल बावटे-

वाल्यानीं आपले लोक त्याच्याकडे पाठविले. या भागात येत असता वाटेत चिनी लष्करशहांनीं कैद केलेल्या लोलो टोळयाच्या नायकाना मुक्त करून त्याना लाल दौडवाल्यानीं आपल्या जातभाईकडे पाठविले. तसेच चिनी लष्करशहांनीं घेतलेला त्याचा मुलुख परत जिंकून तो त्याचा त्याना परत दिला. यामुळे हे टोळयाचे नायक खुष झाले व आपल्या जातभाईजवळ लाल बावटेवाल्याची स्तुति गाऊ लागले.

लाल फौजेच्या आघाडीचा सेनापति लिउ पे चिङ फार धूर्त व हुशार होता. चिनी सुभेदाराना व कुओमिन्ताङ सरकारला लोलो विरोध करीत आले आहेत त्याचप्रमाणें आपण लाल बावटेवालेही त्याच्याशीं लढत आहोत अशी त्याने त्याची समजूत घातली. लोलोंना आपले स्वातंत्र्य कायम टिकविण्याची इच्छा आहे, लाल बावटेवाल्याना ही गोष्ट मूळातच मान्य आहे. राष्ट्रीय अल्पसंख्याक जमातींना पूर्ण प्रांतिक स्वायत्तत्ता देण्यात यावी, हे तर लाल बावटेवाल्याचें पूर्वीपासूनचे धोरण आहे. चिनी लोकानीं लोलो टोळीवाल्यावर जुलूम केला म्हणून ते त्याचा द्वेष करतात. हा त्याचा द्वेष लोलोंच्या मुलखात ज्याप्रमाणें सफेत लोलो व काळे लोलो आहेत त्याचप्रमाणे चीनमध्यें “सफेत चीनी” व “लाल चीनीही” आहेत आणि या “सफेत चिनी लोकानींच लोलोंची वेळोवेळीं कत्तल उडविली आहे व त्याच्यावर जुलूम चालविला आहे. मग लाल चीनी लोकानीं व काळया लोलोंनीं एक होऊन आपला दोघाचा सामान्य शत्रू असलेल्या ‘सफेत चीनी लोकाशीं का लढू नये! लोलो टोळयाचे नायक या लाल बावटेवाल्या वकीलाचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून घेत होते. सफेत चीनी लोकाशीं लढायचें आहे तर आपल्याला लाल बावटेवाल्यानीं शस्त्रास्त्रें व दारूगोळा पुरवावा म्हणजे त्याना आम्ही मदत करू, असा त्यानीं मोठ्या धूर्ततेनें सवाल टाकला. लाल बावटेवाल्यानीं या गोष्टीला तावडतोब कबूली दिली. एवढेंच नव्हे तर त्याना पाहिजे होता तो शस्त्रास्त्रें व दारूगोळा त्याच्या स्वाधीन केला त्या वेळीं लो लो टोळयाचे नायक आश्चर्याने मुग्धच झाले.

परिणाम असा झाला कीं, लोलो टोळीवाल्यानीं लाल दौडवाल्याना आपल्या मुलखातून जलद बाहेर पडण्याचा मार्ग दाखवून दिला इतकेंच

नाहीं तर अगदीं सुरक्षितपणें आपल्या मुलखातून बाहेर पडण्यास त्याना मदत केली. शेकडों लोलो लाल फौजात सामील झाले व तातू नदाच्या तीरावर असलेल्या आपल्या सामान्य शत्रूशीं लाल बावटेवाल्याच्या खांद्याशी खांदा लावून लढण्यास ते तयार झाले. काहीं लोलो तर लाल बावटे-वाल्याबरोबर चीनच्या वायव्य भागात जाण्यासही तयार झाले. लाल बावटे-वाल्याच्या वकीलानें नव्या मारलेल्या कोंबडीच्या पिलाचे रक्त लोलोच्या सेनानायकासमोर प्राशन केले. या नायकानेंही तसेच केलें. व लोलो टोळीवाल्याच्या रिवाजाप्रमाणे हा विधी झाल्याबरोबर दोघानीं आपल्या मित्रत्वाची शपथ घेतली. या दोन्ही पक्षापैकीं जो कोणी आपल्या दोस्तीच्या अटींचा भग करील तो कोंबडीच्या पिलाप्रमाणे दुर्बल व भ्याड गणला जाईल, असा या दोस्तीच्या विधीचा अर्थ होता.

**तातू नदीवरील दिव्य**—आन जेन् चॅंडपासून पश्चिमेस १२५ मैला-वर तातू नदी खोलच खोल अरुद दऱ्यातून मोठ्या वेगाने वाहत जाते. दोन्ही बाजूला उंचच उंच कडे व खालीं नजर फिरून जाईल, अशा खोल दरींतून ती मोठया वेगाने वाहात असून याच ठिकाणीं एका खिंडीच्या भागात लोखंडी साखळदंडाचा झुलता पूल आहे. तिबेटच्या पूर्वेस तातू नदी ओला-डून जाण्याचा तो एकच मार्ग होता. या पुलाकडे लाल फौज आपल्या सर्व लवाजम्यासह चालू लागली. काहीं वेळा कित्येक हजार फूट खोल असलेल्या दरींतून तर काहीं वेळा तितक्याच उंच असलेल्या कड्यावरून खाली वर उतरत ही सर्व दौड चालू होती. हा पूल कम्यूनिस्टाच्या हातीं लागला तरच त्याची धडगत होती व झेच्युआन प्राताच्या मध्यभागात ते प्रवेश करूं शकत होते. रात्रीं सहस्त्रावधी मशाली हातात घेऊन या दौडींतील सैनिक, शेतकरी व कामगार वळणावळणाने चालत जात होते व खालून वळणा-वळणानें चाललेल्या व त्याच्या मार्गात कोलदांडा होऊन बसलेल्या नदीच्या पाण्यात या मशालींचा उजेड चमचम चमकत होता. आघाडीवरचे लोक तर रात्रदिवस डबल मार्चनें चालले होते. फक्त जेवणापुरतीं १० मिनिटे ते थांबत, तेवढीच विश्रांति. या वेळातही त्याचे बरोबर असलेले दमलेले प्रचारक त्याना राजकीय शिक्षण देत होते. आत्मसामर्थ्यावर व आत्मविश्वासावर या

कार्याचें यश अवलंबून आहे. अर्धवटपणा येथे चालावयाचा नाहीं, पाऊल सावकाश पडून चालायचे नाही, कष्टाची पर्वा करता कामा नये, विजय मिळाला तरच आपला पक्ष जिवंत राहू शकेल, पराजय झाल्यास तो मातीला मिळून जाईल प्रचारकाच्या उपदेशातील हे सारसर्वस्व होतें.

तातूचा पूल गाठण्याकरता तातडीनें ही दौड चालली होती तर झेच्युआन प्रांताच्या या भागातील रस्त्यावर नान्किंगच्या सरकारी लष्करी तुकड्या वाटेत ठिकठिकाणीं ठाणीं देऊन बसल्या होत्या व त्यांच्याशी लाल दौडवाल्याच्या चकमकीही झडू लागल्या होत्या. पलीकडच्या तीरावर सरकारी नवीन, नवीन लष्करी तुकड्या जमा होत होत्या व त्याही तातूच्या लोखंडी पुलाकडे झपाट्यानें चालल्या होत्या. लष्करी दुर्बिणींतून लाल फौजेचे सेनापति सफेत लष्कराच्या या हालचाली पाहात होते. दोन्ही तीरावरून या दोन्ही सैन्याची पुलाकडे जाण्याकरता जणू शर्यतच लागली होती. सरकारी लष्करातील सैनिक वारंवार विश्रांतीकरता थांबत व तेहि बराच वेळ थांबत, ते सर्व दमून गेले होते, त्यांच्यातील उत्साह नष्ट झाला होता. पुलाकडे इतकी धडपड करून जाऊन त्या ठिकाणीं आपला जीव धोक्यात घालण्यास हे भाडोत्री सैनिक कसे तयार असणार? यामुळें लाल सैनिकांनीं या शर्यतींत आघाडी मारली व ते पुलाच्या भागात अगोदर जाऊन पोचले. शेकडो वर्षांपूर्वी हा पूल बांधण्यात आला होता. पश्चिम चीनमधील सर्व खोल पाण्याच्या नद्यांवर असेच पूल बांधण्यात आले आहेत. १०० यार्डांपेक्षा थोडे लांबच असे १६ साखळदंड नदीच्या या दोन्ही तीरावरील खडकात चुने गच्चीत टोकें अडकवून लोंबत ठेवण्यात आले आहेत. या साखळदंडावर भरभक्कम लाकडी फळ्या बसविलेल्या आहेत. साखळदंडावर जोडलेल्या लाकडी तक्तपोशीने बनविलेला असा हा पूल आहे. पण लाल दौडवाले नदीच्या तीरावर आले त्यावेळीं या तक्तपोशींपैकी निम्म्यानिम्म्या फळ्या काढून टाकलेल्या त्यांना आढळल्या. पुलाच्या निम्म्या भागावर नुसते साखळदंडच लोंबकळत राहिले होते. नदीच्या उत्तर तीरावर यांत्रिक तोफांचे जणू जाळेच उभे करून ठेवलें होतें आणि त्यांच्यामागें सफेत लष्कराच्या तुकड्या मोर्चे बंदी करून उभ्या होत्या. सफेत लष्कराने या

पुलाचा समूळ नाशच करून टाकला असता पण तसे ते करू शकले नाहींत. कारण चीनमधील दक्षिणी लोकांच्या भावना या साखळदंडी पुलाशीं निगडित झाल्या होत्या. तातू नदी ओलांडण्याकरतां असे कांहीं थोडे मोजके पूलच बांधण्यात आले होते व त्याच्याकरता अवाढव्य पैसाही खर्ची पडला होता. पण पुलाच्या नाश करण्यात आला नाहीं तरी तक्तपोशी काढून घेतल्यावर खालीं राहिलेल्या साखळदंडावरून लाल सैनिक हा पूल ओलांडतील अशी कोणाचीच कल्पना नव्हती.

वेळ गमावण्याची तर या प्रसंगी सोयच नव्हती. भरपूर सैन्य आणून शत्रूनीं हा पूल ताब्यात घेईपर्यंत धडाका मारून लाल फौजेला हा पूल कबजात घ्यावयाचा होता. या कामाकरता स्वयंसैनिकाची मागणी करण्यात आली. एका मागून एक स्वयंसैनिक पुढें येऊ लागले. यापैकीं तीस सैनिक निवडण्यात आले. त्यांच्या पाठीवर हात बॉंब व मॉसर पिस्तुलें कातडी पट्ट्यानीं बांधण्यात आलीं आणि हे सैनिक ताबडतोब साखळयांना लोंबकळून पुलाच्या शिल्लक राहिलेल्या तक्तपोशीकडे हात मारीत जाऊ लागले. खालून नदीचा लोंढा फोंफावत चालला होता व लाल सैनिक साखळदंडाला लोंबकळून पुढे पुढ सरकत होते पुलाच्या तक्तपोशीकडे शत्रूचे शिपाई येऊ नयेत म्हणून लाल फौजेच्या यांत्रिक तोफांचा मारा नदीच्या उत्तरतीराकडे सुरू झाला. सफेत लष्कराकडूनही या माऱ्याला उत्तर मिळू लागलें. शत्रूकडील निशाणबाजानीं यावेळीं साखळदंडाला धरून लोंबकळत येणाऱ्या लाल सैनिकांवर नेम धरून गोळया मारण्यास सुरुवात केली. या निशाणबाजीला एक, दोन, तीन स्वयंसैनिक बळी पडले व साखळदंडाचा हात सुटून ते खालीं नदीच्या प्रवाहात पडले. बाकीचे सैनिक जसजसे जवळ येऊ लागले तसतसा पुलाच्या तक्त पोशीचा आधार त्यांना मिळू लागला व निशाणबाजांच्या गोळया त्यांच्या डोक्यावरून जाऊ लागल्या.

झेच्युआनमधील सरकारी शिपायानीं प्राणाशीं खेळणारे असले धाडशी सैनिक कधिच पाहिले नव्हते. चोहोंकडून गोळयांचा वर्षाव चालू असतां त्याची पर्वा न करता साखळदंडाला लोंबकळून झपाझप हात टाकीत पुढे येत असलेल्या लाल सैनिकांना पाहून त्यांच्या मनोभावनांवरही या

भयकर धाडसी कृत्याचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. ते बदुका झाडीत होते पण लाल सैनिकाना मारण्याकरता ते तसे करीत नव्हते. उलट या धाडसी सैनिकाना त्यांच्या प्रयत्नात यश मिळावें, अशी प्रार्थना आपल्या मनात करीत होते. शेवटीं एक लाल सैनिक पुलाच्या तक्तपोशीवर रागत येऊन चढला. पाठीवरचा एक हात बॉब त्याने काढून घेतला व शत्रू-सैन्याच्या घोळक्यात तो अगदीं नेमका फेंकून मारला. लाल सैनिकाचे हें धाडस पाहून सरकारी लष्कराचे अधिकारीही बेफाम झाले. पुलाची तक्त-पोशी तोडून टाकण्याचा त्यानीं आपल्या शिपायाना हुकूम सोडला. या हुकुमाचा आता कांहीं उपयोग नव्हता. याच्या अगोदरच आणखी कांहीं लाल सैनिक तक्तपोशीवर चढून आले होते. तक्तपोशीवर पॅराफिन टाकून ती जाळून टाकण्याचाही प्रयत्न करण्यात आला पण तोही निष्फळ ठरला. वीस बावीस लाल सैनिक या वेळपर्यंत तक्तपोशीवर रागत येऊन शत्रू-सैन्याच्या यात्रिक तोफाच्या जाळयावर एका मागून एक हात बॉब टाकून त्यानीं तें निकामी करून टाकलें होतें. आपले सैनिक तक्तपोशीवर पोंचलेले पाहून दक्षिण तीरावरील लाल फौजेंतील सैनिक जयजयकार करून त्याना पुढे सरकण्यास उत्तेजन देत होते. लाल सैनिकाचे हातबॉब एकामागून एक सारखे कोसळू लागल्यामुळें सरकारी शिपायाची दाणादाण उडाली. यात्रिक तोफाचें निकामी होत चाललेले जाळें तसेंच टाकून त्यानीं काढता पाय घेतला. ते मागे पळत सुटले. लाल सैनिकानीं संबध पूल आपल्या ताब्यात घेतला इतकेंच नव्हे तर या माऱ्यातून सुरक्षित राहिलेल्या तोफाही ताब्यात घेऊन शत्रू सैन्याविरुद्ध ते त्याचा उपयोग करूं लागले. या माऱ्यामुळे सफेत लष्करातील सैनिकाना पळता भुई थोडी झाली. विशेष लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं, झेच्युआनमधील सरकारच्या लष्करात सामील झालेले शेंकडो सैनिक आपल्या हातातील रायफली फेकून देऊन व निःशस्त्र होऊन लाल सैनिकाना येऊन मिळाले. आन जेन चॅङ्‌मधील लाल सैनिकाच्या तुकडया पुढें सरसावून पुलावरील बाकीच्या फळया त्यानीं पुन्हा जोडून घेतल्या आणि एक दोन तासात सगळी लाल फौज आपल्या लव्याजम्यासह या पुलावरून लाल गीतें गात तातू नदीपलीकडे

पोंचली. नदीपार होत असलेल्या या फौजेवर उच्चच उच्च अंतरावर उडणाऱ्या सरकारी विमानांनीं बॉंब टाकून पुलावर मारा करण्याचा प्रयत्न केला पण हें बॉंब त्यावर नेमके पडणे शक्यच नव्हते नदीच्या पाण्यात त्यातील कांहीं बॉंब पडले व पाण्याचे झोत त्यांनीं वर उडविले. आन् जेन चॅङ्-जवळील तातू नदीच्या पुलावर चढून जाण्याचे प्रचंड धाडस ज्या लाल सैनिकांनीं केलें त्यांना चीनमधील लाल फौजेची सर्व श्रेष्ठ सन्मानाची लाल ताऱ्याचीं पदकें देण्यात आलीं. हें सर्व लाल सैनिक पंचविशीपेक्षाहि कमी वयाचे तरुण जवान मर्द होते. याप्रमाणे तातू नदी ओलांडून सर्व लाल फौज पश्चिम झेच्यूआनच्या स्वतंत्र मुलखात शिरली. कारण सोव्हिएट मुलखाला वेढा घालणाऱ्या सरकारी लष्करी अधिकाऱ्यांचे हात अद्याप येथ-पर्यंत येऊन पोंचले नव्हते.

तातू नदी अत्यंत बहाद्दरीने ओलांडून कम्यूनिस्ट झेच्यूआनमधील सुरक्षित प्रदेशात पोंचले पण वायव्य भागातील त्यांचा उद्दिष्ट मुलुख अद्याप २००० मैलावर होता. सात पर्वत राजी त्यांना अद्याप पायाखालीं घालावयाच्या होत्या. तातू नदीच्या उत्तरेस असलेल्या १६,००० फूट उंच असलेल्या हिमा-च्छादित पर्वतावर कम्यूनिस्ट आपल्या सर्व लव्याजम्यासह चढले त्यावेळीं जून महिना सुरू झाला होता. या हिमपर्वतावरून हजारो लाल दौडवाले तितकेच हजार फूट खाली उतरले. पर्वतशिखरावर भयंकर थंडी तर पर्वताच्या पाय-थ्याशीं तितकाच भयंकर उन्हाळा या हवेच्या फरकामुळें दौडवाल्यांच्या बरोबर असलेल्या सरंजामातील शेकडो लोक मृत्यू पावले व माल वाहून नेणारीं शेकडो खेंचरें थकून जीं एकदा खालीं बसलीं तीं पुन्हा उठलीं नाहींत. पाउ तुङ कॅङ् पर्वत ओलांडताना ठिकठिकाणीं वाटा व रस्ते बांधून त्यांना हा प्रवास पुरा करावा लागला. यानंतर चुङ् ताइची पर्वतराजी ओलांडून जातांना दौडवाल्यांची अशीच अगणित मनुष्यहानी झाली.

**लाल दौडवाल्यांची धांवती कीर्ति**—अखेर १९३५ जुलैच्या तिसऱ्या आठवड्यात झेच्यूआनच्या वायव्येकडील सुपीक प्रदेशात ते शिरले व या बाजूच्या सुङ् पान भागातील सोव्हिएट भूमींत असलेल्या चौथ्या आघाडी फौजेला ते येऊन मिळाले. या ठिकाणीं लाल दौडवाल्यांनीं कांहीं

दिवस विश्राति घेतली आपल्या नुकसानीची मोजदाद केली व पुढील प्रवासाच्या दृष्टीनें आपल्या बरोबरच्या सर्व सरजामाची व्यवस्था लावून दिली. नऊ महिन्यापूर्वी किआङ्सी प्रातातून हा सर्व सरजाम बाहेर पडला त्या वेळीं ९०,००० सशस्त्र सैनिक त्याच्याबरोबर होते पण लाल फौजेच्या हतोडा कोयत्याच्या लाल बावट्याखालीं आता त्यापैकीं ४५,००० सैनिक शिल्लक राहिले होते. हे सगळेच सैनिक मरण पावले, रस्ता चुकून दुसरीकडे कोठे भटकून गेले किंवा शत्रूंनीं कैद करून नेले अशातला भाग नव्हता तर यापैकीं बरेच सैनिक पिछाडीच्या सरक्षणाचे डावपेच या दृष्टीने लहान लहान गट तयार करून मागे ठेवण्यात आले होते. शेतकऱ्यात मिसळून दोस्त सैनिक या नात्यानें त्याना आपल्यात सामील करून घ्यावे, नान्किङ सरकारच्या फौजेला अटकावून ठेवण्याकरता निरनिराळया दगली उठवाव्या व खुद्द शत्रूच्या सैन्यातही फूट पाडण्याचा प्रयत्न करावा, हें काम त्याच्याकडे देण्यात आलें होतें. शत्रुसैनिकाकडून हस्तगत करून घेतलेल्या रायफली या नव्या भरतीच्या सैनिकात वाटण्यात आल्या होत्या व किआङ्सी ते झेच्यूआनपर्यंत नवीन नवीन बडवाल्याचीं ठाणीं निर्माण करून ठेवण्यात आलीं होतीं. नऊ महिन्याच्या या दीर्घ प्रवासात कम्यूनिस्टानीं काहीं दोस्त मिळविले व काहीं आपले दुष्मनही निर्माण करून ठेवले. वाटेंत लागलेल्या लहान मोठ्या गावातील जमीनदार, सावकार व सरकारी बडे अधिकारी याचीं कोठारे व भाडारे त्यानीं जप्त केलीं. सामान्य गरीब जनतेला त्यानीं मुळींच त्रास दिला नाही. या जप्तीच्या मालाची लाल फौजेतील सैनिकात व बरोबर असलेल्या लवाजम्यातील लोकात योग्य रीतीनें वाटणी करण्यात येत होती व ठिकठिकाणच्या गरीब शेतकऱ्यानाही या मालातील काहीं हिस्सा देण्यात येत होता. जमीनदाराच्या व सावकाराच्या मालाच्या जप्तीबरोबर त्याच्याजवळच्या जमीनीसबधाचे दस्तैवजही जप्त करून त्याचा नाश करण्यात आला. जमीनीवरील पट्टी रद्द करण्यात आली व ठिकठिकाणच्या शेतकऱ्याना आत्मसरक्षणाकरता शस्त्रेही देण्यात आलीं. चीनी सोव्हिएटाच्या या उदार व माणुसकीला योग्य अशा धोरणामुळें वाटेंतील खेड्यापाड्यातून त्याची लोकप्रियता वाढत होती इतकेंच नव्हे तर लाल दौडवाल्याच्या गतीपेक्षा अधिक द्रुतगतीनें त्याच्या सबधाची

कीर्ति त्याच्यापुढे धावत जात होती. यामुळें या पुढल्या प्रदेशातील जुलमानें गाजलेले शेतकरी आपल्या गावातून मुक्काम करून जाण्याबद्दल व आपल्याला जमीनदाराच्या व सावकाराच्या जुलमापासून स्वतंत्र करण्याबद्दल त्याच्याकडे शिष्टमंडळें पाठवून विनवणी करीत असत. लाल फौजेनें आपल्या या वर्तनानें लष्करी शिपायासंबंधानें वाटणाऱ्या जनतेच्या भावनांत क्रांति घडवून आणली होती व लाल फौज "गरीब जनतेची फौज" आहे, अशी भावना त्यांच्या मनांत उत्पन्न केली होती. यानंतर लाल दौडवाल्यांनीं माव्हरा काय व मोकुड् भागांत ज़वळ जवळ तीन आठवडे विश्रांति घेतली. कम्यूनिस्ट पार्टी, सोव्हिएट सरकार व क्रांतिकारक लष्करी कौन्सिल या तीन्हींचे प्रतिनिधी या ठिकाणीं एकत्र जमले व त्यांनीं पुढील योजना ठरवून टाकल्या.

**पूर्व योजनाच कायम**—झेच्यूआन प्रांतात १९३३ मध्यें उभारलेली चौथी आघाडी.फौज अर्वाचीन सर्व प्रकारच्या युद्ध सामुग्रीनें संपन्न होती. या फौजेंत ५००० सैनिक होते किआडसी प्रांतातून सरकारी सैन्याला टक्कर देत व अनेक नैसर्गिक आपत्ति सहन करीत आलेल्या लाल फौजेच्या तुकड्या या चौथ्या फौजेत सामील करण्यात आल्या. याप्रमाणें झेच्यूआनच्या पश्चिम भागांत जमलेल्या एकंदर फौजेतील सैनिकांची संख्या पुन्हा १००,००० वर भरली. या ठिकाणीं या दोन्ही फौजांची पुनर्घटना करण्यात आली. पूर्वी ठरल्याप्रमाणें वायव्येकडील प्रांतांत जाऊन त्याठिकाणीं आपल्या सामर्थ्यांची जमवाजमव करावी असें माउ च तुङ्, जू दे, प्रभृति पुढाऱ्यांचे म्हणणे होते. झेच्यूआन प्रांतातच राहावें, यापुढें जाऊं नये व याङसीच्या दक्षिण भागांतील आपलीं ठाणीं पुन्हा मजबूत करावीं, असेंही आपले मत लाल फौजेंतील व पार्टीतील कांहीं सेनानायकांनीं व पुढाऱ्यांनीं व्यक्त केलें. पण या अनिश्चित परिस्थितीचा निर्णय परभारेंच लागला. याङ्त्सी ओलांडतांना व त्यापेक्षांही तातू नदी ओलांडतांना लाल फौजेची धुळधाण उडविण्याचा बेत फसल्यामुळे हताश पेटलेल्या चिआङ कायी शेकनें झेच्यूआन प्रांताच्या पूर्वेकडून आपल्या प्रचंड सैन्याच्या बळावर लाल फौजेला जेरीस आणण्याचे ठरविलें व तिला दुभंग करण्याकरता आपल्या सेनेच्या पलटणी आंत घुसविल्या. शिवाय झेच्यूआन प्रांतातील नद्यानाही

या वेळीं भयकर पूर आले यामुळें लाल फौजेचीं सर्व पथकें एकत्र जमून सरकारी सेनेला तोंड देत राहणें अशक्य झालें. अशा परिस्थितीत पूर्वीचाच वायव्येकडे दौड मारण्याचा बेत निश्चित करण्यात आला. पिछाडीचा योग्य बदोबस्त करून लाल फौज वायव्येकडे निघाली त्यावेळीं या फौजेंतील सैनिकाची सख्या ३०,००० होती. माउ च तुङ व चाउ एन लाय याच्याकडे या सेनेचें अधिपत्य होतें. याशिवाय कियाङ्सी प्रातातील सोव्हिएट मध्यवर्ती सरकारचे अधिकारी व चिनी कम्यूनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती कमिटीचेही सभासद या फौजेबरोबरच्या लव्याजम्याबरोबर होते. लाल फौजेला आता ज्या लाबवरच्या प्रदेशातून जावयाचें होतें तो सर्व प्रदेश जगलमय व डोंगराळ होता. माञ्चू व पूर्व तिबेटातील कडव्या टोळयाच्या ताब्यातील हा मुलूख होता. चीनी लोकाचा कट्टर द्वेष करणाऱ्या अशा या टोळया होत्या. सफेत चीनी व लाल चीनी असा भेदाभेद त्यानीं केला नाहीं. चीनी लोकासबधानें या टोळयातील लोकाच्या मनात परपरागत कट्टर द्वेष होता. दौडवाले आपल्या खेड्यात येतात, असे पाहताच ते आपल्या घरातील सर्व धान्यधून्य व गुरें ढोरें व मेढया आपल्याबरोबर घेऊन पळून जात व सर्व खेडीं ओसाड करून टाकीत. या लोकाकडून एकादी मेंढी मिळवायची म्हणजे ती त्या लोकावर झडप घालूनच मिळवावी लागे. “ एका माणसाचा बळी द्यावा तेव्हा एक मेंढी मिळवावी. ” अशी एक म्हणच या भागातून जात असताना लाल दौडवाल्यात रूढ झाली होती. या टोळयाचा माग काढून त्याच्यावर हल्ले करावे व त्यातील माणसें पाडाव करून आणावीं तेव्हाच तीं या भागातील वाटा दाखविण्याच्या कामीं उपयोगीं पडत. या वाटाड्यापैकीं काहीं लोक लाल बावटेवाल्याचे मित्र बनले व कम्यूनिस्ट पार्टीत ते पुढें सामीलही झाले. काहीं तरुण वाटाडे पुढें शेन्सी प्रातातील कम्यूनिस्ट स्कूलमध्यें शिक्षणही घेऊ लागले.

**कष्टाचा प्रवास**—निर्मनुष्य अशा गवती जगलातून लाल दौडवाल्याना दहा दिवस रात्र प्रवास करावा लागला. या दलदलीच्या रानात यावेळीं सारखा दिवसरात्र पाऊस पडत होता. या दलदलींत फसून जाऊन लाल दौडींतील माणसापेक्षा जनावरेंच जास्त मरण पावलीं. सरपणाचा

पत्ताच नव्हता. कच्चे गहू व हिरव्या कच्च्या भाज्या खाऊन हे दिवस लाल दौडवाल्याना काढावे लागले. आसरा घ्यावा म्हटलें तर दलदलीच्या रानात शपथेलासुद्धा एक झाड नव्हतें. गवताच्या दाट जाळयातून व झुडपातून एकमेकाना बिलगून निजून लाल दौडवाल्यानीं या भागातील प्रवासात कशा तरी रात्रीं काढल्या. सरकारी लष्कराच्या काहीं तुकड्या लाल फौजेचा पाठलाग करीत या भागातहि आल्या पण सततधार पाऊस चालू असता दलदलीच्या रानातून अनवाणी जाण्याची व पोटापाण्याचे हाल सोसण्याची त्याच्या मनाची तयारी नव्हती. भाडोत्री लष्करानें असे हाल काय म्हणून सोसायचे? काहीं थोडे खेरीज करून बाकी सर्व सरकारी सैनिकानीं मागच्या मागेच पोबारा केला.

दक्षिण कान्सू भागातील बऱ्याच मुसलमान लष्करी पथकानीं कम्यूनिस्टाचा मार्ग रोखण्याच्या कामात नार्किंङ फौजेशीं सहकार्य केलें. पण लाल फौजेनें या हल्लयालाही यशस्वी रीतीनें तोंड दिलें. नार्न्किङ् फौजेनें घातलेल्या वेढ्यातून ते बाहेर पडले व मुसलमान घोडदळातील शेकडो घोडे त्यानीं पाडाव केले. अखेर आणीबाणीच्या लढाया मारीत, दुर्लंघ्य नद्या ओलाडीत, पराकोटीच्या नैसर्गिक आपत्तींना तोंड देत, मानवी आवाक्याबाहेरचे पराकाष्ठेचे हाल सोशीत दमलेले, भागलेले, पाय सुजून गेलेले, रोडावलेले, लाल दौडवाले स्त्रीपुरुष शेन्सी प्राताच्या उत्तर भागात आपल्या इच्छित स्थलीं ता. २० आक्टोबर १९३५ रोजीं येऊन पोंचले. कियाङ्सी प्रात सोडल्यापासून या जागीं येण्यास लाल दौडवाल्याना एक वर्षावर दिवस लागले. १९३३ सालीं शेन्सी प्रातात पहिल्या आघाडी फौजेला जोडलेल्या २५ व्या, २६ व्या फौजानीं या प्रातात सोव्हिएट सत्तेचे लहानसें ठाणें प्रस्थापित केलें होतें. तातू नदी ओलाडल्यानतर झेच्यूआन प्रातातून इकडे येताना लाल दौडवाल्याबरोबर ३०००० फौज होती त्यापैकीं १०,००० फौज वाटेतील अनेक लढायात बळी पडली व बरोबर असलेल्या लव्याजम्यापैकींही शेंकडो लोक उपासमारीनें व रोगानीं मृत्युमुखीं पडले.

**पल्लेदार दौडीचें रहस्य**—चीनी कम्यूनिस्ट पार्टीनें व तिच्या लाल फौजेनें केलेल्या या पल्लेदार दौडीचा पुढील आकडेवार गोषवारा

कोणाचेंही अंतःकरण हालवून सोडील यात शका नाहीं. कियाङ्सी प्रातातून निघून शेन्सी प्रातात येऊन पोंचेपर्यंत रोज सरासरीनें लाल फौजेला सरकारी लष्कराबरोबर एक तरी चकमक लढावी लागली. या दौडींतील एकूण पधरा दिवसाचा काल घनचक्कर युद्धात गेला. एकदर प्रवासाच्या ३६८ दिवसापैकीं २३५ दिवस लाल दौडवाल्यानीं दिवसा प्रवास केला. १८ मजला रात्रीं मारण्यात आल्या. विश्रातीच्या वेळेची मोजदाद केली तर ती १०० दिवसाइतकी भरली. या मुक्कामापैकीं बऱ्याच वेळा सरकारी लष्कराच्या हल्ल्याना तोड द्यावें लागलें. ६००० मैलाच्या या दौडींत निव्वळ विश्रातीचा काल अवघा ४४ दिवसाइतका भरला. सरासरी प्रत्येक ११४ मैलाच्या प्रवासाला एक मुक्काम पडला. दौडीचें प्रमाण रोज सरासरी ७१ ली म्हणजे २४ मैल पडलें.

लाल दौडवाल्यानीं एकूण १८ पर्वतराजी ओलाडल्या. यापैकी ५ पर्वताचा शिखरभाग हिमाच्छादित होता. २४ नद्या ते उतरून गेले. १२ निरनिराळ्या प्रातातून ही दौड निघून गेली व दौडींतील लाल फौजेने त्यातील ६२ शहरें काबीज केलीं. लाल दौडवाल्याना अडविण्याकरता आलेल्या १० निरनिराळ्या प्रातिक सुभेदाराच्या लष्कराच्या फळ्या फोडून ते सहीसलामत बाहेर पडले. याशिवाय चिआङ्ग कायी शेकच्या मुख्य लष्कराचा त्यानीं ठिकठिकाणीं पराभव केला, त्याच्या हातावर तुरी देऊन ते निसटून गेले व काहीं प्रसगीं त्याच्या अगावरूनही लढत लढत ते पार निघून गेले. रानटी टोळ्याच्या ६ प्रातात त्यानीं प्रवेश केला व तेथून यशस्वी रीतीनें ते बाहेर पडले. वीसोगणति वर्षात ज्या भागातून चीनी लष्कर कधीं गेलें नाहीं अशा प्रदेशातूनही लाल दौडवाले शिताफीनें निघून गेले.

चीनी कम्यूनिस्टानीं केलेली ही दौड लष्करी डावपेचाच्या दृष्टीनें शिस्तीने घेतलेली माघार होती. शत्रुसैन्याच्या भीतीनें पोबारा करण्याचा हा प्रकार नव्हता. कियाङ्सी प्रातातून ते शिस्तीनें व स्वस्थपणाने बाहेर पडले व वाटेंत आलेल्या अनेक मानवी व दैवी अडथळ्याना शौर्यानें तोंड देत देत इच्छित स्थळीं तितक्याच स्वस्थपणानें व शिस्तीनें येऊन पोचले. शेन्सी प्रातात ते आले त्यावेळीं नैतिक व राजकीय दृष्टया मुळींच

नामोहरम झालेले नव्हते जपानी आक्रमणाविरुद्ध अघाडी निर्माण करता येईल, अशा प्रदेशात आपण जात आहो, असें चीनी कम्यूनिस्ट पुढाऱ्यानी व सेनानींनी या दौडीच्या आरंभींच जाहीर केलें होते व त्यानी स्वीकारलेले हे धोरण लाल दौडवाल्याचाच केवळ नव्हे तर ते ज्या प्रातातून गेले तेथील चीनी जनतेचा उत्साह कायम राहण्यास व वाढविण्यास कारणीभूत झालें. यापुढें घडून आलेल्या इतिहासानेही चीनी कम्यूनिस्टानी ठरविलेली ही योजना योग्य होती, असा निर्वाळा दिला व चीन, जपान व सोव्हिएट रशिया याचे निकटवर्ती भवितव्य ठरविण्याच्या कामीं कम्यूनिस्टाच्या ताब्यात असलेल्या चीनमधील या वायव्य प्रदेशाने महत्वाची भूमिका पार पाडून दाखविली. जपानविरोधी प्रचाराच्या दृष्टीनेही चीनी कम्यूनिस्टांनीं स्वीकारलेले हें डावपेचाचे धोरण श्रेष्ठ दर्जाचे ठरले. २०,००,००,००० लोकसंख्या असलेल्या प्रातातून लाल दौडवाले निघून गेले. यावेळच्या चकमकींमधून त्याना जो वेळ मिळत असे त्या वेळीं त्या त्या ठिकाणच्या रहिवाशाच्या ते प्रचड जाहीर सभा घेत, नाट्यप्रयोग करून दाखवीत. सावकाराकडून खडणी वसूल करीत गुलामाना बधमुक्त करीत, स्वातत्र्य, समता व लोकशाही याचे रहस्य जनतेला समजावून देत,सरकारी अधिकारी,बडे जमीनदार व कर वसूल करणारे याच्यासारख्या देशघातकी लोकाच्या मालमत्ता जप्त करीत व त्याच्याकडून घेतलेला माल गरीब जनतेत तें वाटून टाकीत लाल फौजेसबधानें अनेक गैरसमज जनतेत फैलावण्यात आले होते. पण करोडो शेतकऱ्यानीं लाल फौज व तिचे सैनिक प्रत्यक्ष पाहिले तेव्हा त्याच्याबद्दल त्याना मुळींच भीति वाटेनाशी झाली. इतकेंच नव्हे तर हजारो शेतकरी या फौजेला जाऊन मिळाले किसान क्रांतीच्या उठावाचे व कम्यूनिस्टाच्या जपानविरोधी धोरणाचे रहस्य जनतेला लाल सैनिकानीं समजावून दिले. त्याना सशस्त्र केलें व लाल गनीमी सैनिक तयार करणारे किसान तरुणाचे गट मागे ठेवून दिले. लाल दौडवाले पुढे निघून गेले म्हणजे त्याच्यामागे लागलेल्या नानकिंग् लष्करातील सैनिकाना गुतवून ठेवण्याच्या कामीं या गनीमी सैनिकाचा फार उपयोग झाला, यात शकाच नाहीं. ही पल्लेदार दौड सुरू झाल्यानतर तिच्यातून हजारो लोक अनेक कारणानीं गळून पडले पण त्याबरोबरच हजारो शेतकरी व सरकारी लष्करातून पळून आलेले हजारों सैनिक तिच्यात सामील झाले.

# जपानविरोधी अघाडी

**कम्यूनिस्टांचे एकजुटीचे धोरण**—चीनी कम्यूनिस्टाची दौड १९३५ साली शेन्सी प्रातात पोचण्यापूर्वी जपानने चीनवरील आक्रमणाच्या धोरणाला हात घातला होता. यावेळीं प्रत्यक्ष सैन्य घेऊन जपान चीनवर चालून आले नाहीं तर चीनच्या उत्तरेकडील पाची प्रात आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याकरता निराळींच कारस्थाने त्यानें रचलीं. सर्व चीन आपल्या कबजाखाली आणण्याची ही एक नादीच होती. या भागातील चीनी सरकारी अधिकाऱ्याना फितुर करावे, जकाती चुकवून चीनच्या या भागात अफूची आयात करावी, हा सर्व व्यापार आपल्या ताब्यात घ्यावा व उत्तरेकडच्या या प्रातातील उद्योगधंदेही हळू हळू आपल्या ताब्यात घ्यावे, हा जपानचा डाव चीनी कम्यूनिस्टानीं ओळखला व या कामात जपानला यश मिळू नये म्हणून प्रत्येक पावलागणिक त्याला विरोध करण्याकरता जपानविरोधी प्रचाराला कम्यूनिस्टानीं जोराने हात घातला शेन्सी प्रातात पल्लेदार दौडीपूर्वी कांहीं दिवस दाखल झालेल्या पार्टीच्या मध्यवर्ती कमिटीनेही १९३५ आगष्ट १ रोजीं पुढील जाहीरनामा प्रसिद्ध कला.

“ चिनी नागरिकानो, चीनमधील आपले जीवित सुरक्षित राखावयाचें असेल तर जपानी आक्रमणाला आपण प्रतिकार केला पाहिजे. या प्रतिकाराच्या बाबतींत आपण दुर्लक्ष केल्यास आपण जीवत राहू शकत नाहीं.

“ चिनी सोव्हिएट सरकार या बाबतींत पुढाकार घेण्यास तयार आहे. राष्ट्रीय सरक्षणाचें मुख्य काम हातीं घेणारें अखिल चिनी सरकार उभारण्याची त्याची तयारी आहे. अशा प्रकारचे सरकार सघटित करण्याकरता चीनमधील सर्व राजकीय पक्षाबरोबर व गटाबरोबर, चीनमधील प्रमुख राजकीय व सार्वजनिक कार्यकर्त्यांबरोबर, जनतेच्या सर्व सघटनाबरोबर, जपानी आक्रमणाला विरोध करण्याच्या लढ्यात भाग घेऊ इच्छिणाऱ्या सर्व स्थानिक लष्करी व राजकीय अधिकाऱ्याबरोबर तावडतोब वाटाघाटी सुरु करण्यासही

चानी सोव्हिएट सरकारची तयारी आहे.

"१ जपानच्या आक्रमणाला सशस्त्र प्रतिकार करावा व जपाननें व्यापलेला प्रदेश पुन्हा आपल्या ताब्यात घ्यावा.

" २ कालव्याच्या पाण्यावरील नियत्रणाच्या नियमात सुधारणा करून दुष्काळी भागातील लोकाना मदत द्यावी, मजुरीच्या दरात वाढ करावी, कर बसविण्याच्या बाबतींत सुधारणा घडवून आणाव्या, सार्वत्रिक मोफत शिक्षण सुरु कराव, अशारीतीनें जनतेची राहणी सुधारावी.

" ३ जपान्याची व त्याना अनुकुल असलेल्या राष्ट्रघातकी लोकाची मालमत्ता जत करण्यात यावी.

" ४ जनतेला लोकशाही स्वातत्र्याचे हक्क द्यावे व सर्व राजकीय कैद्याची मुक्तता करण्यात यावी.

" ५ जपानी साम्राज्यवाद्याच्या विरोधी असलेल्या सर्व राष्ट्राबरोबर सलोख्याचे सबध प्रस्थापित करण्यात यावे वगैरे."

मूलभूत तत्वाचा या जाहीरनाम्यात समावेश करण्यात आला होता. जपान विरोधी राष्ट्रीय आघाडी निर्माण करण्याची आपली कळकळीची इच्छा अधिक जोरदारपणें व्यक्त करण्याकरता व समाजातील सर्व वर्गाना आपलेसे करण्याकरता चीनी सोव्हिएटानीं आपल्या आर्थिक धोरणातही बदल केला. लहान जमीन दाराच्या जमीनी जत करण्याचे प्रमाण कमी केले व खासगी कारखानदारीला व व्यापाराला अधिक उत्तेजन दिलें. राष्ट्रीय ऐक्याकरता चीनी कम्यूनिस्ट पार्टीने याप्रमाणे नवे धोरण स्वीका ले व या धोरणाप्रमाणे राष्ट्रीय ऐक्याचा प्रचार करण्याचें ठरविले.

**मॅडम सन्यत्सेनचे जाहीर पत्रक**—मॅडम सन्यत्सेन-चिङ् लिङ्-च्या नेतृत्वाखालीं चीनमधील सर्व दर्जाच्या ३००० स्त्रीपुरुषानीं ४ आगष्ट १९३५रोजीं एक जाहीरपत्रक प्रसिद्ध केलें. जपानच्या बाबतींत नान्किङ् सरकारनें शरणागतीचें धोरण स्वीकारू नये, अशी या पत्रकात सूचना केली होती व त्याबरोबरच चीनी जनतेनें जपानविरोधी युद्ध कसें लढवावे, यासबधाचा एक कार्यक्रमही त्यात नमूद केला होता. चीनमधील अखिल जनतेला सशस्त्र करावे, आपल्या सर्व शक्ति एकवटाव्या. जपानी मालकीचे सर्व कारखाने जत करावे,

चिनी जनतेचें एक राष्ट्रीय मडळ निवडण्यात यावें व जपानच्या सर्व शत्रूशीं दोस्ती घडवून आणावी. मॅडम सन्यत्सेनच्या कार्यक्रमातील ही मुख्य कलमे होतीं. मॅडम सन्यत्सेन व चिनी कम्यूनिस्ट पार्टी या दोघाचा कार्यक्रम वरीलप्रमाणें एकमेकाशीं जुळता होता. जपानविरोधी लढा चालविण्याकरता राष्ट्रीय ऐक्य प्रस्थापित करावे व राष्ट्रातील सर्व शक्ति एकवटाव्या. ही जपान-विरोधी सयुक्त अघाडी लोकशाही स्वातत्र्याच्या पायावर उभारावी. चिनी कामगार, शेतकरी व देशातील सर्व दर्जाचे लोक व खुद्द सरकार या-प्रमाणे खालपासून वरपर्यंत हे युद्ध चालविण्याकरता एकजुटीचा सघटित प्रयत्न करण्यात यावा, हे या दोन्हीं कार्यक्रमातील रहस्य होते आपसातील युद्धाची समाप्ति ही या एकीच्या बाबतींत आवश्यक अशी आरभीची अट होती. " चीनी लोकानीं चीनी लोकाविरुद्ध लढता कामा नये " हे या जपानविरोधी मोहिमेतील घोषवाक्य होतें.

**विद्यार्थ्यांची चळवळ**—जपानी साम्राज्यवादी चीनवर आक्रमण करण्याची जोराने तयारी करीत होते व त्यान त्याना थोडेबहुत यशही मिळत होतें तरी चीनमधील परिस्थिति अगदींच निराशाजनक झालेली नव्हती. १९३१ सालीं उफाळलेल्या विद्यार्थी चळवळीला पुन्हा नवा जोम आला होता. विशेषतः उत्तर चीनमध्ये ही चळवळ जोरानें सुरू झाली होती. १९३५ मध्यें उत्तर चीनमधील हुपे व चहार हे दोन प्रात नान्किङ्‌ सरकारपासून अलग करण्यात आले व त्याठिकाणीं स्वतत्र राजकीय कौन्सिल स्थापण्यात आलें, त्यावेळीं या कराराविरुद्ध पेपिंङ्‌च्या विद्यार्थ्यांनीं निदर्शने केलीं. " आपसातील युद्ध थाबवा, " " लोकहो सशस्त्र व्हा ! " " जपान-विरुद्ध युद्ध पुकारा " या घोषणानीं पेपिंङ्‌ राजधानी त्यानीं दणाणून सोडली. पेपिंङ्‌प्रमाणें तीनचीन येथील विद्यार्थ्यानींही अशींच निदर्शने करून उत्तर चीनमधील जपानी कारवायाचा निषेध केला. विद्यार्थ्यांची ही चळवळ सर्व चीनभर पसरली व नान्किङ्‌कडे मोर्चा घेऊन जाण्याची त्यानीं तयारी केली. प्रत्येक ठिकाणीं पोलिसाना व लष्करी शिपायाना ते बधुभावानें आळवीत होते व जपानविरोधी चळवळींत सामील होण्यास सागत होते. जनरल चिआङ्‌ कायी शेकनेही विद्यार्थ्यांच्या शिष्टमंडळाला मुलाखत देण्याचें

शेवटीं कबूल केलें व जपानविरोधी प्रचारासबधानें त्याच्याशीं विचारविनिमय केला. याच वेळीं चीनमध्ये सर्वत्र राष्ट्रोद्धार सघाच्या शाखा प्रस्थापित झाल्या. १९३६ सालीं जपानविरोधी चळवळीच्या वर्षदिनानिमित्त सर्वत्र पूर्वीपेक्षाही किती तरी मोठ्या प्रमाणावर निदर्शने झालीं. लोयाङ्मधील विद्यार्थ्यांच्या मिरवणूकीवर गोळीबार करण्यात आला. या गोळीबाराला बरेच विद्यार्थी बळी पडले. तथापि विद्यार्थ्यांनीं मुळींच कच खाल्ली नाहीं. पोलिसाना उद्देशून "चीनी भाई एक है" या घोषणा करण्याचें त्यानीं बद केले नाहीं किंवा जपानविरोधी लढयात आपल्याबरोबर खाद्यास खादा लावून लढण्याबद्दल त्याना विनति करण्याचें सोडलें नाहीं. खुद्द नान्किङ्ग राजधानींतले विद्यार्थीही या चळवळींत मोठ्या धडाडीने सामील झाले. चीनमधील लष्करी विद्यापीठातूनही या चळवळीचे पडसाद उठल्याशिवाय राहिले नाहीत. खेड्यापाड्यातील व शहरातील, शेतातील व कारखान्यातील वातावरण "चीनी माणसानें चीनी माणसाशी लढता कामा नये." या घोषणानीं दुमदुमून गेले.

**जपानविरोधी प्रचार**—प्रसगाला अनुरूप अशीं लहान लहान नाटकें करून जनमनाला रिझवीत असता आपल्या ध्येयाचा व कार्याचा प्रचार करणे, हें चिनी चळवळीचें एक मुख्य अग आहे. खेड्यापाड्यातील शेतकरी जनतेला अशीं नाटकें फार आवडतात व या नाटकातून जीं पदें गायिलीं जातात तीं खेड्यापाड्यातून सर्वतोमुखीं होतात. अर्थात् या पदातून गोवलेले विचारही त्याच्या मनावर इष्ट तो परिणाम घडवून आणतात. योग्य त्या अभिनयासह करण्यात आलेले सवाद तर फारच परिणामकारी होतात. चीनी कम्यूनिस्टानीं आपल्या पल्लेदार दौडीच्या कालात या प्रचारतत्राचा चागलाच उपयोग केला होता. त्याप्रमाणेंच याही प्रसगीं चिनी कम्यूनिस्टानीं व विद्यार्थ्यांनीं निरनिराळ्या प्राताम शेकडो प्रचड सभा घेतल्या, खेड्यापाड्यातून अशा प्रकारच्या नाटिका करून व पदे गाऊन चिनी किसान–कामगार जनतेला जपानच्या विरुद्ध उठविलें. जपान विरोधी प्रचाराच्या या कालात पुढील मॅन्च्यूरियातील मार्चिंग सॉग चीनमध्यें लोकप्रिय झालें होतें.

" उठा उठा तुम्ही उठा
गुलाम नका होउ उठा ।
रक्तमांस चिखल भरुनि
उभारु भित जागि उठा ॥ "

उत्तर चीनमध्ये एका चिनी बादशहाने रानटी टोळ्यांच्या हल्ल्यापासून चीनचें रक्षण करण्याकरता शेंकडों मैल लांबीचा तट उभारला होता हे तर प्रसिद्धच आहे. वरील गीत युनानमधील एका कूलीनें रचले. हा कूली पुढे लष्करात शिरला. शांघाय येथे असताना तो फ्ल्यूट वाजवावयास शिकला हा कूली एक होतकरू नाटककारही बनला. जपानविरोधी प्रचार केल्यामुळे त्याला अटकही करण्यात आली. सरकारनें सेन्सार शिपचे कितीही बांध घातले तरी त्याने हें मार्चिंग सॉंग देशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलें. भात शेतीची कामें करणारा चीनी शेतकरी हे गीत गुणगुणू लागला. ओझीं वाहणारा कुली पाठीवर ओझें घेऊन चालत असताना, कारखान्यातला व खाणींतला कामगार आपल्या रक्ताचे पाणी करताना, हें गीत गुणगुणू लागला. सर्व चीनच याप्रमाणे हे प्रतिकाराचे गीत गाऊ लागलें. चीनी साहित्यातही जपानविरोधी प्रचारानें यावेळीं प्रवेश केला होता. नाटकातून, काव्यातून, कादंबऱ्यातून जपानविरोधी प्रचाराचे कार्य सर्वत्र सुरू झाले होते.

**जर्मन-जपान करार**—१९३६ च्या प्रारंभीं कम्यूनिस्टांना हाणून पाडण्याकरता जपाननें व चीनने दोघांनीं मिळून जोराचा प्रयत्न करावा, असें जपानच्या परराष्ट्रखात्याच्या मंत्र्याने नान्किङ् सरकारला सुचविले होतें. पण चीनवर सर्व बाजूनीं आक्रमण करू पाहणाऱ्या जपानला या बाबतींत मदत करण्यापेक्षा वायव्य प्रांतात स्थिर झालेल्या कम्यूनिस्टांशीं सगनमत करून जपानच्या अक्रमणाला विरोध करणेंच अधिक बरे, असें चीनमधील नेमस्त पक्षाच्या पुढाऱ्यानाही वाटू लागले. याच वर्षाच्या अखेरीस कम्यूनिस्ट इंटर नॅशनलला विरोध करण्याकरता जपाननें जर्मनीशीं करार केला. या जर्मन-जपान करारावर १९३६ नोवेंबर २५ रोजीं दोन्हीं राष्ट्रांच्या सह्या झाल्या. हा करार म्हणजे एक ढोंग होतें. कम्यूनिस्ट इंटर नॅशनलला विरोध करण्यापेक्षा चीन-

वर कबजा जमविण्याचा हेतू साध्य करण्याकडेच जपानचें अधिक लक्ष होतें. त्याचप्रमाणे ब्रिटन व अमेरिकन याचें चीनमधील प्रस्थ नाहींसें करण्याचाही जर्मनी व जपान या दोन्ही राष्ट्राचा हेतू होता. कोमिन्टर्नला ( कम्यूनिस्ट इटर नॅशनल ) विरोध करण्याच्या पाघरूणाखालीं जपानला व जर्मनीला आपले साम्राज्यवादी डाव साधायचे होते.

**राष्ट्रोद्धार संघाचा पुढाकार**—चीनी कम्युनिस्ट पार्टीनें व मॅडाम सन्यत्सेनच्या नेतृत्वाखालील राष्ट्रोद्धार सघाने सयुक्त अघाडी निर्माण करण्याचे प्रयत्न चालविले होते पण नान्किङ् सरकारनें अद्यापि या बाबतींत आपली अनुकूलता दर्शविली नव्हती, हें पाहून जपानने निर्धास्तपणे १९३६ जूनमध्यें व त्यानतर दोन महिन्यानीं सप्टेंबरमध्ये सूइ युआन प्रातावर चढाई केली. जपानच्या या आक्रमणामुळें देशातील राष्ट्रीय चळवळीला अधिकच जोर चढला. जपानच्या या चढाईला तोंड देण्याकरता शान्सी प्रातातील लाल फौजेनें आपल्या हालचाली सुरू केल्या. पण सयुक्त आघाडीचें धोरण नान्किङ सरकारनें मान्य केलेले नसल्यामुळें लाल फौजेचा प्रतिकाराचा मोर्चा जागच्या जागींच थोपविण्यात आला. नान्किङ सरकारशीं सयुक्त अघाडीच्या बाबतींत एकमत झालेलें नसताना जपानी आक्रमणाला तोंड देण्याच्या ऐवजीं नान्किङचे लष्कर व लाल फौजेचीं पथके याच्यातच चकमकी उडण्याचा प्रसग आला असता. तेव्हा जपानवर लढाईच्या बाबतींत आपण पुढाकार घेण्याचे लाल फौजेनें नाकारले व आपलीं पथकें माघारी घेतलीं. चीनमधील सरकारी फौजा व लाल फौजा एकत्र याव्या, चीनमधील सर्व पक्षाची एकजूट व्हावी व सर्वांनीं मिळून जपानला प्रतिकार करावा, अशी चीनी कम्यूनिस्टाची कळकळीची इच्छा होती. या एकजुटीच्या प्रयत्नात अडथळा येऊ नये व आपल्यासबधाने गैरसमजूत होऊ म्हणूनच यावेळीं चीनी कम्युनिस्टानी वरील धोरण स्वीकारलें होते.

पण सुइ युआनमधील सरकारी फौजेने जपानी आक्रमणाला यशस्वीरीतीनें प्रतिकार केला. सरकारी फौजेचा सेनापति फू चोई थोर दिलाचा माणूस होता. आपल्या फौजेला जनतेने पाठिंबा दिला तर चागलेंच, असें मानणारापैकीं तो एक होता. चीनमधील इतर सर्व भागातून पुष्कळ विद्यार्थी

व इतर उत्साही लोक या लढयात भाग घेण्याकरता सुइ युआनच्या आले व फू चोईने त्यांचें स्वागत केलें. शांघाय, चिंग तौ, व तीन् चीनमधील जपानी गिरण्यातील एक लाख मजूर जपानच्या आक्रमणाला विरोध दर्शविण्या करता संपावर गेले. "आमच्या देशावर स्वारी करणाऱ्या लोकांनीं आमची पिळणूक का करावी ?" अशा घोषणा या सार्वत्रिक राजकीय संपात सामील झालेले कामगार करीत होते. शांघायमधील राष्ट्रोद्धार संघाने संपवाल्याना मदत करण्याकरता एक कमिटी नेमली. वर्तमानपत्राचे संपादक, कॉलेजचे प्रोफेसर, पेढीवाले व इतर बरेच वजनदार लोक या कमिटींत होते. राष्ट्रीय चळवळींतील निरनिराळे पक्ष याप्रमाणे एकत्र येऊ लागले होते. आश्चर्य हें कीं, चीनी सरकारला ही गोष्ट आवडली नाहीं. सरकारने जपानी गिरणी-वाल्याची बाजू घेतली व कमिटींतील कित्येक पुढाऱ्याना तुरुंग दाखविण्यात आला. फेंड चोयी, राष्ट्रीय मिलटरी कौंसिलमधील एक सभासद, व इतर सरकारी अधिकारीही सरकारच्या या कृत्यामुळें नाराज झाले. सरकारच्या या कृत्याबद्दल त्यांनीं उघडपणें नापसंती दर्शविली.

**लढ्याचीं सूत्रे कोणाच्या हातीं ?**—जपानविरोधी धोरणाच्या बाबतींत नान्किङ्मध्यें यावेळीं जोराचे वादविवाद चालू होते. राष्ट्रीय चळवळ फोफावत चालली आहे, चीनमधील उरलेसुरले प्रांत नान्किङ् सरकारच्या सत्तेखालीं येत आहेत, असें पाहून जपान आपल्यात फूट पाडल्याशिवाय राहणार नाहीं तेव्हा वेळींच सावध होऊन जपानचा प्रतिकार करण्याची तयारी केली पाहिजे, असें नान्किङमधील एका गटाचें म्हणणे होतें. जपानशीं सह-कार्य करण्याचें आपले धोरण तसेंच पुढे चालू ठेवावे, असे म्हणणारा वॅङ्-चिङ्वीच्या अनुयायाचा दुसरा गट होता. राष्ट्रीय एकजुटीचें धोरण खरोखरच अमलात आणायचे असेल जर जनतेत फोंफावलेल्या चळवळींच्या जोरावर ते यशस्वी होईल कीं, जनतेच्या चळवळीला उत्तेजन न देता राष्ट्रातील वरच्या वर्गाच्या भावना लक्षात घेऊन ही एकजूट घडवून आणता येईल, याच महत्वाच्या प्रश्नावर नान्किङ्मधील राजकीय पक्षात चर्चा सुरू झाली होती. जपानविरोधी लढा लढविताना जनतेचें सामर्थ्य वाढावें, जनतेच्या निर-निराळ्या वर्गात एकजूट व्हावी, या एकजूट झालेल्या जनतेच्या पुढा-

ऱ्याच्या हातात या लढयाची सूत्रें द्यावीं, ही गोष्ट नान्किङ सरकारला मान्य नव्हती व त्याचे साथीदार असलेल्या भांडवलवाल्याना व जमीनदाराना तर ती मान्य नव्हतीच नव्हती. नान्किङ सरकारच्या लष्करातील एक सेनानी फेङ्-यु शिआङ्, सन्यत्सेनचा मुलगा सन फो, वसूली खात्याचा प्रधान टी. व्ही. सुग याना जपानविरोधी लढा चालविलाच पाहिजे व राष्ट्रातील आम जनतेच्या भरभक्कम एकजुटीच्या व्यापक भूमिकेवर तो लढविण्यात आला पाहिजे, असें वाटत होते. हे आपलें मत ते उघडपणें बोलूनही दाखवीत होते. पण राष्ट्रीय चळवळींत जनतेचे सामर्थ्य वाढावे व एकजूट झालेल्या जनतेच्या हातीं या चळवळीचीं सूत्रें जावीं, ही गोष्ट चिआङ् कायी शेकला पहिल्यापासूनच पसत नव्हती, म्हणूनच जनतेची सघटना करणाऱ्या व तिचें सामर्थ्य वाढविणाऱ्या चीनी कम्यूनिस्टावर गेलीं कित्येक वर्षें त्यानें हत्यार उपसलें होते. जपानविरोधी लढा लढवून त्याच्याकरता एकही होऊ. पण ही एकजूट वरून खाली आली पाहिजे. खालून वर जाता कामा नये. या लढ्याचीं सूत्रें वरच्या वर्गाच्या हातीं असलीं पाहिजेत, देशातील कामगार–शेतकऱ्याच्या हातीं तीं जाता कामा नयेत, असें चिआङ् कायी शेकचें मत होतें व नान्किङ् सरकारचीं सूत्रें त्याच्याच हातीं असल्यामुळें या बाबतीतले सरकारी धोरण तशाच प्रकारचें होतें आणि तें कडक रीतीने अमलात आणण्याची तो अत्यत दक्षता बाळगीत होता.

———

# चिआड काथी शेकची अटक व सुटका

**चिआङचे बेत**—सिआन फू (चीनची पश्चिम राजधानी) येथे या वेळी आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली होती. तरूण सेनानी चँङ सू लियाङ याच्या हुकमतीखालचे सैन्य या भागात ठाणें देऊन राहिलें होते. लाल बावटेवाल्याना चिरडून टाकण्याकरता चिआङ काथी शेकने हे सैन्य चीनच्या या ईशान्य भागात पाठविलें होते. या वेळीं या सैन्यात १३००० सैनिक होते. मॅन्च्यूरियातील या सैनिकाना आपला असा देश राहिलेला नव्हता. जपाननें मॅन्चुरिया ताब्यात घेतला त्यावेळीं आपल्या बायकामुलाचें किती अनन्वित हाल झाले याच्या आठवणीनें त्याचीं अतःकरणे तळमळत होतीं. आपसातील युद्धाला ते कटाळले होते व जपानविरोधाच्या बाबतीत नान्किङ्ग सरकारचे डळमळित धोरण पाहून ते सतापून गेले होते. या सैन्यातील सामान्य सैनिकाच्या मनातील या भावनाची जाणीव वरच्या अधिकाऱ्यानाही झाली होती.या सैन्याचा सेनानी चँङ सू लियाङ व चिआङ काथी शेक याच्यातील पूर्वीचे चागले सबध तुटत चालले होते. जपानविरोधी एकजुटीच्या अघाडींत सामील होऊन लालफौजेबरोबर सगनमत करण्याचे विचार त्याच्या मनात घोळू लागले होते. परकीयाच्या आक्रमणाला तोंड दिल्यानेंच—आपसातील युद्ध चालू ठेवून नव्हे—चीनमध्यें खरी एकजूट निर्माण होईल, असे त्याचें मत झालें होते आणि सरकार जर जनतेच्या या इच्छेकडे दुर्लक्ष करील तर ते टिकणार नाहीं, असेही प्रतिपादन तो करू लागला होता. मॅन्च्यूरियाच्या लष्करात बेदिली उत्पन्न झाली आहे, या सैन्याचे अधिकारीही बडखोर वृत्तीचे बनले आहेत, ही गोष्ट चिआङ काथी शेकच्या लक्षात पूर्णपणें आली होती.

पण सियानला पोचल्यावर चिआङ्च्या एक गोष्ट पक्की लक्षात आली होती व ती ही कीं, कम्युनिस्टाविरुद्ध चालविलेल्या युद्धात चँङ् सू लियाङच्या हाताखालील तुड पै लष्कर उपयोगी पडणार नाहीं. या नव्या

चढाईत तुङ पै लष्करातील अधिकाऱ्याचे मुळींच मन नाहीं, हे त्याला कळून चुकले होतें. चॅङ सू लियाङनें राष्ट्रीय आघाडीचा कार्यक्रम चिआङ कायी शेकपुढे सादर केला होता. पण चीनमधील एकूण एक लाल सैनिक नाहींसा झाल्याशिवाय व एकूण एक कम्यूनिस्ट तुरुगात घातल्याशिवाय या गोष्टी बोलावयाला आपण तयार नाहीं. जरुर पडल्यास याकरता वायव्य भागात वीस पथके आणून उभी करण्याचे चिआङनें ठरविलें होतें. उलट जपानविरूद्ध चढाई करण्याचा कम्यूनिस्टाचा खरा खरा विचार असेल तर त्याना मदत करणे जरूर आहे, असे तुङ पै लष्कराचा मुख्य सेनापति चॅङ सू लिआङ याचे मत होतें व तें त्याने चिआङ कायी शेकला मोठ्या कळकळीने कळाविले होतें. पण त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं. तुङ पै फौजेनें लाल फौजेला सामना देतच राहिले पाहिजे, असा त्याचा आग्रह होता. चॅङ सू लिआङने चिकाटी सोडली नाहीं. चिआङ कायी शेकला समक्ष भेटून आपलें म्हणणे त्याला पटवून देण्याकरता स्वतःच्या विमानातून तो लोयाङला आला. चिआङ कायी शेकची त्यानें मुलाखत घेतली. सिआनला पुढल्या खेपेस आपण येऊ त्यावेळीं आपल्या योजना व आपले डावपेच तुङ पैच्या सेनानायकाना सविस्तरपणे समजावून देऊ, असें या मुलाखतींत चिआङनें सांगितलें. पण चिआङचे या भागात पुन्हा आगमन होण्यापूर्वी दोन महत्वाच्या गोष्टी घडून आल्या व त्यामुळे ईशान्य व वायव्येकडील सरकारी फौजेंतील बेदिली अधिकच वाढली. त्यपैकीं पहिली गोष्ट ही कीं, कम्यूनिस्टविरोधाचें ढोंग करून चीनवरील आक्रमण सुलभ जाण्याकरता जर्मनी व जपान'यानीं आपसात सगनमत केलें व दुसरी गोष्ट म्हणजे इटलीने या जर्मन-जपान कराराला साथ दिली आणि त्याबरोबरच जपानच्या मॅन्च्यूरियामधील स्वारीलाही मान्यता दिली. ही गोष्ट ईशान्येकडील (तुङ पै) फौजेचा तरूण सेनापती चॅङ सू लिआङला मुळींच खपली नाहीं. चीनच्या या भागातील इटलीचे वाढत चाललेलें वजन नष्ट करण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. योग असा कीं, याच वर्षाच्या नोव्हेंबर मध्ये चीनी कम्यूनिस्टाचा निकाल लावण्याकरता चिआङनें आपली पहिली सरकारी फौज पाठविली. पण ही पहिली फौज लाल मुलखात शिरू

लागली तेव्हा लाल प्रचारकानीं तिच्यातच शिरून जपानविरोधाचें व संयुक्त अघाडीचें महत्व तिच्या सैनिकाना पटवून दिलें व " चीनी भाईने चीनी भाईशीं लढता कामा नये. " या घोषणेंतील रहस्यही त्याना समजावून दिलें. नान्किङ्च्या पहिल्या फौजेवर मात करण्यास या प्रचाराचा अत्यंत उपयोग झाला व जनरल हूने पीछेहटीचा हुकूम दिला त्यावेळीं सरकारी फौजेंतील एक सबंधच्या सबंध पलटण कम्यूनिस्टाना येऊन मिळाली. जनरल हूला झपाट्यानें मागें परतावें लागलें. आपल्या सर्वश्रेष्ठ फौजेचा असा धुव्वा उडालेला पाहून चिआङ कायी शेक संतापून गेला. गेलीं दहा वर्षे एका मागून एक मोहिमा काढूनही कांहीं उपयोग होत नाहीं, असें दिसल्या वर जपानशीं दोन हात करण्याची तयारी करण्याचें सोडून कम्यूनिस्टाचा नाश करण्याचा उद्योग आणखी अधिक निश्चयानें चालू ठेवण्याचें चिआङ कायी शेकनें ठरविलें व ७ डिसेंबर १९३६ रोजीं आपल्या प्रचंड विमानातून सियानच्या विमानतळावर तो दाखल झाला.

**चिआङकडे शिष्ट मंडळ**—चिआङ् कायी शेक सियानला आलेला पाहून चीनच्या ईशान्य व वायव्य भागातील फौजातील सेनानायकानीं एकजुटीने आपसातील युद्ध थांबविण्याबद्दल चिआङ् कायी शेकला विनंति करण्याचें ठरविलें. शेन्सी प्रांतातील सेनानायकाप्रमाणे इतर सरकारी अधिकारीही या मंडळींत सामील झाले होते. पण हे शिष्टमंडळ चिआङ कायी शेककडे येण्या-पूर्वींच या भागातील हजारो विद्यार्थ्यांनीं जपानविरोधी निदर्शनें केलीं व सर सेनापति चिआङ कायी शेकला आपला अर्ज सादर करण्याचें ठरवून त्याच्या मुक्कामाकडे ते मोर्चा घेऊन निघाले. शेन्सी प्रांताच्या गव्हर्नरानें या विद्या-र्थ्यांना परत जाण्याचा हुकूम दिला. विद्यार्थी हा हुकूम मानावयास तयार नाहींत, असें पाहिल्यावर पोलिसानीं व खुद्द चिआङ कायी शेकच्या संरक्षण दलातील सैनिकानीं विद्यार्थ्यांच्या जमावावर दंडे चालविले व एके ठिकाणीं गोळीबारही केला. गोळीबारात दोन विद्यार्थी जखमी झाले. तुङ पै फौजेतील एका सेनानायकाचेच हे मुलगे होते. चॅङ् सू लियाङ्नें मध्यस्थीं करून ही गडबड थांबविली. परत शहरात जाण्याबद्दल या विद्यार्थ्यांचें मन वळविलें व त्याचा अर्ज चिआङ शेकला स्वत नेऊन देण्याचें कबूल केलें. विद्या-

र्थ्यांचा अशा रीतीनें केवार घेतल्याबद्दल चिआङ् कायी शेकने उलट चॅङ सू लिआङलाच दोष दिला.

अखेर वायव्य व ईशान्य या दोन्ही भागातील सेनापतीची एकत्र भेट घेण्याचे चिआङ कायी शेकने नाकारले. त्याच्या निरनिराळया भेटी घेतल्या व त्याची एकजूट फोडण्याचा प्रयत्न केला त्यात त्याला यश आले नाहीं. हे सगळे सेनानी चिआङ कायी शेकला सर सेनापति म्हणून मानायला तयार होते पण सर्वांनी चीनी कम्यूनिस्टावर सुरू केलेल्या या नव्या मोहिमेबद्दल आपली नापसती दाखविली व सुई युआनच्या अघाडीवर जपानचा प्रतिकार करण्याकरता आपल्याला पाठविण्याबद्दल विनति केली. " कम्यूनिस्टाचा निकाल लावा. " हा एकच एक हुकूम चिआङनें या सर्वांना दिला.

चीनच्या वायव्य व ईशान्य भागातील फौजाच्या सेनानींनी चिआङ्ग कायी शेकच्या वरील धोरणाबद्दल नापसती दाखविली तरी त्यानें सर्व सरकारी फौजाच्या सेनानींची बैठक बोलाविली व कम्यूनिस्टावरील सहाव्या मोहिमेच्या योजना तींत आखण्यात आल्या. कान्सू व तुङ्ग कुआन येथील नाकिन्ड् सरकारच्या फौजा, त्याचप्रमाणें ईशान्य व वायव्य प्रातातील फौजा एकवट करण्याचे हुकूम त्याने सोडले. ईशान्य फौजेचा सेनापति चङ हे हूकूम मोडील तर नान्किङ्च्या फौजानीं त्याची फौज निःशस्त्र करावी व त्याला बडतर्फ करण्यात यावे, असे उघडपणें सागण्यात आले. त्याचप्रमाणें नीळया डगलेवाल्या चिआङच्या संरक्षक दलातील सैनिकानीं व पोलिसानीं कम्यूनिस्टाना सहानुभूति दाखविणाऱ्या लष्करी लोकाची यादी तयार केली असून सैन्याची जमवाजमव करण्याचे हुकूम सुटल्याबरोबर या यादीतील लोकाना अटक करण्यात येणार, अशा बातम्या चॅङ् व यॅङ् या दोन्ही ईशान्य व वायव्य फौजाच्या सेनापतींना मिळाल्या.

**आठ मागण्या**—याप्रमाणे चिआङ कायी शेकनें उलट आपल्या विरुद्धच हत्यार उपसलेलें पाहून चॅङ सू लियाङ्नें ईशान्य व वायव्य फौजातील सर्व पथकाच्या सेनानायकाची डिसेंबर ११ रोजीं १० वाजता सयुक्त सभा भरविली व या दोन्ही फौजातील दोन निवडक पलटणींनीं सिआन् फू च्या आसपास एकत्र जमून सर सेनापति चिआङ् कायी शेकला

व त्याच्या स्टाफमधल्या सर्व लोकाना अटक करण्यात यावी, असे गुप्त हुकूम सोडण्यात आले.

या बडखोर सेनापतींच्या या योजनेतील एक शब्दही बाहेर फुटला नाही. चिआडच्या लोकाना त्याची वार्ताही नव्हती आणि पुढे हा बेत इतका झटपट अमलात आला की, दुसरे दिवशीं सकाळीं ६ च्या आत ठरल्याप्रमाणें हें काम अगदीं बिनबोभाट उरकण्यात आलें. या दोन्ही फौजातील निवडक पलटणींनीं सियान आपल्या ताब्यात घेतले. नीळ्या डगलेवाल्याना ते झोपेंत असतानाच पकडण्यात आलें व त्यांचीं हत्यारे ताब्यात घेण्यात आलीं. चिआड कायी शेकच्या जनरल स्टाफच्या मुक्कामाच्या जागेला वेढा देऊन त्याना पकडण्यात आले. शेन्सी प्राताचा गव्हर्नर व तेथील मुख्य पोलिस अधिकारी या दोघाना अटक करण्यात आली. सियानच्या विमानतळावरील नान्किड सरकारची बॉम्बफेकी विमाने ताब्यात घेण्यात आलीं. त्याच्या वैमानिकाना पकडण्यात आलें. वायव्य फौजेच्या तरुण सेनापतीच्या शरीर सरक्षक दलाचा नायक सन मिड चिड याने भर मध्य रात्रीं चिआड कायी शेकच्या लिन् तुड येथील मुक्कामावर गुप्तपणे एकाएकीं हल्ला चढविला. तुड पै फौजेतील निवडक २०० सैनिक त्यानें आपल्याबरोबर घेतले होते. या हल्ल्यामुळे आश्चर्यचकित झालेल्या चिआडच्या शरीर सरक्षक दलातील सैनिकानी हा हल्ला परतविण्याचा प्रयत्न केला व याठिकाणीं एक लहानशी चकमकही उडाली. पण एवढया अवकाशात चिआडनें बाहेरची गडबड पाहून पलायन केलें. सन मिडने ताबडतोब चिआडच्या मुक्कामाच्या टेकडीला वेढा देऊन तिचा कोनाकोपरा शोधून काढला व या टेकडीच्या एका लहानशा गुहेत लपून बसलेल्या चिआड कायी शेकला गिरफतार केलें.

याप्रमाणें आपल्या मताला आग्रहाने चिकटून राहणारा चिआड कायी शेक यॅड व चॅड या दोन्ही सेनापतींचा पाहुणा झाला. चिआडला पकडल्यानतर तुड पै (ईशान्य) व सीपै (वायव्य) या दोन्ही सैन्याच्या पलटणींच्या सेनानायकानीं मध्यवर्ती सरकार, निरनिराळ्या प्रातातील पुढारी व चीनी जनता याना उद्देशून पुढील तार प्रसिद्ध केली. “सर सेनापतींना जागे

करण्याकरता सिआन फूमध्यें काहीं दिवस राहण्याबद्दल त्याना विनति करण्यात आली आहे त्याच्या सरक्षणाची आम्ही हमी घेतली आहे. या तारेबरोबरच सर सेनापति चिआङ कायी शेकला सादर केलेल्या राष्ट्रीय मुक्ततेसंबधाच्या पुढील प्रसिद्ध आठ मागण्याही सर्व राष्ट्रभर ब्रॉडकास्ट करण्यात आल्या. पण नान्किङ सरकारच्या सेन्सारने सर्व ठिकाणीं त्या दडपून टाकल्या.

१ नान्किङ सरकारची पुनर्घटना करण्यात यावी व राष्ट्रीय मुक्ततेच्या सयुक्त जबाबदारींत भाग घेण्याची सर्व पक्षाना मोकळीक द्यावी.

२ सर्व ठिकाणचे आपसातील युद्ध तावडतोब बद करण्यात यावे व जपानविरुद्ध सशस्त्र युद्ध चालविण्याचे धोरण स्वीकारण्यात यावें.

३ शाघायमधील राष्ट्रीय चळवळींतील सात पुढाऱ्याना बधमुक्त करण्यात यावे.

४ सर्व राजकीय कैद्याना माफी देण्यात यावी.

५ जनतेला एकत्र जमण्याचे स्वातत्र्य देण्यात यावे.

६ राजकीय स्वातत्र्याचे व राष्ट्रीय सघटना करण्याचे जनतेचें हक्क सुरक्षित राखावे

७ डॉ सन्यत्सेनच्या मृत्युपत्रातील कलमे अमलात आणावीं.

८ राष्ट्रीय–मुक्तता–परिषद तावडतोब भरविण्यात यावी.

चीनी लाल फौज, चीनी सोव्हिएट सरकार व चीनी कम्युनिस्ट पार्टीनें या कार्यक्रमाला पाठिंबा दिला. चॅड सू लिआङनें लगेच आपलें खास विमान चीनी सोव्हिएट सरकारच्या राजधानीला पाठवून कम्युनिस्ट लष्करी कौंसिलचा उपाध्यक्ष चाउ एन लाय, पूर्व अघाडीच्या फौजेचा प्रमुख ये चिन यिङ व वायव्य सोव्हिएट सरकारचा अध्यक्ष पो कू याना सियानला बोलावून घेतले. तुङ् पै, सी पै व लाल फौजेचे प्रतिनिधी याची सयुक्त बैठक भरविण्यात आली व या तीन्ही गटानीं उघडपणे दोस्तीचा करार केला. १४ डिसेंबर रोजीं १३०,००० तुङ् पैची फौज, ४०,००० सी पैची फौज व ९०,००० लाल फौज या तीन्ही मिळून २६०,००० सयुक्त जपान विरोध फौज सघटित करण्यात आल्याचे जाहीर करण्यात आले.

चिआङ्च्या अटकेची बातमी ऐकताच नान्किङ् दरबार आश्चर्याने

मुग्ध झालें. मध्यवर्ती कार्यकारी मडळाची बैठक नरविण्यात आली व ईशान्य फौजेचा सेनापति चँड सू लियाङ्ला कामावरून दूर करण्यात आले आहे, असा ठराव करण्यात आला. कुओमिन्ताङमधील डाव्या व उजव्या गटामधील खुटासारखा चिआङ कायी शेकचा उपयोग होत असे. तो स्वतः उजव्या गटाशीं सामील असला तरी अगदीं उघडपणे परकीय साम्राज्य-वाद्याशीं संगनमत करण्यास तो तयार नव्हता. जपानच्या बाबतींत वॅड चिङ्ग वीप्रमाणे सर्वस्वीं नमतें घेण्याच्या धोरणाविरुद्ध तो होता. पण त्याच्याच सेनापतींनीं त्याला पकडून ठेवल्यामुळे नान्किङ्ग दरबारातील जपानला व साम्राज्यवाद्याना अनुकुल असलेल्या गटाना मोकळें रान मिळाल्यासारखे वाटले. चिआङ्ला पकडून ठेवण्यात आले आहे, असे ऐकून काहीं जहाल वृत्तीच्या लोकाना आनदाचें भरतें आलें. जपानविरोधी लढा यापुढे अप्रतिहत चालविता येईल, आपसातील लढा पूर्णपणे थाबेल व सन्यत्सेनच्या तीन तत्वाची पूर्णपणें अमलबजावणी करता येईल, असेही कित्येकाना वाटलें. पण चिआङच्या अटकेच्या बातमीनतर नान्किङमध्ये निराळेंच कारस्थान शिजू लागलें. चिआङच्या गैरहजीरींत नान्किङची सत्ता कोणाच्या हाती असावी, असा विचार सुरू झाला. युद्धखात्याचा प्रधान हो यिङ चीन जपानला लागू होता. चिआङला पकडून ठेवणाऱ्या लोकाचें पारिपत्य करण्यास तो उतावीळ झाला होता. व्हापोआ लष्करी विद्यापीठा-तील जपानधार्जिण्या गटानें, नीळ्या डगलेवाल्यानीं, माजी प्रधान वॅड चिङ वीच्या गटानें व नान्किङमधील जर्मन व इटालियन लष्करी सल्ला-गारानीं सेनापति हो यिङ चिनला या कामीं पाठिंबा दिला. नान्किङ्वर सपूर्ण लष्करी ताबा जमविण्याची ही चागली सधी आहे, असे त्याना वाटलें. नान्किङ लष्कराच्या वीस पलटणी सेतापति होनें तावडतोब एकत्र आणल्या व होनान–शेन्सी प्राताच्या सरहद्दीकडे त्या रवाना केल्या. विमानाचे ताफेच्या ताफे त्याने सियानकडे पाठविले व बडखोराच्या पायदली पलटणीवर त्यानीं बॉब टाकले. त्याचप्रमाणें शेन्सी प्रातातील काहीं भागावरही या विमानानीं प्रयोगदाखल बॉब टाकले. चिआङ कायी शेकला जेव्हा या बॉब फेंकीच्या बातम्या समजल्या त्यावेळीं “ फारच छान् ” असें त्यानें आपल्या डायरींत

लिहून ठेवलें. पण मॅडाम चिआङ् कायी शेकला तिच्या पतीपेक्षाही परिस्थितीची अधिक चांगली कल्पना आलेली होती. मळ्याच्या वाळूवेवरील लोणी खाण्याच्या या तयारीकडे पाहून ती सतापून गेली होती सियानवर अशा प्रकारे बॉबफेक सुरू झाली व वायव्य भागात सेनापति होनें आपसातील युद्धाचा वणवा पेटविला तर चिआङ् कायी शेक सियानमधून जिवत बाहेर पडत नाहीं, असे नान्किङ्च्या लोकानाही वाटू लागलें. " असल्या छाप्यानीं आपला पति सुरक्षित राहील का, " असें सेनापति होला तिनें विचारलें असता त्याला त्याचे काहींच उत्तर देता आलें नाहीं. आपला पति जिवतपणीं बाहेर कसा येईल, याची तिला काळजी लागली होती. अशा परिस्थितींत हें प्रतिगामी युद्ध थांबविण्याकरता नान्किङ् व शांघायमधील राष्ट्रीय वृत्तीच्या लोकानीं पुढाकार घेतला. चीनच्या सेंट्रल बॅकेचा अध्यक्ष व चिआङचा मेहुणा टी. व्ही. सुङ, हगामी प्रधान एच. एच. कुङ, मॅडाम चिआङ कायी शेक व मॅडाम सन्यत्सेनसुद्धा या प्रतिगामी लोकाचें राष्ट्रघातकी युद्ध हाणून पाडण्याकरता चिआङच्या अनुयायाची एकजूट करण्याच्या प्रयत्नाला लागली. डॉ. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वाना न जुमानणारें, विशेषतः या लोकतत्वापैकीं तिसऱ्या समाजवादी तत्वाला धाब्यावर बसविणारे, चिआङ् कायी शेकचे धोरण मॅडाम सन्यत्सेनला मुळींच पसत नव्हते. उलट या तीन्ही लोकतत्वाना अमलात आणण्याचा मनापासून प्रयत्न करणाऱ्या चीनी कम्यूनिस्टाना बरबाद करू पाहणारे चिआङ्च धोरण पाहून तर त्याच्याबद्दल मॅडाम सन्यत्सेनला अत्यत तिटकारा वाटू लागला होता, असें असताही चिआङ् कायी शेकच्या सरक्षणाकरता ती धावली.

सेनापति होच्या विमानानीं सियानवर बॉबफेक केली त्यावेळीं चिआङला प्रथम थोडें बरें वाटलें हे खरें. पण या कम्यूनिस्टविरोधी युद्धामागे नान्किङमधील राष्ट्रीय सरकार उलथून पाडून आपल्यालाही उडवून लावण्याचा जपानी व जर्मन फॅसिस्टाचा डाव आहे, ही गोष्ट चिआङच्या लक्षात आली व आपले खरे शत्रू सियानमध्यें नसून ते नान्किङमध्येंच आहेत व आपल्या प्रेतावरून चालून जाऊन सेनापति हो किंवा दुसरे कोणी

तरी नान्किङमध्ये हुकूमशहा होऊ पहात आहे, याची त्याला खात्री वाटूं लागली.

**कम्युनिस्टांची ध्येयनिष्ठा**—चिआङ कायी शेकचे प्राण खरोखरच धोक्यात होतें का ? वर वर पाहता असें दिसत होतें. पण वस्तुस्थिति काय होती ? तरुण सेनापति चॅङ् सू लियाङ्ने त्याला अटक केली होती खरी. तथापि तो त्याच्या प्राणावर मुळींच उठला नव्हता व या बाबतींत चीनी कम्यूनिस्टाच भय बाळगण्याचे तर मुळींच कारण नव्हतें. चिआङ कायी शेक मारला जावा, हे त्याना प्रमत नव्हतें, उलट तो पूर्णपणे सुरक्षित राहावा, अशा खटपटींत ते होते. वायव्य प्रातातील नान्किङ् सरकारच्या फौजेचा सेनापति यॅग हू चेङ चिआङ्च्या प्राणावर उठला होता. चिआङ कायी शेक यॅङच्या हातीं लागला असता तर तो ठार मारला जाण्याचा संभव होता नैऋत्य व वायव्य फौजेंतील जहाल वृत्तीचे तरुण अधिकारी, या फौजेतील असतुष्ट बडखोर सैनिक व या भागातील सशस्त्र व सघटित जनता चिआङ् कायी शेकचा निकाल लावण्यात यावा, अशी मागणी करू लागली होती. या "राष्ट्रद्रोह्याची' व त्याच्या हाताखालच्या अधिकाऱ्याची उघड चौकशी करण्यात यावी, असा ठराव वरील तरुण अधिकाऱ्यानीं आपल्या सभेत केला होता. राष्ट्रीय यज्ञाच्या वेदिकेवर या बकऱ्याचा बळी देण्यात यावा, अशीच या फौजेतील सर्व सामान्य सैनिकाची इच्छा होती. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, चिआङ कायी शेकचे प्राण वाचवावे म्हणून या सर्व बिघडलेल्या जनतेचे मन वळविण्याचे काम चीनी कम्यूनिस्टाच्या वाट्यास आले होतें.

चिआङचे प्राण वाचावे, असे कम्युनिस्टाना का वाटत होतें, याचीं कारणें उघड होतीं. देशातील आपसातील युद्ध थाबलें पाहिजे, ही त्याची नेहमींचीच मागणी होती. आर्थिक, राजकीय व लष्करी दृष्ट्या देशात शातता प्रस्थापित झाली पाहिजे, असे त्याना मनापासून वाटत होते. चीनमध्ये सारखीं युद्धे चालू राहण्यात राष्ट्राचे हित नाहीं, ही युद्धे चालू राहिल्यास परकीय त्याचा पूर्ण फायदा घेतील व एक स्वतत्र राष्ट्र या नात्याने चीनचें अस्तित्वच नष्ट होईल, हें इतक्या दिवसाच्या अनुभवानें कम्युनिस्टाच्या

व्यवहारी दृष्टीला पूर्णपणे कळून चुकले होते. चिआङ्ला डाबून ठेवले किंवा त्याला ठार केले तर ही आपसातील युद्धें न थांबता उलट सारखीं वाढतच जातील, हें पूर्णपणे लक्षात घेऊनच चिआङच्या सुटकेच्या मागे ते लागले होते. आपसातील युद्ध चालू राहिल्याने प्रतिकाराची राष्ट्रीय शक्तीच केवळ नाहींशी होईल, असें नाहीं तर खुद्द क्रातीच्या अगीं असलेली बीजरूप शक्तीच नष्ट होईल याची पूर्ण जाणीव चिनी कम्युनिस्टाना झाली होती.

"चीनच्या राष्ट्रीय स्वातन्त्र्याच्या चळवळीचा विजय जागतिक कम्यूनिझमच्या विजयाचा अशभाक् होईल कारण चीनमधील साम्राज्यवादाचा पराभव म्हणजे त्याच्या अत्यत बळकट पायाभूत क्षेत्राचा नाश होय. स्वातंत्र्यसपादनाच्या कार्यात चीन वीजयी होईल तर जागतिक क्रातीच्या कार्याला अत्यत जोराची कलाटणी मिळेल. शत्रूने आमच्या राष्ट्राला गुलाम बनविले तर सर्वच काहीं आम्हीं गमावून बसू. जे लोक राष्ट्रीय स्वातन्त्र्य गमावून बसले आहेत त्याच्यापुढील क्रातीचे कार्य म्हणजे तावडतोब समाजवादाची प्रस्थापना करणे, हें नसून स्वातन्त्र्याकरता झगडा चालू ठेवणे हे आहे. ज्या देशात समाजवादाची प्रस्थापना करावयाची तो देशच आमच्या हातून परक्यानीं हिसकावून घेतल्यावर कम्यूनिझमची चर्चा करणेदेखील आम्हाला शक्य नाहीं." असे उद्गार माओ च तुङने अमेरिकन बातमीदार एडगर स्नोला दिलेल्या मुलाखतींत काढले होते. चिआङ कायी शेकला पकडण्यापूर्वीच चिनी कम्यूनिस्टानी वरील तत्वावर आपल्या तडजोडीच्या सूचना कुओमिन्ताङकडे पाठविल्या होत्या. चिआङ कायी शेकला अटक केल्यामुळे निर्माण झालेल्या आणीबाणीच्या परिस्थितीतही चीनी कम्यूनिस्ट पार्टीची शिस्त म्हणून या तत्वाला ते चिकटून राहिले. चिआङचा काटा काढण्याची उघड उघड सधी त्याना मिळाली असताही ते त्या मोहाला बळी पडले नाहींत. उलट चिआङ् कायी शेकच्या अटकेचा हा प्रसग म्हणजे राष्ट्रीय एकजूटीकरता आपल्या ठिकाणीं असलेल्या कळकळीची कसोटी लागण्याचाच प्रसग आहे, अशाच समजुतीनें ते वागले.

**चिआङची मुलाखत**—चिआङवर आलेल्या या प्रसगाची बातमी ऐकल्याबरोबर चीनमधील सोव्हिएट सरकारचे प्रतिनिधी व कम्यूनिस्ट पार्टीचे पुढारी याची सयुक्त बैठक घेण्यात आली व आठ कलमी कार्यक्रमाला पाठिंबा देण्याचा व जपान विरोधी सयुक्त मडळात भाग घेण्याचा निर्णय या बैठकींत घेण्यात आला व तशा तारा सर्वत्र पाठविण्यात आल्या.

या प्रसंगीं कम्यूनिस्टानीं स्वीकारलेलें धोरण स्पष्ट झाल्यामुळे सेनापति चॅग सू लियाडनेंही कम्यूनिस्टाच्या प्रतिनिधीला सियानला बोलावले. या सर्व प्रकरणात कम्यूनिस्टाचाच सल्ला तो पुढे घेऊ लागला हे लक्षात घेण्यासारखे आहे. कम्यूनिस्ट प्रतिनिधी चाउ एन लाय सियानला आल्याबरोबर चॅङ्ग सू लियाड व चाउ एन लाय यानीं चिआङ् कायी शेकची भेट घेतली. सर सेनापति चिआङच्या मनावर या भेटीचा काय परिणाम झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी ! मनाने व शरीराने चिआङ दुर्बल बनला होता. चाउ एन लाय त्याच्या खोलींत शिरल्याबरोबर-त्याचा चेहरा पाढरा फटफटीत झाला. ज्याला पकडून देण्याकरता चिआड कायी शेकने ८०,००० डॉलराचे बक्षीस जाहीर केले होतें तो चाउ एन लाय त्याच्या खोलींत आता शिरला होता. पण चॅङ सू लियाङ व चाउ एन लाय या दोघानीं त्याला सर सेनापतीच्या नावानें सबोधले, इतकेच नव्हे सर त्याच्या या दर्जाबद्दल आदरही दाखविला, हें पाहून चिआडला हायसें वाटले. आरभीं काहीं वेळ चिआङ त्याच्याशीं काहीं बोलला नाहीं. पण राष्ट्रावर आलेल्या आणीबाणीच्या प्रसगीं कम्यूनिस्टानीं स्वीकारलेलें धोरण त्यानें पूर्णपणे ऐकून घेतलें. डिसेंबर १७ पासून २५ पर्यंत चिआङ कायी शेक व चॅङ सू लियाड, वॅङ हू चेङ व कम्यूनिस्ट प्रतिनिधी याच्यात बऱ्याच चर्चा झाल्या. या चर्चेला आणखी तोंड फोडण्यासाठीं व बाहेरच्या जगाला चिआङ कायी शेकसबधाची वस्तुस्थिति कळविण्यासाठीं चॅङ सू लियाडनें चिआङ कायी शेकचा ऑस्ट्रेलियन मित्र मि. डोनाल्ड याला सियान येथें बोलावून घेतलें. सियान येथें चिआङ कायी शेक सुरक्षित व सुखात आहे, असे खात्रीपूर्वक सागण्याकरता चॅंड सू लियाडनें या परक्या माणसाची योजना केली होती. कारण उघड होते. कोणत्याही चीनी माणसानें यावेळीं काहींही सागितले असतें तरी त्याच्यावर

कोणीही विश्वास टेवला नसता. मि. डोनाल्डने लोयाड येथून ता. १५ डिसेंबर रोजीं चिआड कायी शेक जिवत आहे व त्याला चागल्या रीतीने वागविण्यात येत आहे, असें नान्किड दरबारला टेलीफोननें कळविलें. त्याचप्रमाणें चिआड कायी शेक आपल्या स्टाफमधील जनरल चिआड तिड वीन याजजवळ स्वतःच्या सहीचें पत्र देऊन नान्किडला पाठवीत आहे, असेंही कळविले. सर सेनापतीचे पत्र घेऊन जनरल चिआड तिड वीन १८ डिसेबर रोजीं नान्किडला पोंचला. जनरल हीने सुरू केलेली पारिपत्याची मोहीम बद करण्याबद्दल चिआडने आपल्या पत्रात स्पष्ट हुकूम दिला होता. नान्किडचे काहीं प्रतिनिधीही चिआड तिड वीनने सियानला घेऊन यावे, असे नाजूक कामही त्याच्याकडें दिले होते. यावेळेपर्यंत सियान येथील दोन्ही पक्षात वाटाघाटी होऊन काहीं सामान्य तत्वावर एकमत झाले होते.

**जनतेचा निकाल**—पण वायव्य प्रातिक फोजेतील जहाल तरुण अधिकाऱ्यानीं चालविलेल्या प्रचारामुळें सियानमध्यें एक नवीन परिस्थिति निर्माण झाली होती. आठ कलमी कार्यक्रम अमलात आणण्याची सुरुवात नान्किड् दरबारने केल्याशिवाय चिआड कायी शेकला मुक्त करण्यात येऊ नये. शिवाय यापैकीं बहुतेक सर्व अधिकाऱ्याचे म्हणणे असें होतें कीं, जनतेच्या प्रचड सभेपुढे उभे करून चिआड कायी शेकची चौकशी करण्यात यावी.

अशा परिस्थितींत या जहाल तरुण अधिकाऱ्याना राष्ट्रापुढे निर्माण झालेल्या आणीबाणीच्या परिस्थितीची जाणीव करून देण्याचे व चिआडच्या सुटकेबद्दल त्याचे मन वळविण्याचे काम कम्यूनिस्ट प्रतिनिधींनीं केले. पेकू ये, चीन यिड, चाऊ एन् लाय व इतर कम्यूनिस्ट प्रतिनिधींनीं या मडळीबरोबर चर्चा करण्यात रात्रीच्या रात्री घालविल्या व आपले धोरण त्याना समजावून देण्याचा प्रयत्न केला. कम्यूनिस्टाचे हे धोरण पाहून तुड पै फौजेतील जहाल मडळींचे मन अत्यत गोंधळून गेले. चिआडला कठस्नान घालावे, अशी कम्यूनिस्ट प्रथम मागणी करतील, ही त्याची कल्पना. राजकीय नेतृत्वाच्या बाबतींत कम्यूनिस्टावर विश्वास ठेवलेल्या या लोकाचा सताप अनावर झाला व आपला असा विश्वासघात झालेल

पाहून त्याच्या डोळयातून अश्रूंच्या धारा वाहिल्या. अखेर यापैकीं कांहीं भउळींची खात्री पटविता आली नाहीं तरी बऱ्याचशा लोकांनीं चिआङच्या जनता-चौकशीची व त्याच्या कत्तलीची आपली मागणी परत घेतली व चँङ सू लियाङ्ला तडजोडीची बोलणीं पुढे चालू ठेवण्यास वाट मोकळी करून दिली. सरकारी पक्षात व तुङ पै व कम्यूनिस्ट पक्षात यानंतर तडजोडीच्या वाटाघाटी झाल्या. आठ कलमी कार्यक्रम जसाचा तसा या सगळया वाटाघाटींत मान्य झाला नाहीं तरी त्यातील तत्व मान्य करण्यात आलें. चिआङ् काया शेक व चँङ सू लियाङ या दोघाचे याप्रमाणे मुख्य प्रश्नावर सहमत झालें. यापुढें आपसातील युद्ध चालू राहणार नाहीं, अशी चिआङनें वैयक्तिक खास हमी दिली. चिआङ कायी शेकनें या बाबतींत आपल्या सहीचा लेखी करार करून दिला नाहीं तरी चँङ सू लियाङने ज्या उद्देशाने चिआङ्ला पकडून ठेवले तो त्याचा उद्देश पूर्णपणे साध्य झाला, असे म्हणावयास मुळींच हरकत नाही २२डिसेंबर रोजीं मॅडाम चिआङ कायी शैक सियानला आली, त्यामुळे या वाटाघाटी गुण्या-गोविंदाने मिटण्याच्या कामीं मदतच झाली आणि अखेर अत्यंत आश्चर्याची गोष्ट म्हणजे स्वत: चँङ सू लियाङने आपल्या विमानात चिआङ पति-पत्नीला बसविले व तो नान्किङला दाखल झाला. नान्किङमध्यें आपली चौकशी होऊन आपल्याला शिक्षा मिळणार, ही गोष्ट चँङ सू लियाङला पक्की माहित होती तरी तो मुळींच डगमगला नाहीं.

३१ डिसेंबर १९३६ रोजीं चँङ् सू लियाङची खास न्याय मंडळापुढे चौकशी करण्यात आली. दहा वर्षांची कैदेची शिक्षा त्याला देण्यात आली. त्याचप्रमाणें पाच वर्षेपर्यंत त्याचे सर्व नागरिकत्वाचे हक्क काढून घेण्यात आले. पण लगेच दुसऱ्या दिवशीं त्याच्या सर्व अपराधाची क्षमा करण्यात आली. नान्किङमध्यें असेपर्यंत चिआङ्चा मेहुणा टी. व्ही. सुङ याचा तो पाहुणा होता. सियानमधील कम्यूनिस्टविरोधी मोहिमेचे मुख्य ठाणें ६ जानेवारी १९३७ रोजीं रद्द करण्यात आलें.

चीनी कम्यूनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती कार्यकारी मंडळाची सभा १० फेब्रुवारी रोजीं भरविण्यात आली व या मंडाळातर्फे नान्किङ सरकारला

पुढील ऐतिहासिक विद्युत्संदेश पाठविण्यात आला. आपसातील युद्ध बंद करावें, भाषण, मुद्रण व समास्वातंत्र्याची हमी देण्यात यावी, राजकीय कैद्याना सोडून द्यावे, जपानी आक्रमणाचा प्रतिकार करण्याकरता राष्ट्रीय योजना तयार करण्यात यावी, डॉ. सन्यत्सेनच्या तीन लोकतत्वाच्या अमलबजावणीसंबधानें विचार करण्यात यावा.

**चिआङचें इंगाम्री सर्वसंग्राहक धोरण**—कुओमिन्ताङच्या तिसऱ्या बैठकींत या सूचनाचा विचार करण्यात आला तेव्हा चीनी कम्यूनिस्टानीं अगदीं नवीन धोरणाने यापुढे आपल्या चळवळी चालवाव्या म्हणून पुढील चार अटी त्याना सुचविण्यात आल्या. ( १ ) लाल फौज मोडून टाकून राष्ट्रीय लष्करात तिचा समावेश करण्यात यावा. ( २ ) सोव्हिएट लोकसत्ताक राज्य बरखास्त करण्यात यावे. ( ३ ) कम्यूनिस्ट प्रचार बंद करण्यात यावा. (४) वर्गकलहाची चळवळ अजीबात बंद करण्यात यावी. कुओमिन्ताङ्च्या बैठकींत अशा प्रकारचें कम्यूनिस्टविरोधी धोरण पुरस्कृत करण्यात आलें तरी चिआङ कायी शेकने आपल्या समारोपाच्या भाषणात भाषणस्वातंत्र्याचें व मुद्रणस्वातंत्र्याचे वचन दिलें. पश्चाताप व्यक्त करतील त्या राजकीय कैद्याना मुक्त करण्यात येईल, असे सांगितलें व यापुढें चीनी कम्यूनिस्टाच्या बाबतीत "लाल डाकू" किंवा "कम्यूनिस्ट डाकू" या शब्दाचा उपयोग करण्यात येऊ नये, अशा सूचना फारच सावधगिरीनें सर्व वर्तमानपत्राना गुप्तपणे देण्यात आल्या. कुओमिन्ताङ्मधील सर्व पक्षाचे समाधान करण्याकरता व नान्किङ सरकारची इभ्रत राखण्याकरता चिआङ कायी शेकने वरील धोरण स्वीकारले होते, असें सहजच आढळून आलें कारण यानंतर आपसातील युद्ध अजीबात थांबविण्यात आलें जपानविरोधी लढा सुरू करण्याची नान्किङची तयारी असल्याचें जाहीर करण्यात आले.

# जपानविरोधी युद्ध

**जपानविरोधी सयुक्त अघाडी**—१९३७ जुलैच्या आरंभीं आपल्या लष्करातून नाहींसा झालेला एक जपानी सैनिक शोधून काढण्याचे निमित्त काढून जपानने लुकू चिआव येथील चीनी फौजेवर हल्ला चढविला. बाक्सर तहानुसार पेपिङमध्ये ठेवण्यात आलेल्या आपल्या सैन्याचा त्याने या कामीं उपयोग केला. याप्रमाणे जपानच्या आक्रमणाला पुन्हा सुरुवात झाल्या-बरोबर चिआङ्ग कायी शेकने सर्व राष्ट्राला उद्देशून पुढील जाहीर उद्गार काढले. " सहनशीलतेच्या शेवटच्या मर्यादेपर्यंत आपण पोंचलों आहो. आपणाला आता फक्त एकच गोष्ट केली पाहिजे शेवटचा निकाल लागेपर्यंत सर्व राष्ट्राचें बल आता खर्ची घातले पाहिजे. अखेर आपलाच विजय होणार असें मी विश्वासपूर्वक सागूं शकतो. "

चीनी कम्यूनिस्ट पार्टीच्या मध्यवर्ती कमिटीच्या मार्फतही १९३७ च्या सेप्टेंबरमध्ये एक जाहीर पत्रक प्रसिद्ध करण्यात आले. डॉ. सन्यत्सेनची तीन लोकतत्त्वे मूर्त स्वरूपात आणण्याकरता कम्यूनिस्ट पार्टी लढत राहील, लाल फौजेची आठव्या रूट फौजेमध्यें पुनर्घटना करण्यात येईल व राष्ट्रीय लष्करी कौंसिलच्या सूचनानुसार या फौजेच्या हालचाली होतील असेंही या पत्रकात जाहीर करण्यात आलें होतें. सियान प्रकरणाच्या वेळीं कुओमि-न्ताङ्गला कम्यूनिस्टांनीं सुचविलेल्या अटींनुसारच हे जाहीर पत्रक काढण्यात आले होते. यामुळें या पत्रकाला व पार्टीच्या स्वतंत्र अस्तित्वाला मान्यता देण्याचे कामीं चिआङ्ग कायी शेकनें मुळींच काकू केलें नाहीं. पण यापूर्वीच २८ जुलै रोजीं जपाननें पेकिंङवर हल्ला चढविला व दुसऱ्या दिवशीं तीन् चीनवरही जपाननें चढाई केली. त्यावेळीं तीन् चीनचें रक्षण करण्याकरता राष्ट्रीय सरकारच्या २९ व्या फौजेनें जपानला निकराचें तोंड दिले तरी जपानी लष्कराच्या सख्याबलापुढें त्याचें काहीं चाललें नाहीं. या महिन्याच्या अखे-रिला दोन्हीं शहरे जपानच्या हातीं लागलीं व जपानी फौजा ईशान्येकडे

पेकिंङ्-सुइयुवान रेलवेच्या रोखाने अंतर्मंगोलियाकडे व शान्सी प्रांताकडे आणि दक्षिणेस नान्किङ्कडे चाल करून जाऊं लागल्या. पण जपानविरोधी लढयाला आतां इतकें व्यापक स्वरूप येत चाललें होतें कीं, जपानव्याप्त पूर्व हुपे प्रांतांतील चिनी सैनिकांनीं बंडाचें निशाण उभारलें व आपल्यावरील जपानी अधिकाऱ्यांची त्यांनीं चादी उडविली. पेपिंङ्मध्ये विद्यार्थी व शेतकरी-सुद्धां चीनी सैनिकांच्या खांद्यास खांदा लावून लढले.

**जपानवरील पहिला विजय**—शांघाय येथे आक्टोबर मध्याच्या सुमारास चीनी सैनिकांनीं जपानबरोबर भयंकर रक्तपाताच्या चकमकी लढविल्या. पण शांघायमधील चोंपे भागांतूनही जेव्हां त्यांना हाकून लावण्यांत आलें, तेव्हां नोवेंबरच्या आरंभीं जपानने हँड चौ उपसागरांत एकाएकीं आपल्या फौजा उतरविल्या त्यामुळे आपण आतां चोहोंकडून वेढले जाणार, असें पाहून शांघाय सोडून चीनी सैनिक बाहेर पडले व भरपूर टॅंक, जड तोफा व इतर अशाच प्रकारची युद्धसामुग्री मागें असलेल्या जपानशीं चीनी सैनिक तीन महिने सारखे लढत राहून मानवी इतिहासांत आपलें नांव त्यांनीं अजरामर करून ठेवलें. शांघाय येथें झालेल्या या संग्रामांत चीनचे एक लाख व जपानचे चाळीस हजार सैनिक कामास आले.

जपानचा एक प्रसिद्ध सेनानी इटागाकी जपानी पांचव्या पलटणीसह शान्सी प्रांतांतील टेकड्या ओलांडून पीतनदाच्या प्रदेशावर चाल करून आला. पण आपल्या उद्दिष्ट स्थळीं पोंचण्यापूर्वीच कम्युनिस्टांच्या आठव्या रूट फौजेच्या तुकड्यांनी त्याला चोहोंकडून वेढलेलें पाहून तो आश्चर्यचकित झाला आठव्या रूट फौजेने खुद्द जपानी फौजेवर हल्ला न चढविता त्याला रसद पोंचविणाऱ्या असंरक्षित तुकड्यांवर हल्ला चढविला व ही रसद मारून काढली. रसद तुटल्यामुळें व बाहेरून मदत न मिळाल्यामुळें जपानी फौजेला सपशेल मार खावा लागला. चीननें जपानवर मिळविलेला हा पहिला विजय होता. अत्यंत महत्वाच्या प्रसंगीं त्यानें हा विजय संपादन केला होता. असावी तशी शस्त्रसामुग्री नाहीं व भरपुर अन्नवस्त्रही नाहीं, अशा परि-स्थितींत चीनी सैनिक केवळ युद्धकौशल्यानें व शौर्याने जपानी साम्राज्याच्या निवडक व उत्कृष्ट फौजेचा पराभव करू शकतात, हें पाहून केवळ

चीनी राष्ट्रालाच नव्हे तर सर्व जगाला आश्चर्य वाटले.

**जपानचें आक्रमण १९३७–३८**—पेपिङ व तिन् चीन कबजात असल्यामुळे चीनमध्यें आणखी पाय पसरायला जपानला सोयीचे स्थान मिळालें. शांघायची लढाई चालू असतानाच उत्तर चीनमधील रेल्वे व तिकडील मोक्याची शहरें ताब्यात घेण्याकरता जपानी पलटणी चालून गेल्या होत्या. शांघायचा पाडाव झाल्यावर व थोड्याच आठवड्यांनीं नान्किडही कबजात आल्यानतर जपानने या दोन्ही शहरातील आपले ठाणे मजबूत केलें व आपल्या आणखी कांहीं फौजा उत्तर दक्षिणेकडील आपल्या कबजात आलेल्या मुलखाची साखळी जुळविण्याकरता याङत्सी नदीच्या खोऱ्याकडे त्याने पाठविल्या चीनच्या उत्तर भागात गेलेल्या फौजा पेपिङ-सुइ युवान रेल्वेच्या भोवतालचा मुलुख काबीज करीत अतर्मंगोलियापर्यंत पोचल्या.

जपानी फौजेच्या दुसऱ्या एका भारदस्त पथकाने पेपिङ–हॅंकौ रेल्वेच्या बाजूने खाली सरकून शान्सी प्राताची राजधानी ताइ–युवान काबीज केली. या भागातून नतर एक मोठी भरारी मारून १९३८ च्या प्रारभीं जपानी फोजेनें पीत नद गाठला व शान्सी व शेन्सी प्राताच्या सरहद्दीवर ती दाखल झाली. या भागातील डोंगराळ मुलुखाचा फायदा घेऊन आठव्या रूट फोजेनें जपानी फौजेला त्राही भगवान करून सोडले. जपानी फौजेच्या मनुष्यबलाचा व इतर युद्धसामुग्रीचा नाश करण्याकरता आठव्या रूट फौजेनें शान्सी प्रातातीलही झटापटी सारख्या चालू ठेवल्या. जपानच्या सर्व प्रकारच्या युद्धसामुग्रीचा नाश करण्याचे कामी त्याचा जसा उपयोग झाला त्याचप्रमाणे जपानी सैनिकाना नामोहरम करण्याच्या कामींही त्याचा यापेक्षाही अधिक उपयोग झाला

**हॅंकौचा पाडाव**—तिसऱ्या जपानी पथकाने नान्किडच्या दक्षिण भागात शिरून १९३७ च्या डिसेंबरमध्यें शान्तुङ भागात प्रवेश केला पण चीनी फौजानीं मोठया शिताफीनें जपानी पलटणींना तोंड देऊन सूचौ शहराजवळील रेल्वे जक्शनवर त्याचा पुढचा चढाईचा मार्ग अडवून धरला. नान्किडचा पाडाव झाल्यानतर चीनी फौजेने मिळविलेल्या या विजयाने चीनमध्ये जपानी विरोधाच्या चळवळींत नवा जोम उत्पन्न केला व जपानी

बादशाही फौज कधींच पराभूत होत नाहीं, ही जपानी फौजेची घमेंड उतरविली. पण ही परिस्थिति फार वेळ टिकून राहिली नाहीं. जपानने सू चौ शहर पुन्हा आपल्या कबजात घेतलें व नान्किङकडील जपानी तुकड्यांशीं हात मिळवणी करून या सर्व फौजा लुधाई रेल्वेकडे चालून गेल्या.

यावेळीं या भागातील सर्व रेल्वेचे रस्ते जपानच्या ताब्यात आले होते. उत्तर चीनमधील प्रमुख शहरेही त्याच्या कबजात आलीं होतीं, परंतु पीतनद ओलांडून हॅंकौ शहर ताब्यात घेणे त्याला अशक्य झाले होते. तेव्हा पीत नदाच्या उगमस्थानाच्या दिशेने वर चालून जाऊन हॅंकौ गाठण्याचें त्याने ठरविले पीत नदाचा हा वरचा भाग अत्यंत अडचणीचा होता. चीनी फौजांनीं या ठिकाणा पावलोपावलीं जपानला अडविण्याचा प्रयत्न केला. जपानच्या प्रचंड सैन्यापुढे त्याचा टिकाव लागला नाहीं. चीनी फौजाना हळू हळू माघार घ्यावी लागली. उत्तर चीनमध्ये झालेल्या लढायातून मिळालेल्या अनुभवावरून पीत नदाच्या दोन्ही तीरावरील खेड्यातील जनतेला सशस्त्र करावे व त्यांना संघटित करून गनीमी काव्यानें जपानला तोंड द्यावें, असे चीनी कम्यूनिस्टांनीं सुचविलें. पण या सूचनकाडे लक्ष देण्यात आलें नाहीं. राष्ट्रीय सरकारच्या प्रत्यक्ष कवायती लष्करावर जपानला तोंड देण्याचा सर्व भार पडला जपानच्या अर्धाच लाख सैन्याला अडविण्याकरता नान्किङ सरकारचें दहा लाख सैन्य गुंतून राहिलें. जपानी फौजा अर्वाचीन सुधारलेल्या शस्त्रास्त्रांनीं युक्त होत्या. पीत नदाच्या पात्रातून वावरणाऱ्या गनबोटींच्या व क्रूझराच्या व आकाशातून भरारी मारणाऱ्या विमानाच्या संरक्षणाखाली या फौजा पुढें चाल करून जात होत्या. अखेर चार महिन्याच्या धुमश्चक्रीच्या लढायानंतर हॅंकौ शहर जपानच्या हातीं लागलें. इकडे याच दिवसात दक्षिण चीनमधील कॅन्टन बंदरावर आकस्मिक हल्ला करून जपानने ते बंदर आपल्या ताब्यात घेतले. जपानी फौजा हॉंडकॉंडजवळ येऊन आपला तळ टाकतील, अशी कल्पनाही चीनी फौजेला नव्हती. म्यूनिच करारावर आक्टोबरमध्ये सह्या करून चेंबरलेनचे सरकार निर्लज्जपणें झेकोस्लावाकियाचा विश्वासघात करतें तर हॉंङ्कॉंडच्या बाजूला येऊन जपानी फौजांच्या प्रतिकाराचे करावयाचे धाडस ब्रिटन काय म्हणून

करील ? जपानची ही कल्पना बरोबर ठरली. ही संधी साधून जपानी फौजा बिसच्या उपसागरातून वर चढल्या व थोड्याच दिवसात त्यांनी कॅन्टन शहर आपल्या ताब्यात घेतलें व 'हॉंग कॉंगच्या भोवतालचे सर्व सैन्य पाडाव केले. हॉंग कॉंगमध्यें व पुढे सिंगापूरमध्ये ब्रिटिशांना जे पराभव खावे लागले, त्याचा आरंभ यावेळेपासून झाला.

**दहा रणक्षेत्रें.**— १९३९ नंतर चीनमध्यें पुढील दहा रणक्षेत्रा-वर जपानशीं युद्ध चालू होते (१) चीनच्या अगदी उत्तरेस अंतर्मंगो लियातील सुइ युवान प्रांत (२) होपे (३) शान्तुङ्ग व कान्सू प्रांताचा उत्तर भाग (४) दक्षिण शान्सी, उत्तर होनान व दक्षिण होपेचा काहीं भाग (५) पीत नद व याङत्सी या दोन्ही नद्यांमधील प्रदेश (६) मध्य चीनचा दक्षिण भाग (७) हॅङचौ ते कॅंटन पर्यंतचा समुद्र किनारा (८) कॅंटन भोवतालच्या प्रदेशातील दक्षिण भाग (९) चीनचा अगदीं शेवटचा दक्षिण भाग (१०) १९४२ च्या प्रारंभीं ब्रम्हदेश जपानच्या कबजात आल्या नंतर नवीन उघडलेली बर्मा-युनानची अघाडी. या सर्व रणक्षेत्रांपैकीं शेव-टची अघाडी सोडून बाकीच्या सर्व रणक्षेत्रांवर १९३९ पासून १९४५ पर्यंत मध्यें खंड न पडता सारखी रणधुमाळी चालू होती.

होपे, शान्तुङ, उत्तर कियाङ्सी, शान्शी, चहार, होनान, वगैरे प्रांता-तील सहा रणक्षेत्रांवर लोकयुद्धाच्या तत्वावर उभारलेल्या कम्यूनिस्ट फौजेने कधीं समोरासमोर तोंड देऊन तर कधीं गनीमी काव्याने लढून जपानला बेजार करून सोडले. गनीमी सैनिकांनीं पेपिंगमध्ये अनेक वेळा गुप्त-पणें प्रवेश करून तेथील जापानी सैनिकांची कत्तल उडविली व युद्धसामुग्री लुटून नेली. रेल्वे रस्ते उखडून टाकणे, पूल उडवून देणे व रस्ते उखडून टाकून शत्रुसैन्याच्या हालचाली अशक्य करून सोडणें, रेल्वेगाड्यांवर आक-स्मात हल्ले चढवून त्यांतील माल पळविणें, रात्रीच्या मुक्कामावर नजर ठेवून शत्रुसैन्यावर गुप्त हल्ले चढवून त्यांची दाणादाण उडविणें, शत्रूला आपल्या प्रदेशात येऊ देऊन त्याला चोहोकडून वेढणे व त्याच्या फौजेची कापाकाप करणे या सर्व गनीमी युद्धाच्या प्रकाराचा सेनापति जू देच्या आठव्या फौजेंतील गनीमी तुकड्यातील सैनिकांनीं अवलंब केला. गनीमी सैनिकांच्या

आकस्मिक हल्ल्याचा व हालचालींचा एक मोठा परिणाम असा झाला कीं, उत्तर चीनमधील उद्योग धंदे ताब्यात घेऊन तेथील जनतेला पिळून घेण्याच्या जपानच्या सर्व योजना ढासळून पडल्या. शान्सीमधील आठव्या रूट फौजेने जपानी लष्कराला तेथील शहरामोंवतीं व रेल्वेवर कुचंबत ठेवलें. इकडील भागात वावरत असलेल्या गनीमी फौजांनीं जपानी लष्कराला ठिकठिकाणीं खडे चारले. चीनी प्रतिकाराचीं या भागातील ठाणीं उध्वस्त करण्याचे व तसेच पीतनद ओलांडून जाण्याचे जपानचे प्रयत्न हाणून पाडले.

**कम्यूनिस्टांचा कोंडमारा**—शान्सी प्रांतात कम्यूनिस्टांच्या आठव्या रूट फौजेनें केलेले हे पराक्रम पाहून चिआंग काय़ी शेकनें या फौजेला सर्व प्रकारची मदत करणें आवश्यक होते. पण तसें न करता उलट आठव्या फौजेच्या ठाण्याना व या भागातील कम्यूनिस्ट प्रदेशाला वेढा घालून तिला कोणत्याही प्रकारची युद्धसामुग्री मिळू न देण्याची चिआंग काय़ी शेकनें तजवीज केली सियानमध्ये चिआंग काय़ी शेक अटकेंत असताना व त्याच्या प्राणावर बेतली असताना कम्यूनिस्टांनीं राष्ट्रीय एकजुटीची अघाडी निर्माण करण्यात अडचण उत्पन्न होऊ नये म्हणून चीनमधील सर्व पक्षात ऐक्य घडवून ,आणण्याचा भगीरथ प्रयत्न केला व चिआंग काय़ी शेकचे प्राण वाचविले. पण या गोष्टीला दोन अडीच वर्षे लोटतात न लोटतात तोंच चिआंग काय़ी शेकनें पगडी फिरविली व कम्युनिस्टांशीं बेबनावाचें धोरण स्वीकारून त्याच्या जपानविरोधी प्रयत्नातही अडथळा आणण्यास सुरुवात केली.

पण चीनी कम्यूनिस्टांनीं या कोंडमाऱ्यालाही दाद दिली नाहीं. या कोंडमाऱ्यामुळें आठव्या रूट फौजेला युद्धसामुग्रीचा पुरवठा होत नव्हता, इतकेंच नव्हे तर औषधपाण्याचीही मदत त्याना मिळत नव्हती. पण या कोंडमाऱ्यातूनही वाट काढून चीनी सोव्हिएट मुलखातील जनता आपल्या जवळची असेल नसेल ती अन्नसामुग्री लाल सैनिकाना पुरवीत होती. आपल्या हातून होईल तेवढी औषधपाण्याची व्यवस्था त्यानीं केली होती. पाडाव केलेल्या जपानी सैनिकाच्या शस्त्रास्त्राचा ते उपयोग करीत

होते. चीनी गनीमी तुकड्याच्या आकस्मिक हल्लयामुळे जपानी तुकड्या आपल्या जवळचें सामान वाटेंत टाकून पळून जात. या सामुग्रीचाही त्याना उपयोग होत असे. याशिवाय लहान प्रमाणावर त्यानीं काढलेल्या दारूगोळयाच्या कारखान्यातून जरूर ती युद्धसामुग्री ते तयार करीत. कोडमाऱ्यात सापडलेल्या एका भागातील असल्या कारखान्यातून दरमहा ३०,००० हात बॉंब तयार होत असत. आठव्या रूट फौजेचे सैनिक याप्रमाणें जपानी सैन्याला यशस्वी रीतीनें तोंड देत होते

१९४२ मध्ये सबंध वर्षभर व त्यापूर्वीही कांहीं दिवस जपानने एकामागून एक केलेल्या स्वाऱ्या चीनी कम्यूनिस्टाच्या फौजानीं परतवून लावल्या. या प्रसंगीं झालेल्या तुफान लढायापैकीं एका लढाईत आठव्या रूट फौजेचा दुय्यम सेनापति चाऊ चुआन कामास आला. मार्च, एप्रिल, मे, जून, जुलै, आगष्ट या महिन्यात जपानने आपल्याजवळील सर्व बळ खर्ची घालून चीनी कम्यूनिस्टाना नामोहरम करण्याचा मोठ्या हिरीरीने प्रयत्न केला पण तितक्याच जोरानें आठव्या रूट फौजेने जपानचे हे सर्व भयकर हल्ले परतवून लावले. जपानी फौजा चीनी कम्यूनिस्टाना हाणून पाडण्याकरिता याप्रमाणे गुतून राहिल्यामुळें याचवेळीं पॅसिफिक महासागरामध्ये चालू असलेल्या जपानच्या लढाईला तोंड देणाऱ्या दोस्त राष्ट्राच्या सैन्यानाही अप्रत्यक्ष का होईना मदत मिळाली, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.

मध्य व उत्तर चीनमधील जपाननें उघडलेल्या अघाड्याचा चीनी कम्यूनिस्टानीं जसा समाचार घेतला त्याचप्रमाणे दक्षिण चीनमध्येही राष्ट्रीय सरकारच्या फौजानीं व त्याच्या गनीमी तुकड्यानीं जपानची कोठेंच डाळ शिजू दिली नाहीं. हॅड चौ ते कॅन्टनपर्यंत समुद्र किनाऱ्यावर जपानशीं चिनी सैन्याशीं ज्या चकमकी झडल्या त्यावेळीं चिनी कम्यूनिस्ट सेनानायकाच्या प्रेरणेनें आरमारी लढाईत जपानला बेजार करून टाकण्याकरता आरमारी गनीमी तुकड्याही सघटित करण्यात आल्या होत्या. गमीनी युद्धातील हा एक नवीन मोर्चा होता.

१९३७ आरभापासून १९४३ अखेरपर्यंत जवळ जवळ आठ वर्षे जपानी आक्रमणाला चीननें यशस्वीरीतीनें तोंड दिलें. जपानसारख्या बलाढ्य

राष्ट्राचा पराभव करावयाचा असल्यास चीनमधील सर्व पक्षांनी एकजूट होऊन सयुक्त अघाडी निर्माण केली पाहिजे, हे लोकयुद्ध चालविण्याकरता जनतेची स्वयप्रेरणेनें पुढें आलेली फौज निर्माण केली पाहिजे आणि सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे जपानशीं समोरासमोर न लढता गनीमी धोरणानें हे युद्ध चालविलें पाहिजे, ही सेनापति जू देसारख्या कम्यूनिस्ट सेनानायकांनीं ठरविलेली योजनाच शेवटीं फलप्रद ठरली. सेनापति जू देनें गमीनी धोरणाचा पुरस्कार करून सर्व युद्धशास्त्रातच क्रांति घडवून आणलीं. कारण आशियातील एका सेनापतीने प्रचलित केलेले हें धोरण जर्मनीचा प्रतिकार करताना पूर्व युरोपातील राष्ट्रांनींही स्वीकारले. या धोरणाचा स्वीकार केला नसता व त्याबरोबरच जनतेची फौज तयार केली नसती तर मध्य व उत्तर चीनमध्यें जपानचें लाखो सैन्य त्याच्याजवळच्या प्रचड युद्धसामुग्रीसह कुचंबत ठेवता आले नसते व शेवटीं त्याचा पराभवही करता आला नसता. सर्व जगाला थक्क करून सोडणाऱ्या चीनी क्रातिकारकाच्या या अजब कामगिरीचे श्रेय बहुतांशाने सेनापति जू देलाच दिले पाहिजे.

सेनापति जदे एका श्रीमत जमीनदाराचा मुलगा, तरुणपणीं तो लष्करात शिरला. आपल्या वयाच्या चाळीसाव्या वर्षी तो कम्यूनिस्ट बनला. सर्वस्वाचा त्याग करून क्रातिकार्याला त्यानें वाहून घेतले. कम्यूनिस्ट पार्टीत सामील होण्या पूर्वीच तो सरकारी लष्करात शिरला होता. कम्यूनिस्ट झाल्यामुळे तेथे मतभेद झाल्याबरोबर आपल्याबरोबरच्या ८०० सैनिकासह तो बाहेर पडला. या तुकडीच्या आधारावर त्यानें लाल फौज निर्माण केली व आठ वर्षांत या८०० सैनिकापासून ८००,००० सैनिकापर्यंत लाल फौजेची सख्या त्याने वाढविली. युद्धशास्त्रात त्यानें क्राति घडवून आणली. आपले शिक्षक सरकारी लष्करातही पाठवून त्यातील सैनिकानाही गनीमी हालचालींचें व धोरणाचें शिक्षण दिलें आणि हें धोरण स्वीकारल्यामुळेंच आठव्या लाल फौजेने व नान्किङ् सरकारच्या फौजेनेंही १९४२ सालीं जपानच्या चीनमध्ये शिरलेल्या ५००,००० फौजेला यशस्वीरीतीने तोंड दिलें.

**बाहेरच्या मदतीचा दुरुपयोग**—जपानची एवढी प्रचड सेना चीनमध्यें गुतवून ठेवल्यामुळें पॅसिफिक महासागरात सुरू असलेल्या दोस्त-

राष्ट्रे व जपान यांच्यामधील युद्धाच्या कामीं दोस्त राष्ट्रांला मदत झाली खरी पण १९४३ सालीं चीनी फौजाना यापेक्षा जास्त काहीं करता आलें नाहीं. याचीं दोन कारणें होतीं. पहिलें हें कीं, नान्किङच्या निम्म्यावर फौजा कम्यूनिस्ट मुलखाला वेढा घालून बसण्यात गुतल्या होत्या. दुसरें असें कीं, जी काय थोडी मदत दोस्त राष्ट्रांकडून विशेषतः अमेरिकेकडून मिळाली तिचा उपयोग योग्यप्रकारें झाला नाहीं. अमेरिकेकडून कुओमिन्ताङला मिळालेली मदत जपानविरोधी युद्धात खर्च न होता ती दुसरीच कोठे तरी गडप होत होती. उदाहरणार्थ वैद्यकीय स्टोअरपैकीं बराचसा माल काळया बाजारात विकला जात होता. फौजेंतील हजारो सैनिक केवळ वेळेवर वैद्यकीय मदत व औषधपाणी न मिळाल्यामुळे मृत्युमुखीं पडत होते कुन मिङ, चुङ किङ व चेङ टूच्या शहरातील दुकाने ब्रिटिश अमेरिकन सरकारकडून आलेल्या औषधानीं भरून राहिलीं होतीं. सरकारी अधिकाऱ्यापैकीं एका प्रमुख अधिकाऱ्याने तर परदेशाकडून मदत म्हणून आलेल्या इतर अनेक प्रकारच्या मालाची काळया बाजारात विक्री करून गडगच पैसा मिळविला. अवघ्या एक वर्षात तो कोट्याधीश झाला. शितावरून भाताची परीक्षा.

**सोव्हिएट युनियनची मदत**—स्वतःकरता अत्यंत जरूर असताही सोव्हिएट रशिया चीनकरता युद्धसामुग्री बाजूला काढून ती उत्तरेकडील मार्गानें चीनमध्यें पाठवून देत होता. सोव्हिएट रशियावर जर्मनीने स्वारी करण्यापूर्वीसुद्धा चीनला तो मदत करीत होता. ७५,००,००,००० रुबल कर्जही सोव्हिएट रशियाने दिले होते. वैमानिक दलाच्या बाबतींत चीनची स्थिति समाधानकारक नव्हती. यूनानमध्ये एक विमानाचा कारखाना होता पण त्याच्यावरील मालकी बहुतेक अमेरिकन भाडवलवाल्याच्या हातीं होती. या कारखान्यात काही जुजबी माल तयार होत असे. एन्जिनें, चाके, पखे वगैरे बहुतेक मुख्य सामुग्री अमेरिकेतून येत असे व ती जोडण्याचें कामच फक्त या सर्व कारखान्यातून करण्यात येई. मुक्तद्वारच्या धोरणाची चपराक ब्रिटनने अमेरिकेला लगावली त्यावेळीं हा कारखानाही बंद करण्यात आला. दरमहा वीस विमानें या कारखान्यात तयार होत होतीं. सिंकियाङच्या हद्दीवरही असाच दुसरा एक कारखाना

होता. याची बहुतेक सर्व व्यवस्था रशियन तज्ज्ञाकडे होती. येनानमधील एक विमान शाळा अमेरिकन शिक्षकाकडून चालविली जात होती. वायव्य भागात तर आणखी अशा किती तरी शाळा होत्या व त्यावरील सर्व शिक्षक रशियन होते. पण हॅंकौच्या लढाईनंतर चीनी वैमानिकांची संख्या चांगलीच घटली. अगदीं थोडे बोटावर मोजण्याइतके वैमानिक राहिले. पण वैमानिक युद्धाच्या दृष्टीने त्यांचा कांहीं उपयोग नव्हता.

वैमानिक दलाच्या बाबतींतील या मदतीशिवाय सर्व चीनी फौजांत मिळून ५०० रशियाचे लष्करी सल्लागार होते. या लोकांच्या देखरेखीखालीं लष्करी अधिकारी शिकवून तयार करण्याच्या शाळा काढण्यात आल्या होत्या व त्यांतून ९०,००० वर लष्करी उमेदवार शिक्षण घेत होते. या सल्लागाराचा फायदा लाल फौजांच्या सेनापतींनीं करून घेतला. लढाईचे यांत्रिक शिक्षण लाल फौजेंतील उमेदवारांनीं घेतलेच. पण याशिवाय लढाईचें तंत्र व धोरण वेळोवेळीं कसें ठेवावें हेंहि त्यांनीं या सल्लागारापासून शिकून घेतलें.

१९४३ च्या हिवाळ्यात चीनमधील बहुतेक सर्व मोठीं शहरे व चीनी किनाऱ्यावरील मोक्याची ठाणीं जपानच्या ताब्यात होतीं. चेकियांङ, फुकीन, क्वांङ तुङ, कियांङसी, अन हुई, कियांङसू, होनान, शातुङ, होपे, शान्सी या सर्व प्रांतांतून जपानने घुसविलेला हात कायम राहिला. लाल फौजांनीं व सरकारी फौजांनीं जे काय केलें ते हेच की, त्यांनीं या अवकाशांत बचावाचें धोरण स्वीकारून जपानच्या हातांचीं बोटे मिटू दिलीं नाहींत व त्याची या दहा प्रांताच्या विस्तृत प्रदेशावर पसरलेली सैन्यें एकत्र येऊं दिलीं नाहींत. चीनमध्ये आपले कोणी भयंकर शत्रू असतील तर लाल सैनिकच आहेत ही गोष्ट जपाननेंही कबूल केली होती. उत्तर चीनमधील सर्व अघाड्या कम्यूनिस्टांनीं यशस्वीरीतीनें संभाळल्या होत्या व या भागांत पुढे सरसावण्यास जपानला वाव ठेवला नव्हता. एक दिलानें व एक धोरणानें लाल फौजा व सरकारी फौजा एकजूट होऊन लढल्या असत्या तर जपानची कंबक्ति होण्यास वेळ लागला नसता. पण लाल फौजांच्या सेनापतींना जवळ करण्यास चिआङ्‌ कायी शेक केव्हांही तयार नव्हता. उलट भरपूर युद्धसामुग्री नसल्यामुळे जपानला आपण यशस्वीरीतीने तोंड देऊं शकत नाहीं व प्रचंड तटबंदीपासून

ते दक्षिण समुद्रापर्यंत पसरलेल्या अघाडीवर आपल्याला माघार घ्यावी लागत आहे, असा प्रचार करून सर्व जगाला त्यानें झुलवीत ठेवले होतें. चीनी कम्यूनिस्टांनीं व्यापलेल्या व मुक्त केलेल्या प्रदेशात चढाई करून जाण्याची जपानची छाती नव्हती. पण कुओमिन्ताङ–चीनच्या बाबतीत तशी स्थिति नव्हती. चीनी सरकारी फौजेची ताकद जपानने पूर्णपणे ओळखली होती. वर सांगितल्याप्रमाणे चीनच्या दक्षिणेकडच्या प्रांतातील बराचसा भाग त्याने आपल्या कबजात आणला होता. सर्व चीनी बंदरे व वाहतुकीच्या सर्व मोक्याच्या जागा त्यानें आपल्या कबजात ठेवल्या होत्या व फारसें लष्करी बल खर्ची न घालताच त्याला हे सर्व साधले होतें.

**महत्वाची मुलाखत**—कुओमिन्ताङच्या प्रतिगामी धोरणामुळें व चुङ किङमधील हुकुमशाही कारभारामुळे चीनी–जपानी युद्धात अशाप्रकारची परिस्थिति निर्माण झाली होती. चुङकिङच्या या प्रतिगामी व हुकुमशाही कारभाराची नीट कल्पना येण्यास मॅडम सन्यत्सेननें मि. स्टुअर्ट गिल्डर-न्यूज क्रॉनिकलचा वार्ताहर–याच्याबरोबर झालेल्या मुलाखतींत काढलेले पुढील उद्गार उद्बोधक आहेतः—

“ जपानबरोबर चालू असलेल्या ऐन युद्धाच्या प्रसंगीं इतर चीनी सैनिकाना, केवळ ते कम्युनिस्ट आहेत म्हणून युद्धसामुग्री पोंचू न देण्याकरिता आपले श्रेष्ट दर्जाचे पाच लाख सैन्य अडकवून ठेवतें त्या सरकारला काय म्हणावे, तेंच समजत नाहीं. कम्यूनिस्ट असले तरी ते चीनी नाहींत का ? आपल्या सामान्य शत्रूशीं शौर्याने त्यांनीं लढाई चालू ठेवलेली नाहीं का ? अर्थात् त्यांनीं ती चालू ठेवली आहे. प्रत्येकाला ही गोष्ट माहीत आहे माझ्या नवऱ्याने ही गोष्ट जाणली असती व सरकारी राज्यकारभारात महत्वाचा हिस्सा देऊन त्यांच्याशीं सहकार्य केलें असतें. येथील सगळ्या प्रगतिशील वृत्तीच्या लोकांचें हेच मत आहे आणि तेच समजसपणाचे व योग्य मत आहे. हे सत्य जगाला कळणें महत्वाचेही आहे कारण त्यामुळे आपसातील युद्धाला उत्तेजन तरी मिळणार नाहीं. जगाच्या मताविरुद्ध ते सुरू करण्याची प्रतिगामी लोकाना छाती तरी होणार नाहीं. तुम्हाला जें जें आढळून येईल ते तें खरें खरे बाहेर सागून इतकें तरी तुम्हीं करू

शकाल. प्रतिगामी व स्वार्थी लोकांविरुद्ध प्रगमनशील लोकांचा झगडा जगात सर्वत्र चालू आहे. चीनमध्ये हा झगडा तीव्रपणे चालू आहे. चीन म्हणजे स्पेनची एक मोठ्या प्रमाणावरची आवृत्ति होईल. पण ती तशी होऊ देता कामा नये."

कम्यूनिस्टांबरोबर गुण्यागोविंदाने तडजोड घडवून आणण्याकरता कुओमिन्तांडचें मन वळविण्याच्या बाबतींत डॉ. सन्यत्सेनचा मुलगा डॉ. सन फो यालाही बरेंच श्रेय दिलें पाहिजे. त्याची सावत्र आई मॅडम सन्यत्सेन इच्छाप्रमाणे कम्यूनिस्ट पार्टीशीं डॉ. सन फोचादेखील काहीं संबंध नाहीं. पण घटनाबद्ध सरकारमध्ये कम्यूनिस्टांना भाग घेऊ द्यावा, असें डॉ. सन फोचे म्हणणें आहे. चिआड काय शेकबरोबर झालेल्या खासगी भेटींतून त्याने आपलें हें मत जोराने प्रतिपादिलें आहे. कुओमिन्तांडमधील प्रतिगामी गटाविरुद्ध त्याने अनेक लेख लिहिले आहेत व भाषणेंही केलीं आहेत. चिनी लोकशाहीचा जनक डॉ. सन्यत्सेनचा मुलगा व कुओमिन्तांड सरकारच्या कायदेमंडळाचा अध्यक्ष या नात्याने चिनी जनतेवर त्याचें वजनही आहे. संमिश्र सरकार स्थापून त्यांत कम्यूनिस्ट घेण्यात आले तर भिऊन जाण्याचें काहींच कारण नाहीं. उलट माउ च तुड, सेनापति जू दे व त्यांचे साथीदार यांचा सल्ला घेता आल्यास जपानविरोधी लढ्यातील आपलें सामर्थ्य अधिकच वाढेल. आमच्यातील फुटीचे फारच वाईट परिणाम झाले आहेत, केवळ राजकीय मतभेदामुळे कम्यूनिस्टांना आपण पाठिंबा देऊ नये, हें अत्यंत गैर आहे. किती झालें तरी ते चीनी आहेत व आपल्या सामान्य शत्रूबरोबर तेही लढत आहेत ....येनानचे बडवाले ( चिनी कम्यूनिस्ट ) सोव्हिएट रशियाला चीन विकून टाकणार आहेत, या कुओमिन्तांडच्या प्रचारात काहींच अर्थ नाहीं. सोव्हिएट रशियाची मला मुळींच भीति वाटत नाहीं. चीनवर चढाई करण्याचा रशियाचा हेतू आहे, या म्हणण्याला काहींच आधार नाहीं. मास्को येथें असताना स्टालिनशीं माझें या बाबतींत बोलणें झालें. त्यावेळीं चीनमध्ये आपल्याला मुलुखगिरी करावयाची नाहीं व त्यावर चढाई करून जाण्याचा तर आपला मुळींच हेतू नाहीं, असें स्वतः स्टालिननें मला निश्चित आश्वासन दिलें.

मंगोलियाच्या स्वातंत्र्याच्या चळवळीला आपण उलट मदत करू, असेंही त्याने अभिवचन दिलें. स्टालिनने अगदीं व्यवहार्य तेच सांगितलें. चीनमधील एकाद्या प्रांताबद्दल त्यांनीं काय म्हणून जबाबदारी घ्यावी. रशियनांच्या कर्तबगारीबद्दल माझ्या वडिलांना आदर वाटत होता. त्यांची राज्य पद्धति चीनला लागू करण्यांत यावी, असें त्यांना वाटत नव्हतें पण त्यामुळे रशियनांसंबंधानें त्यांना भिती वाटत नव्हती किंवा त्यांच्यासंबंधानें अविश्वासही वाटत नव्हता. उलटपक्षीं त्यांचा आपल्याला पाठिंबा मिळावा म्हणून ते खटपट करीत होते. चीनी कम्यूनिस्टांना जपानी युद्ध सुरू झाल्यापासून रशियाकडून कधींच मदत मिळाली नाही.

मॅडम सन्यत्सेन व डॉ. सनफ़ो यांच्या मतावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात. ( १ ) सर सेनापति चिआङ कायी शेक लोकशाही तत्वावर सर्व पक्षांचें समिश्र सरकार बनविण्यास तयार नव्हता. ( २ ) जपानविरोधी युद्धांत हार खावी लागली तरी हरकत नाहीं पण कम्यूनिस्टांचा कोंडमारा करून त्यांचा नाश करण्यास तो तयार झाला होता.

---

# अंतर्गत सुधारणा

चीनमधील यादवीला १९२८ साली सुरुवात झाली तेव्हापासून दुसरें महायुद्ध सुरू झालें तोपर्यंतच्या दहा वर्षांत उभय पक्षात घनचक्कर युद्धे झाली. आत्मसंरक्षणाकरता व जपानविरोधी अघाडी खंबीर करण्याकरता चीनी कम्युनिस्टांनीं सहा हजार मैलाची पल्लेदार दौड मारली. दक्षिण चीन-मधून वायव्य चीनमध्ये जाऊन त्याठिकाणीं त्यांनीं आपलीं ठाणीं मजबूत केलीं, महायुद्धाच्या काळात जपानला यशस्वीरितीनें तोंड दिलें. पण अशा प्रकारच्या या आणीबाणीच्या कालातही चीनच्या अंतर्गत आर्थिक, औद्योगिक, सामाजिक सुधारणाकडे चीनी जनतेने दुर्लक्ष केलें नाहीं, तर या बिकट परिस्थितींतून-ही आपला मार्ग काढला. चिनी जनतेच्या स्वभावातलि हा विशेष आहे.

**औद्योगीकरणाचा प्रयत्न**—दुप्पट सभासदत्व व तिप्पट उत्पादन हें सहकारी तत्वावर चाललेल्या चीनी उद्योगधंद्याचें या वेळचें घोषवाक्य होतें. देशाचे अर्वाचीन व मोठ्या प्रमाणावर औद्योगीकरण करावयाचे असल्यास अवाढव्य भांडवल लागते. भरपूर कच्चा माल लागतो. कुशल कामगारांची जरूरी असते. सुधारलेली यंत्र सामुग्री पाहिजे. हुशार यंत्र शास्त्रज्ञ पाहिजेत शास्त्रीय संशोधनाकरिता सर्व उपकरणांनीं युक्त असलेली लॅबोरेटरी पाहिजे आणि या सर्व साधनांचा उपयोग करता येईल, अशी चोख दळण वळणाचीं साधनेंही पाहिजेत. पण या बाबतींत चीन तर नेहमीच मागासलेला होता. जे काहीं रस्ते चीनमध्यें होते त्यापैकीं बहुतेक सर्वांवर जपाननें आपला कबजा जमविला होता. १९४० चीच गोष्ट घेतली तर फक्त ८०० मैल रेल्वे चीनच्या ताब्यात होती. देशात लहान मोठ्या कारखान्यांना सुरुवात करण्यात आली त्याप्रमाणे नवीन नवीन रस्ते बांधायलाही चीनमध्यें सुरुवात झाली. चुङ-किङ ते सिकियाङपर्यंतचा ३००० मैलाचा व चुङकिङ लॅशिओपर्यंतचा १६० मैलाचा बर्मारोड हे रस्ते बांधण्याकरता, अर्थात् त्यावरील लहान मोठे पूल, बोगदे तयार करण्याकरता लागणारी एंजिनीयरिंगची अर्वाचीन

यंत्र सामुग्रीही त्याच्याजवळ नव्हती. असलीं कामें चीनी कामगारांनीं हातानीं केली. "हा रस्ता पर्वताच्या बगला नखानीं ओरबाडूनच जणू काय त्यानीं तयार केला आहे" असे एका अमेरिकन वार्ताहराने म्हटले आहे. कुदळी, फावडी हीच काय ती लोकाच्या जवळचीं हत्यारे, रस्ते दाबण्याकरिता लोखडी रूळही नव्हते टेकड्यावरच्या प्रचड शिळातून त्यानीं दगडी रूळ कोरून काढले व रस्ता दाबून व साफ करून घेतला. वर सांगितल्याप्रमाणे १६०० मैलाचा बर्मारोड व ३००० मैलाचा चुडकिङ सिकियाङचा वायव्य चीनमधील रस्ता हे दोन्ही रस्ते तयार होण्यास थोडे जास्त महिने लागले खरे, पण चीनी कामगार पुरुषानीं व स्त्रियानींही कितीही हाल सोसावे लागले तरी त्याची पर्वा न करता सयपणानें ते तयार केले. बाहेरच्या जगाशीं दळण वळणाचे सबध ठेवण्यासाठीं ऐन युद्धाच्या दिवसातही आणखी कित्येक रस्त बाधण्यास सुरुवात करण्यात आली. दक्षिण चीनमधून उत्तर हिंदुस्थानात येणारे यांपैकीं दोन रस्ते होते. खुद्द दक्षिण चीनमध्येंही शेकडों मैलाचे रस्ते तयार करण्यात आले. १९४२ च्या पहिल्या चार महिन्यापर्यंत नवीन सुरू करण्यात आलेल्या रस्त्यापैकीं तीन पचमांश रस्ते तयार झाले तेव्हा सोव्हिएट यूनियनच्या सरहद्दीला जाणून भिडणारे आणखी नवे रस्ते बाधण्याचे काम त्यानीं हातात घेतलें. बाहेरच्या देशाशीं दळण वळणाचें सबध जोडणे हा या औद्योगीकरणाच्या योजनेपैकींच एक लहा नसा भाग होता. अतःप्रदेशातील रस्ते बाधणेंही तितकेच महत्वाचें होते. १९३७ ते १९४१ पर्यंतच्या चार वर्षात ४०० मैलाची रेल्वे बाधून पुरी करण्यात आली, रेल्वेची आखणी व पुनर्रचना करताना जपानी आक्रमणाला अडथळा उत्पन्न करण्याकरता लुघाई भागातील रेल्वे उडवून टाकण्यात आली आणि अंग्रेय व कान्सू भागात एक नवीन रेल्वे बांधण्यात आली. त्याचप्रमाणे चागशापासून कुई चौ प्रातातील दळणवळणास सोयीस्कार असा आणखी एक रेल्वे रस्ता बाधून तो पुरा करण्यात आला. रेल्वे तयार करण्याकरता लागणारी सामुग्री न मिळाल्यामुळें या कामाला अडथळा आला, त्याचप्रमाणें जपाननें ब्रम्हदेश काबीज केल्यामुळेंही युनान–बर्मा रेल्वेचें कामही पुरें करता आलें नाहीं.

रेल्वेचे रस्ते तयार करण्याच्या कामापेक्षा साधे रस्ते तयार करण्याचें काम अर्थात्‌च सोपे गेलें. झेच्युआन, यूनान, होनान, क्वाङसी, सिकियाङ, अतर्मगोलिया, शेन्सी, तिबेट, सियान या सर्व भागाना जोडणारे हजारो मैल लांबींचे रस्ते या कालातच झाले. चीनमधील जलमार्ग तर प्रसिद्धच आहेत. पीतनद व याङत्सी या दोन नद्यामधील जलमार्ग वाढविण्यात आले नद्याची पात्रे काहीं ठिकाणीं खोल करण्यात आलीं व काहीं रुद करण्यात आलीं. काहीं ठिकाणीं पात्रानीं व्यापलेला प्रदेश नदीच्या वेगाला आळा घालण्याकरता व महापूराचा जोर कमी करण्याकरता सकुचित व सोयीस्कर करण्यात आला. अर्वाचीन यत्रसामुग्रीचा उपयोग करून मोटार बोटीही तयार करण्यात आल्या.

१९४१ च्या मध्यापर्यंत एकदर १५०० मैल रेल्वे, २५,००० मैल मोटारी जाऊ शकतील असे राजरस्ते आणि ५००० मैलाचे जलमार्ग तयार करण्यात आले होते. त्यानतरच्या कालात तर या उद्योगाला अधिकच उत्तेजन देण्यात आलें. पेट्रोलच्या अभावामुळे व आवश्यक अवजाराच्या अभावामुळेही विमानी एजिनें तयार करणे चीनला तितकेसे शक्य झाले नाहीं. चीनचा या बाबतींतील मागासलेपणा कायम राहिला व जपानविरोधी लढा चालविण्याच्या कामीं यामुळे अडथळाही आला.

युद्धकालातील गुप्ततेमुळे उद्योगधद्याच्या बाबतींतील आकडे जरी प्रसिद्ध झाले नाहींत तरी सरकारी कागदपत्रावरून एक गोष्ट स्पष्ट दिसून आली कीं, १९३७ मध्ये चीनमध्ये कोळसा, लोखड, ताबे, पेट्रोल, कारखान्यात लागणारी दारु व सूत वगैरे मालाचे जे उत्पादन होते त्याच्या दीडपटीने १९४१ मध्यें उत्पादन झाले आणि हें उत्पादन यापुढे सारखें वाढतच गेलें. १९४१-४२ मध्यें एक मोठा फरक करण्यात आला. लोखड वितळण्याची पुर्वीची पद्धति सोडून अर्ध्या टनापासून दहा टन लोखड वितळविता येईल, अशा भट्ट्याचा उपयोग करण्यात आला. १९३७ मध्यें झेच्युआन प्रातातच प्रथम लोखडी कारखान्याचें केंद्रीकरण करण्यात आलें होतें. पण १९४१ नतर चीनमध्ये सर्वत्रच या धद्याला वाव देण्यात आला. या चार वर्षांत विद्युच्छक्तीच्या उत्पादनालाही उत्तेजन देण्यात आलें व स्वतत्र चीनमध्ये अशीं बारा शक्तिकेंद्रे निर्माण करण्यात आलीं. कोळ-

गाच्या खाणीच्या धंद्यालाही या कालात उत्तेजन देण्यात आलें. १९३७ मध्यें ७४५ तर १९४१ मध्ये त्याची संख्या १६२९ पर्यंत वाढली. त्याच-प्रमाणें लोखंडाच्या खाणींचीही संख्या ४५ वरून ११२ पर्यंत गेली. या-पैकीं काहीं खाणी लहान होत्या व अठराव्या शतकातील जुन्या पद्धतीनें त्यातील काम करण्यात येत होतें. कोठेंही अडून राहायचे नाहीं, जी साधन-सामुग्री हातीं लागेल तिच्या साहाय्यानें आपला उद्योगीकरणाचा लढा पुढें चालू ठेवण्याचा चंगच जणू चीनी जनतेनें यावेळीं बांधलेला होता.

शेन्सी-कान्सू निंडशियाच्या कम्यूनिस्टांच्या खास प्रांतातून व चीनच्या उत्तर सरहद्दीच्या प्रांतातूनही औद्योगीकरणाचा हा लढा जोराने चालू होता. चीनच्या इतर भागातून जी यंत्र सामुग्री मिळत होती तितकीही यंत्रसामुग्री या प्रांतातून मिळत नव्हती. कम्यूनिस्टांनीं कियांडसी प्रांतातून ६००० मैलांच्या पल्लेदार दौडीवर निघताना तेथील मौल्यवान् व अत्यावश्यक अशी यंत्र-सामुग्री आपल्याबरोबर घेतली होती. या यंत्रसामुग्रीच्या आधारावरच या प्रांतातील औद्योगीकरणाला त्यांनीं सुरुवात केली. थोड्याच दिवसात बाहेरच्या देशातूनही त्यांनीं उपकरण सामुग्री मिळविली. या प्रांतातील खाणी खोद-ण्याचीं व लोखंड गाळण्याचीं कामें जुन्या व गावढळ पद्धतीने चालली होती तरी १९४२ च्या सुमारास या कारखान्यांचे उत्पादन झपाट्यानें वाढत चाललें होते. हे मोठे कारखानेही या भागात सहकारी तत्वावर चालविण्यात येत होते व वेळोवेळीं निरनिराळ्या जिल्ह्यातील या धंद्यात प्रवीण असलेल्या अधिकाऱ्यांच्या सभा घेऊन धंद्याच्या वाढीसंबंधानें युद्धकालाच्या अडचणीच्या परिस्थितींतही कोणते उपाय अमलात आणावे, यासंबंधानें योजना तयार करण्यात येत होत्या.

जपानी फौजेच्या पिछाडीच्या प्रदेशात ठिकठिकाणीं युद्धसामुग्री तयार करण्याचे लहान व केव्हाही व कोठेही हलविता येतील, असे कारखाने कम्यू-निस्टांच्या गनीमी सैनिकांनीं चालविले होते. हातबॉंब, रायफली व यांत्रिक तोफांची दुरुस्ती, कापड, बॅंडेजेस, तयार करणें वगैरे कामे या कारखान्यातून होत असत. विशेष हे कीं, या छोट्या कारखान्यातून शेतीच्या अर्वाचीन यांत्रिक आउताची दुरुस्ती करण्यात येत होती. कारण शत्रूशीं लढत अस-

ताना लाल सैनिक व त्याचे गनीमी साथीदार आळीपाळीने शेतीचीं कामेंही करीत असत. युद्धपूर्व कालात परदेशातून आयात होणाऱ्या तेलावर चीनला अवलबून राहावे लागत होतें. युद्धानतर ही आयात अर्थातच मोठ्या प्रमाणावर बद झाली. बर्मारोडच्या मार्गानें केवळ मोटारींचा व विमान बांधणीला लागणाऱ्या सामुग्रीचा पुरवठा होत होता, असे नाहीं तर त्याला लागणारे तेलही त्याच मार्गानें येत होतें. पण हा मार्ग बद झाल्यावर सर्वच आटपलें. या परिस्थितींत कान्सू, झेच्यूआन व शेन्सी प्रातातील तेलाच्या खाणींतून मोठ्या प्रमाणावर तेल काढण्याच्या योजना तयार करण्यात आल्या. जितका व्हावा तेवढा पुरवठा या खाणींतून होत नाहीं, असे पाहून कान्सू प्रातात नव्या यत्रसामुग्रीची योजना करण्यात आली. त्याचप्रमाणें भुइमुग वगैरे तेलधान्यातून यत्रे चालविण्यास लागणारीं तेले निर्माण करण्याचेही प्रयत्न करण्यात आले. सिंकियाङ प्रातात १९४१ पासून भरपूर केरोसीन काढण्यात येऊ लागलें व या प्रातातील कोळशाचा व लोखडाचा पुरवठाही झपाट्याने वाढला. झेच्यूआन, सिकियाङ्, यूनान, कुई चौ या प्रातातून अपार खनिज सपत्तीचा शोध लावण्यात आला आहे पण रेल्वेच्या व अर्वाचीन यत्रसामुग्रीच्या अभावामुळे या सपत्तीचें उत्खनन वाढावें तसें वाढलेलें नाहीं

**चिनी औद्योगिक सहकारी संस्था** — प्रचड प्रमाणावर औद्योगीकरण करावयास लागणारी प्रचड यत्रसामुग्री नसल्यामुळें चीननें सहाजिकच छोटे कारखाने व हात धदे सुरू केले. चीनी कम्यूनिस्टानीं जनतेची फौज निर्माण केली, गनीमी काव्याचा अवलब करून युद्धशास्त्रात क्राति घडवून आणली त्याचप्रमाणे सहकारी तत्वावर खेड्यापाड्यातून सर्व प्रकारचे धदे सुरू करून देशाच्या औद्योगीकरणातही क्राति घडवून आणली. चीनमधील औद्योगिक सहकारी सस्थेचें आदोलन हे अर्वाचीन उद्योग युगातील एक मोठें धाडसच आहे. अभिनदनीय गोष्ट ही कीं, या बाबतींतही चीनी कम्यूनिस्टानीं व त्याचेंच अनुकरण करून स्वतत्र चीनमधील इतर चीनी कारखानदारानीं अपूर्व यश मिळविलें. कियाङ्सी व वायव्य प्रातात या कामाला चीनी कम्यूनिस्टानीं प्रथम उत्तेजन दिलें, मोठ्या प्रमाणावर मालाचें उत्पादन केल व लाल फौजेच्या व सरकारी फौजेच्या सैनिकाना लागणारा दारूगोळा

इतर जरूरीच्या जिनसा पुरविल्या. सोव्हिएट चीन व स्वतंत्र चीनमध्ये सर्वत्र पसरलेल्या या सहकारी संस्था शुद्ध लोकशाही तत्वावर चालविण्यात आल्या होत्या.

१९३८ मध्यें प्रथम सहकारी संस्थाची ही कल्पना निघाली त्यावेळीं स्वतंत्र चीनमध्यें अवघ्या ५९ सहकारी संस्था होत्या व त्याचे ११४९सभासद होते. १९४१ च्या डिसेंबर मध्यें याची संख्या अनुक्रमें १७०० व २३००० होती तर १९४२ च्या मार्चमध्ये अवघ्या चार महिन्यात २००० वर या संस्था वाढल्या व त्याच्या सभासदाची संख्या ३०,००० वर गेली. या सभासदाशिवाय सहकारी संस्थातून किती तरी उमेदवार कामें करीत होते व दरमहा २००,००० पौंड किमतीच्या मालाचें उत्पादन करीत होते. या संस्थातून पुरुषाप्रमाणें हजारों स्त्रिया व मुलेंहि कामे करीत होतीं. सूत कातणें, कापड विणणें, शिवणें, बॅंडेज तयार करणें, कातडे कमावणे, बूट तयार करणें, वगैरे कामें या संस्थामार्फत होत असत इतकेंच नव्हे तर शेतीचीं आउतेंही तयार करण्याचें काम या संस्थामार्फत होत होतें. आणखी एक महत्वाची गोष्ट ही कीं, कांहीं ठिकाणीं कोळशाच्या व लोखंडाच्या खाणीमधील कामही सहकारी तत्वावर करून घेण्यात येत होतें. सहकारी तत्वावर चालविलेल्या या विविध धंद्यात लागणारी यंत्रसामुग्री हलकी व इकडून तिकडे वाहून नेण्यास सोयीची सुलभ असल्यामुळें शत्रू-सैन्याच्या पिछाडीच्या प्रदेशात व गनीमी सैन्याच्या युद्धक्षेत्रात हे उद्योगधंदे चालू राहात व त्यामुळें त्याना " गनीमी उद्योगधंदे " असेंही नाव मिळालें होतें.

चीनी कम्यूनिस्टानीं लाल फौजेतील सैनिकात राजकीय प्रचार करून जपान विरोधी लढ्याचें महत्व त्यांच्या मनावर बिंबविलें होतें त्याचप्रमाणें सहकारी संस्थातील कामगार स्त्री–पुरुषाच्या मनातही या लढ्यातील राष्ट्रीय कर्तव्याची जाणीव उत्पन्न केली होती. साक्षरता प्रसार, वाचनालयें, आरोग्य-रक्षण, माल विक्रीचीं दुकाने, मालाची वाहतुक, मालाची योग्य वाटणी हीं सर्व कामें राष्ट्रीय कर्तव्याच्या जाणिवेनें सामुदायिक हितरक्षणाच्या तत्वावर केलीं जात होतीं. यामुळें हातीं असेल तेवढ्या भांडवलात व हातीं लागतील

त्या साधनाचा उपयोग कसोशीनें करून चीनच्या सर्व प्रकारच्या औद्योगिक उत्पादनात हे सर्व कामगार स्त्री-पुरुष भर टाकीत होते व औद्योगिक-दृष्ट्या अभिनव चीनची निर्मिती करीत होते.

**नवजीवन आंदोलन**—अभिनव चीनच्या निर्मितीला चीनमधील जीं आंदोलनें कारणीभूत झालीं त्यात नवजीवन आंदोलनाचा उल्लेख केला पाहिजे. १९३४ मध्ये किआङसी प्रांतात नवजीवन आंदोलनाला सुरवात झाली. पुढील तीन वर्षात ही चळवळ सर्व देशभर इतकी फोफावली कीं, जपाननें १९३७ सालीं चीनवर आक्रमण केले त्यावेळीं देशाच्या काना-कोपऱ्यातून या आंदोलनच्या शाखा प्रस्थापित करण्यात आल्या होत्या. १९३७ च्या उन्हाळ्यात लुशान येथें देशातील सर्व केंद्राच्या ३०० सेक्रेटरींची परिषद झाली व या आंदोलनाचा देशव्यापी कार्यक्रम मुक्रर करण्यात आला. या कार्यक्रमानुसार देशातील २००० जिल्ह्यापैकी १४०० जिल्ह्यामधून या आंदोलनाच्या शाखा प्रस्थापित करण्यात आल्या व नवजीवन सेवादलात ४००,००० स्वयंसेवकाची नोंद करण्यात आली.

जपानविरोधी युद्ध सुरू झाल्यानंतर देशातील इतर पुष्कळ संस्थानीं नवजीवनशीं सहकार्य केले "युद्धक्षेत्र सेवादल" "जखमी सैनिक संघ," "जखमी सैनिक मित्र" वगैरे अनेक नवीन संस्था नवजीवनतर्फे काढण्यात आल्या. "जखमी सैनिक मित्र" या संस्थेंत कॉलेजच्या विद्या-र्थ्यांनीं व विद्यार्थिनींनींही भाग घेतला. वैमानिक दलातील सैनिकाची खाण्यापिण्याची व्यवस्था करण्याकरता नवजीवनतर्फे देशातील ठिकठिकाणच्या विमान तळाशेजारीं ४६ हॉटेलें उघडण्यात आलीं. जपानविरोधी प्रचारा-करता नवजीवनतर्फे फिरत्या मोटारी ठेवण्यात आल्या. या प्रचार-गाड्यानीं सात महिन्यात ८००० मैलाचा प्रवास केला. खेड्यापाड्यातील जनतेला जपानविरोधी लढ्याचें महत्व समजून देण्याकरता शैक्षणिक चित्रपट दाखविले. या गाड्याबरोबर असलेल्या ५००० वर लोकाना कॉलराप्रतिबंधक इनॉक्यूलेशनें केलीं, ५२ ठिकाणीं फर्स्ट एडचे शिक्षण देणारे वर्ग उघडले व ३१००० लोकाना प्राथमिक उपाय कसे करावे, हें शिकविले. नवजीवनच्या पांचव्या वर्षदिनानिमित्त जपानविरोधी युद्धास मदत देण्याकरता फंड

उभारण्यात आला. अवघ्या १५ दिवसात नवजीवनच्या ठिकठिकाणच्या प्रचारकार्नी १६,०२,६८,४३२ डॉलर जमा केले. या फड गोळा करणाऱ्या प्रचारकापैकीं केवळ स्त्री-प्रचारकार्नी ६००,००,००० डॉलर जमा केले. चुङ्-किंडवर जपानचे आसुरी बॉब हल्ले झालेल्या वेळीं जखमी झालेल्या व निराश्रित झालेल्या ६२,६८५ लोकाना वैद्यकीय व इतर मदत करण्यात आली. विशेष हें कीं, नवजीवनमधील स्त्रीसल्लागार मडळानें निराश्रित झालेल्या लोकाकरिता चुडकिंडपासून ५० मैलाच्या अतरावर अनेक खेडीं वसविलीं. बॉबहल्ल्याच्या या दिवसात नागरिकाना थोडक्या पैशात अन्न पुरविणारीं केंद्रें स्त्रीशाखातर्फे उघडण्यात आलीं. या दिवसात ज्याला जेथें जे मिळल तें खाऊन राहावें, अशी परिस्थिति निर्माण झाली होती. या जेवणाला " गनीमी जेवण ! " असें नावही या दिवसात रूढ झाले होतें. या परिस्थितींतून वाचविण्याकरता ठिकठिकाणी स्वस्त व माफक दरात जेवण मिळणारीं भोजनालयें उघडण्यात आलीं, पण त्याबरोबरच " व्हिटाकेक " नावाचे अन्नपदार्थ बनविण्यात आले. हे अन्नपदार्थ " हवाईहल्ला रेशन " या नावानें लोकप्रिय झाले होते. बॉबहल्ल्यापासून स्वतःचें रक्षण करण्याकरता नागरिकाना तासन्तास खदकातून दडून बसून राहावें लागत होतें. अशा वेळी नवजीवनाच्या स्त्रीशाखेतर्फे तयार केलेल्या या अन्नपदार्थांचा फार उपयोग झाला. सोयाबीनपासून बनविलेले दूध व कणिक यापासून हें अन्न पदार्थ तयार केले जात असत.

युद्धकालात खर्चाची बचत व्हावी, या उद्देशानें नवजीवनतर्फे सामुदायिक लग्न समारंभाची ' योजना तयार करण्यात आली. फक्त वीस रुपयात आपले लग्न उरकून घेण्याची तजवीज करण्यात आल्यामुळें चीनी वरवधूना ही योजना अर्थात्च आवडली. लग्नाचे कर्ज नातवडे झालीं तरी तसेंच कायम असायचे. असल्या कर्जातून चीनी शेतकऱ्याची या योजनेमुळे सुटका झाली. या योजनेप्रमाणें १० ते १००पर्यंत जोडप्याचीं एके वेळीं लग्नें करण्यात येत व समारभाला साजेल, अशी सर्व साधनसामुग्री नवजीवनतर्फे पुरविण्यात येई. गावातील शिष्टमडळी समारभास आनदानें हजर राहात व वधूवराना आशीर्वाद देत.

जपानविरोधी लढा एकीकडे जोरात चालू होता. चीनमधील मोठमोठ्या शहरांवर विशेषतः चुङ्किङ्वर जपानी बॉंब वर्षाव होत होता तरी चीनी लोकाची खेळाडू वृत्ति मावळलेली नव्हती. चीनमध्यें पूर्वीच ठिकठिकाणीं व्यायामशाळा प्रस्थापित झाल्या होत्याच पण त्याचे आपसातील खेळाचे सामनेही या कालात चालू होते. या बाबतींतही नवजीवन आंदोलनतर्फे ठिकठिकाणीं संघटना करण्याचें कार्य चालू होतें. नौका चालविणें व पोहणें हे चीनी लोकाचे विशेषत दक्षिण व मध्य चीनमधील तरुण स्त्रीपुरुषाचे आवडते खेळ असून ऐन युद्धाच्या गर्दीतही या खेळाच्या सामन्याची व्यवस्था नवजीवनतर्फे करण्यात येई. बॉंब हल्लयामुळें डगमगून जाण्याचें किंवा नामोहरम होण्याचें मुळीच कारण नाहीं, अशी शूर वृत्ति समाजात नवजीवननें हे सामने चालू ठेवून कायम ठेवली होती.

चीनवर कबजा करतांना चीनी कम्युनिस्टाचा नायनाट करण्याचा जपानचा जसा इरादा होता त्याचप्रमाणे नवजीवनतर्फे चालू असलेल्या आंदोलनाचाही निकाल लावण्याचा जपानचा हेतु होता. पण जपानला या दोन्ही गोष्टी शक्य झाल्या नाहींत.

**चीनी महिलांची कामगिरी**—अभिनव चीनच्या निर्मितीचा इतिहास चिनी महिलाच्या कामगिरीची हकीकत दिल्याशिवाय पूरा व्हावयाचा नाहीं. १९११ च्या चीनी राज्यक्रांतीमुळें चीनी समाज खालपासून वरपर्यंत हदरून गेला. डॉ. सन्यत्सेनच्या राष्ट्रीय क्रांतीनें चीनमध्ये राज्यक्रांति घडवून आणली त्याचप्रमाणे समाजक्रांतीही घडवून आणली. या क्रांतीच्या प्रचाराचा परिणाम चीनी महिलाच्या मनावरही झाल्याशिवाय राहिला नाहीं. राष्ट्रीय जागृति करण्याच्या कामीं चीनी तरुणानीं विशेषतः परदेशातून शिक्षण घेऊन आलेल्या चीनी तरुणानीं जोरानें भाग घेतला व खेड्यापड्यापर्यंत क्रांतीचें लोण पोंचविलें. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, या बाबतींत चिनी तरुणी मुळींच मागे पडल्या नाहींत. त्यानींही या प्रचारात भाग घेतला व चीनी स्त्रीसमाजात क्रांतीचें नवजीवन निर्माण केले. सामाजिक व आर्थिक बाबतींतही पुरुषाच्या बरोबरीनें काम करण्याचा आपला हक्क आहे, याची जाणीव त्यानीं चीनी महिलाना करून दिली. जपान-

विरोधी युद्ध सुरू झाल्यानंतर तर स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीला जोराची चालना मिळाली. देशाभिमानानें प्रेरित होऊन युद्धाच्या या दिवसांत चीनी महिलांनीं अपूर्व धाडसाचीं कामें केलीं व युद्धविषयक अनेकविध चळवळींत भाग घेऊन आपल्या ठिकाणीं वसत असलेल्या गुप्त शक्तींची प्रतीति आणून दिली. या कालांत पुरुषांच्या बरोबरीनें कामें करण्याची त्यांना भरपूर संधी मिळाली व स्वतःच्या हिंमतीवर संघटितरीतीनें अनेक जबाबदारीचीं कामें बजावून स्वातंत्र्याचा व समानतेचा आपला हक्क त्यांनीं प्रस्थापित केला. सरकारी कारभारांत यापूर्वी चीनी स्त्रियांचा मुळींच प्रवेश होत नव्हता. जपानविरोधी युद्धानें त्यांना ही संधी आणून दिली व या कारभारालाही आपण लायक आहों, असें त्यांनीं सिद्ध करून दाखविलें. चीनच्या राजकीय लोकसभेंत देशांतील सर्व पक्षांचे पुढारी घेण्यांत आले त्याप्रमाणे स्त्रीवर्गातर्फेंही या संस्थेंत स्त्रीप्रतिनिधी घेण्यांत आले. वर्तमानपत्रांच्या व्यवसायांतही चीनी महिला मागे पडल्या नाहींत. युद्धापूर्वी ‘ स्त्रीजीवन ’ व “ स्त्रियांचा आवाज ” अशीं दोनच मासिकें चीनमध्यें निघत होतीं. पण युद्धाच्या कालांत स्त्रियांचीं द्विसाप्ताहिकें, साप्ताहिकें व मासिकें मिळून ५० वर नियतकालिकें चीनमध्ये प्रसिद्ध होऊं लागलीं. युद्धाच्या आरंभीं राष्ट्रीय धोरणावर चाल-णाऱ्या फारच थोड्या स्त्रीसंस्था चीनमध्ये होत्या. पण जपानविरोधी युद्धाला सुरुवात झाल्याबरोबर देशाच्या प्रत्येक भागांत अनेक संस्था काढण्यांत आल्या. देशांत सर्वत्र निघालेल्या या संस्थांतून एकसूत्रीपणा निर्माण करण्या-करतां व त्यांच्यांतील सहकार्य वाढविण्याकरतां १९३८ मेमध्यें कुलिंग येथें चीनी महिला परिषद् बोलावण्यांत आली. देशाच्या सर्व भागांतील स्त्री-संस्थांतर्फें या परिषदेकरतां प्रतिनिधी पाठविण्यांत आले होते. नवजीवन आंदोलनाच्या महिला सल्लागार मंडळीशीं सहकार्य करण्याकरतां या परिषदे मार्फत ५० स्त्री प्रतिनिधी निवडण्यांत आले.

कम्यूनिस्टांनीं प्रचारांत आणलेल्या गनीमी काव्याच्या लढ्यांतूनही चीनी स्त्रियांनीं अपूर्व कामगिरी केलेली आहे. पूल उडविणें, रस्ते खणून टाकणें, रस्त्यांतून बॉंब पेरून ठेवणे, शत्रूची रसद मारणें, जपानी पथकांना फूसलावून आणून त्यांना चीनी गनीमी टोळ्यांच्या स्वाधीन करणें वगैरे

अनेक कामे चीनी स्त्रिया मोठ्या शिताफीने करीत होत्याच पण यापुढेही जाऊन शत्रूच्या पिछाडीकडील वरील सैन्याला सतावून सोडण्याकरता त्यांनीं गनीमी सैनिकाचीं स्वतंत्र पथकेंही बनविलीं होतीं. घोड्यावर बसणे, झाडाझुडपातून लपून राहून अचूक निशाणबाजी करणें, जळते बॉंब व हातबॉंब बिनचूक फेकणे, जपानी पथकावर अचानक हल्ला चढवून तितक्याच शिताफीनें शत्रूना गुंगारा देणें, वगैरे कामात गनीमी पुरुष सैनिकापेक्षाही चीनी गनीमी सैन्यातील स्त्रिया अधिक तरबेज बनल्या होत्या. शत्रूसैन्याच्या पिछाडीच्या भागातील जंगलातून काढण्यात आलेल्या ल्हान ल्हान व हालत्या कारखान्यातून चीनी स्त्रियाच मुख्यत काम करीत होत्या. मशीन गन्स, रायफली, बंदुका, पिस्तूलें दुरुस्त करणें, त्यांच्या गोळ्या तयार करणें, दारु बनाविणें, जळते बॉंब व हातबॉंब तयार करणें, हीं कामें झटपट व चोखपणें चीनी गनीमी टोळ्यातील स्त्री स्वयंसेविका करीत असत. जपानी सैन्याच्या हालचालींना अडथळा आणण्याकरता चीनी स्त्रिया रस्ते उखडून टाकीत त्याप्रमाणे चिनी फौजांच्या हालचाली सुकर जाव्या म्हणून तावडतोबीचे हंगामी रस्ते बांधण्याचीं कामेंही पार पाडण्याकरिता चीनी स्त्रियांनीं आपल्या संघटना बनविल्या होत्या, इतकेंच नव्हे तर हुपे, शातुङ, कियांडसी वगैरे प्रांतातून वाहतुकीचे राजरस्ते बनविण्याच्या कामींही चीनी स्त्रियांनीं संघटनात्मकरीतीनें कंबरा कसल्या होत्या. २४० मैलाचा कान्सू झेच्यू-आन राजरस्ता चीनी स्त्रीसंघटनेचे स्मारक म्हणून गणला जातो. रस्ते बांधणीच्या कामात जपानविरोधी लढ्याच्या दिवसात हजारो चिनी स्त्रियांनीं संघटितपणे भाग घेतला. सुशिक्षित, अशिक्षित, श्रीमंत, गरीब सर्व दर्जाच्या स्त्रियांनीं अहमहमिकेने राष्ट्रीय कर्तव्य म्हणून हीं कामे केलीं. देशाभिमानाने प्रेरित झालेल्या चीनी तरुणींनीं जपानविरोधी लढ्यात निरनिराळ्या रणक्षेत्रावर अनेक धाडसाचीं व शौर्याचीं कामें केली आणि त्याबरोबरच अनेकविध सामाजिक, आर्थिक व शिक्षणविषयक सुधारणेचीं कामे करून चीनी समाजाचें जुनें मागासलेले स्वरूप बदलून टाकलें व त्याठिकाणीं नवा चीन निर्माण केला.

---

# आज काय चाललें आहे ?

**मॅडाम सन्यत्सेनचें जाहीर विनतिपत्र**—१९४५ च्या मे महिन्यात सोव्हिएटच्या लाल फौजानीं विजयोत्साहानें बर्लिनमध्यें प्रवेश केला व जर्मनीच्या रीक स्टागवर लाल झेंडा फडकावला. यानतर चार महिन्यानीं २ सप्टेंबर १९४५ रोजीं जपानी सरकार दोस्त राष्ट्राना विन शर्त शरण आलें. याप्रमाणें गेलीं आठ वर्षे चीननें चालविलेल्या जपान विरोधी युद्धाची समाप्ति झाली पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, चीनमधील आपसातील युद्धाची या पराभवाबरोबरच समाप्ति झाली नाहीं तर उलट या युद्धाला भरतीच आली.

मॅडाम सन्यत्सेननें २२ जुलै १९४६ रोजीं अमेरिकेला उद्देशून एक जाहीर विनतिपत्रक काढलें. चीनमधील यादवीच्या प्रसाराला कोण कारणी भूत होत आहे, याचें थोडक्यात पण मुद्देसूद विवचन या लहनशा पत्रकात केलें असून ते जसेंच्या तसें खालीं दिलें आहे.

“ कोण जिंकतो ? कुओमिन्ताङ् का कम्यूनिस्ट ? हा सध्याच्या अरिष्टाच्या मुळाशीं असलेला प्रश्न नाहीं. चीनी जनतेचा हा प्रश्न आहे. त्याच्या एकीचा, त्याच्या उपजीविकेचा हा प्रश्न आहे . . . . पार्टीचे हक्क नव्हे तर माणुसकीचे हक्क सकटात आहेत.

“ अमेरिकन लोक आमचे दोस्त आहेत, बऱ्याच दिवसापासून ते आमचे दोस्त आहेत. पण हा मार्ग नाशाचा आहे, असे त्याना सागायला पाहिजे. युनायटेड स्टेटसूच्या सशस्त्र फौजा चीनी भूमीवर वावरत आहेत. चीनच्या शाततेला व सुव्यवस्थेला बळकटी आणण्यास त्याचें अस्तित्व कारणीभूत होत नाहीं, हें त्याना सागायला पाहिजे. राष्ट्राला मान्य व खऱ्या प्रातिनिधिक सरकारलाच फक्त कर्ज देण्यात यावे, असें त्याना बजावून सागायला पाहिजे. दारूगोळा व युद्धसामुग्री पुरविली जाणार नाहीं, ही गोष्ट अमेरिका

स्पष्ट करील तर चीनी यादवीचा प्रसार होणार नाहीं, हें त्याना बजावून सागायला पाहिजे."

या बाबतींत आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. जपानी युद्धाचा शेवट झाल्यानतर आपसातील युद्धाला ज्याप्रमाणे भरती आली त्याचप्रमाणे आपसातील मतभेद मिटवून तडजोड घडवून आणण्याचे प्रयत्नही तितक्याच जोरानें सुरू झाले. गेल्या दीड दोन वर्षात अनेक वेळा दोन्ही पक्षाचे जबाबदार लोक एकत्र आले व त्यानीं आपसातील मतभेदाच्या बाबींसबधानें चर्चा केली पण प्रत्येक वेळीं अनेक दिवस त्याच त्याच गोष्टीसबधाने वाटाघाटी होऊन दोन्ही पक्ष काहीं मूलभूत प्रश्नासबधानें आपला आग्रह सोडण्यास तयार नसल्यामुळे या वाटाघाटींतून काहींच निष्पन्न झालें नाहीं. इकडे कुओमिन्ताङ् सरकारच्या राजधानीच्या शहरात, चुङ्-किङ्गमध्यें चीनी कम्यूनिस्ट पक्षाचे पुढारी व कुओमिन्ताङ् पुढारी समे-टाच्या वाटाघाटींत मग्न असावे व तिकडे उत्तर चीनमध्यें दोन्ही पक्षाच्या सैन्यात तुबळ युद्धे चालू असावीं, असा प्रकार गेल्या तीन वर्षाच्या कालात किती तरी वेळा घडून आला. या तडजोडींच्या बाबतींत अमेरिकन सेनापति मि. हर्ली व मि. जॉन मार्शल याच्यासारख्यानीं अनेक वेळा पुढाकार घेतला. पण गमत अशी कीं, हे दोन्हीही सेनापति अखेर दोन्ही पक्षापुढे टेकीस आले व तडजोडीचा नाद सोडून ते परत स्वदेशात गेले. जनरल मार्शल चीनमध्यें तेरा महिने या वाटाघाटींत लुडबुड करीत होता. चीनमधील कुओमिन्ताङ् पक्षाच्या हातात चीनचीं राज्यसूत्रे असून चीनमधील ही लोकशाही एका माणसाची व एका पक्षाची लोकशाही आहे, असे त्याचें मत झालें होते आणि लोकशाहीच्या नावाखालीं चालणारी चीनमधील ही एक पक्षाची सत्ता नष्ट होईपर्यंत अमेरिकन सरकारनें कुओमिन्ताङ् पक्षाला मदत करू नये, अशी सूचना त्यानें आपल्या कामासंबधाच्या अहवालाच्या अखेर केली होती. इतकें झाल्यावर साहजिकच अमेरिकेने चीनला मदत करण्याचे थांबविलें असेल असें कोणाला वाटण्याचा सभव आहे. पण तसे मुळींच झालेले नाहीं. अमेरिकन फौज अद्याप चीनमध्ये आहे व अनेक प्रकारच्या युद्धसामुग्रीची मदत अमेरिकेकडून पुरविण्यात येत आहे.

" मनस्यन्यद्वचस्यन्यत्कार्यमन्यद्दुरात्मनाम् "

या सुभाषिताप्रमाणे चीनच्या यादवी युद्धात फुकर घालण्याचे काम तिने अद्याप चालूच ठेवले आहे.

**दोन्ही पक्षांच्या वादांतील मर्म**—याप्रमाणे चीनमधील हें युद्ध बाहेरच्या देशाना विशेषतः आशियातील चीनजवळ असलेल्या हिंदुस्थानातील लोकाना एक मोठे गूढ होऊन बसले आहे. सर सेनापति चिआङ् कायी शेकच्या नेतृत्वाखालीं असलेला कुओमिन्ताङ् पक्ष व माउ च तुङच्या नेतृत्वाखाली असलेला चीनी कम्यूनिस्ट पक्ष या दोन प्रमुख पक्षातील हा वाद आहे. चीनमध्यें १९२१सालीं चीनी कम्यूनिस्ट पक्ष प्रस्थापित करण्यात आला. त्यानंतरच्या गेल्या २५ वर्षाच्या कालात या दोन्ही पक्षाचे परस्परसबंध कसे होते हें काय सागावे ? या दोन्ही पक्षात मध्यतरीं काहीं वर्षाच्या अतराने समेट झाले पण अखेर ते तात्पुरतेच ठरले. समेटापेक्षा या २५ वर्षाच्या दीर्घ कालात आपसातील युद्धातच या दोन्ही पक्षाच्या सामर्थ्याची खर्ची झाली. जपानविरोधी युद्धाच्या ऐन प्रसगीं या दोन्ही पक्षात काहीं काल समेट झाला, पण तो फार वेळ टिकला नाहीं.

चीनमध्ये सर्व पक्षाचे लोकशाहीप्रधान स्वतत्र समिश्र सरकार प्रस्थापित करण्यात आले पाहिजे, अशी कम्यूनिस्टाची मागणी आहे. चिआङ कायी शेकचा कुओमिन्ताङ पक्ष या गोष्टीला समति देण्यास तयार नाहीं. बहुमताने जो पक्ष निवडून येईल त्याचे सरकार, असें कुओमिन्ताङचे म्हणणें आहे. शिवाय चीनी कम्यूनिस्टानीं आपल्या सर्व फौजा चीनी सरकारच्या स्वाधीन कराव्या, हे चिआङ कायी शेकचें आग्रही मत. पण तें मान्य करण्यास चीनी कम्यूनिस्ट पक्षाचे माउ च तुङ, जू दे व चाउ एन लायप्रभृति पुढारी मुळींच तयार नाहींत. समिश्र सरकार प्रस्थापित झालें तरच त्याच्या हुकुमतीखालीं आपल्या फौजा देऊ, एका पक्षाच्या सरकारच्या हुकूमतीखालीं त्या देण्यास आपण तयार नाहीं, असें चीनी कम्यूनिस्टाचें प्रथम पासूनचे म्हणणे आहे.

**आजची हुकूमशाही राज्यघटना**—चीनमधील आजच्या सरकारची घटना इतकी गुतागुतीची आहे कीं, जगात कोठेंही तिला जोड सापडावयाची नाहीं कुओमिन्ताङची मध्यवर्ती कार्यकारी कमिटी व मध्यवर्ती निरीक्षक

कमिटी याच्या हातीं चीनी सरकारच्या कारभाराचीं सर्व सूत्रें आज केंद्रित झालेलीं आहेत. या दोन्ही कमिट्याचे मिळून एकदर १६० सभासद आहेत. कुओमिन्ताङ पक्षाचा मुख्याधिकारी व सर सेनापति चिआङ्‌ कायी शेक याच्या अध्यक्षतेखालीं दर सहा महिन्यानीं या कमिट्याच्या सभा भरत असतात. चीनी सरकारचे धोरण या सभातूनच ठरविण्यात येते. या सभातून मजूर झालेले ठराव व मान्य करण्यात आलेलीं धोरणे अमलात आणण्याचें काम कुओमिन्ताङ पार्टीच्या सतरा सभासदाच्या स्टॅंडिग कमिटीकडे आहे. सर सेनापति चिआङ कायी शेक हाच या स्टॅंडिग कमिटीचा अध्यक्ष आहे. थोडक्यात सागावयाचे म्हणजे चीनचीं सर्व राज्यसूत्रे कुओमिन्ताङमधील पुढाऱ्याच्या एका लहान गटाच्या हातीं आहेत. कायदेमडळ, न्यायमडळ, नियत्रणमडळ, परीक्षामडळ व कार्यकारीमडळ वगैरे मडळातून या गटातील लोकच सभासद असून त्याच्या हातीं अप्रतिहतपणें चीनच्या राज्यकारभाराची सूत्रे आहेत. चीनी कम्यूनिस्टाच्या म्हणण्याप्रमाणें चीनवर एकाच पार्टीची हुकुमशाही आपली सत्ता गाजवीत आहे. १९४७ च्या अखेर या घटनेंत काहीं दुरूस्त्या सुचविण्यात आल्या तरी तीत एकाच पार्टीच्या हातात सर्व सत्ता कायम ठेवण्यात आली आहे. म्हणूनच या परिस्थितींत मूलतः फरक घडून आल्याशिवाय चीनमधील आपसातील युद्ध थावणें व दोन्ही पक्षात तडजोड घडून येणे अशक्य आहे..

**अभिनव लोकशाहीचे संमिश्र सरकार**—"चीनची पुनर्घटना भक्कम पायावर करावयाची असेल तर त्यावर चीनमधील सर्व पक्षाचें समिश्र सरकार हा एकच एक उपाय आहे. कुओमिन्ताङ्‌मधील उजव्या गटाच्या पुढाऱ्यानीं कितीही विरोध केला तरी चीनला वरील उपायाचा अवलब केल्याशिवाय गत्यतरच राहिलेले नाहीं. आपले चुकीचे धोरण आग्रहानें पुढे चालविण्याचा व तडजोडीच्या नावाखालीं कालहरण करण्याचा कुओमिन्ताङ्‌च्या पुढाऱ्याचा इरादा असला तरीसुद्धा त्याच्याशीं वाटाघाटी करण्याची आमची तयारी आहे. पण एकजुटीच्या व अभिनव लोकशाहीच्या तात्विक भूमिकेच्या आधारावरच या वाटाघाटी झाल्या पाहिजेत. अभिनव लोकशाहीच्या तत्वावर समिश्र सरकार प्रस्थापित करण्यात आल्यास जपान मुक्त

प्रदेशातील कम्यूनिस्ट फौजा अर्थातच या सरकारच्या स्वाधीन करण्यात येतील, पण त्याच वेळीं कुओमिताङ् पक्षाच्या फौजाही त्याच्या स्वाधीन करण्यात आल्या पाहिजेत. याप्रमाणे चीनमधील सगळ्याच फौजा संयुक्त वरिष्ठ सेनाधिपत्याखालीं राहतील.

"चीनमध्ये चालू असलेली कुओमिन्ताङ पक्षाची हुकूमशाही नष्ट केल्याशिवाय नव्या चीनची पुर्नघटना करता यावयाची नाहीं. चीनमध्ये स्वतंत्र व निष्प्रतिबंधपणें निवडणुका करण्यात येऊन सर्व पक्षांचे संमिश्र राष्ट्रीय सरकार प्रस्थापित करण्यात आलें पाहिजे, असें चीनी कम्यूनिस्ट पार्टीचें स्पष्ट मत आहे."

याप्रमाणें माउ च तुङप्रभृति चीनी कम्यूनिस्टांच्या पुढाऱ्यांनीं वेळोवेळीं आपली भूमिका विशद रीतीनें मांडलेली असली तरी सर्व पक्षांचें संमिश्र सरकार निर्माण करण्याची चिआङ काई शेकची इच्छा नसून चीन-मधील बहुसंख्य असलेल्या कुओमिन्ताङ पक्षाचेंच सरकार असलें पाहिजे असा त्याचा आग्रह आहे.

जपानचा पराभव झाल्यापासून गेल्या तीन वर्षांत तर या मतभेदांना आणखी तीव्र स्वरूप प्राप्त झालें असून या दोन्ही पक्षांतील आपसांतील युद्धांना पुन्हा जोरानें सुरुवात झालेली आहे कुओ-मिन्ताङ् व कुङ् चाङ ताङ् या दोन्ही राष्ट्रीय व कम्यूनिस्ट पक्षांच्या जयापजयाच्या उलट सुलट बातम्या सारख्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत आहेत. चीनमध्ये चालू असलेल्या या भानगडींतून सोव्हिएट युनि-यननें पूर्वीचें आपलें अंग काढून घेतलें असून या दोन्ही पक्षांत तडजोड करण्याचा प्रयत्न करू पाहणाऱ्या अमेरिकेनेंही चीनमध्ये या कामाकरतां पाठ-विलेल्या मि. मार्शलसारख्या आपल्या मुत्सद्यांना परत बोलावलें आहे. पण "अमेरिकेनें चीनमधील दोन्ही पक्षांत तडजोड घडवून आणण्याचा नाद सोडलेला असला तरी अमेरिकेचें लष्कर तेथे ठाणें देऊन राहिलें आहे व कुओमिन्ताङ् सरकारला या लष्कराची व त्याच्याजवळच्या युद्धसामुग्रीची मदत होत आहे. चीनमधील आपसांतील युद्ध चालू राहाण्यास अमेरिकेचें हें धोरणच कारणीभूत आहे." अशी सोव्हिएट यूनियनमधील वजनदार वर्तमानपत्रें तक्रार करीत आहेत

सर सेनापति चिआड काथी शेक राजकारणापासून निवृत्त होणार, अशी फारा दिवसाची बोलवा आता सपशेल खोटी ठरली असून कुओ मिन्ताङ्ग सरकारचा कित्येक वर्षे वसूली खात्याचा प्रधान असलेला टी. व्ही. सुंग यानें नुकत्याच दिलेल्या राजीनाम्यानंतर चिआड कायी शेकनें आता मुख्य प्रधानकीचीं वस्त्रे धारण केलीं आहेत. बहुसंख्य पक्षाचें लोकशाही सरकार का सर्वपक्षाचें संमिश्र अभिनव लोकशाही सरकार या प्रश्नाभोंवतींच चीन-मधील राजकारण आता घोंटाळत असून तेथील यादवी चालू राहण्यास हाच मतभेद मुख्यत. कारणीभूत झाला आहे.

**इतिहासक्रमाला धरून असलेला लढा**—चीनमधील हें मतभेदाचें भांडण केव्हा मिटेल, हें आजच्या परिस्थितीवरून तरी मुळींच सांगता येत नाहीं. या यादवीमुळें चीनची व्हावी तशी प्रगति होत नाहीं, असा अनुभव असला तरी अभिनव चीनचें पाऊल असल्या परिस्थितींतही हळूहळू का होईना पुढे पुढेच पडत आहे, यांत शंका नाहीं. अंतरराष्ट्रीय दृष्टया जगातील पांच श्रेष्ठ राष्ट्रांत चीनची आज गणना होते. एकतंत्री बादशहाची किंवा लष्करशहा सुभेदाराची सत्ता चीनवर पुन्हा प्रस्थापित होण्याची मुळींच भीति राहिलेली नाहीं. या एकतंत्री राज-सत्तेच्या भुताला डॉ. सन्यत्सेननें आपल्या हयातींतच कायमचें गाडून टाकलें. १९३७ पासून १९४५ पर्यंत जपानसारख्या बलाढय साम्राज्यशाही आक्र-मकाला यशस्वी रीतीनें तोंड देऊन चीननें आपल्या एकजुटीच्या व चिका-टीच्या सामर्थ्यावर सर्व जगांत अजिंक्यपद प्राप्त करून घेतलें आहे. चीन-मधील आजचा लढा इतिहासक्रमाला धरून आहे. जगावर यापुढें राब-णाऱ्या बहुसंख्य वर्गाची सत्ता असावी कीं, या वर्गाला पिळणाऱ्या मूठभर भांडवलदारी व साम्राज्यशाही वृत्तीच्या वर्गाची सत्ता असावी या प्रश्ना-वर सर्व जगभरच थोडयाबहुत प्रमाणावर सर्वत्र लढे चालू आहेत. चीन-मधील लढा, या जगड्व्याळ लढयाचाच एक भाग आहे. चीनमध्यें आज-च्या परिस्थितींत कम्यूनिझमची प्रस्थापना करण्याचा आपला उद्देश नाहीं व तसें करणें सोयीचें व शक्यही नाहीं, असे कुड चाड ताइनें (चिनी कम्यु-निस्ट पार्टीनें) अनेक वेळा जाहीर केलें आहे, आजच्या घटकेस डॉ. सन्य-

त्सेनच्या तीन तत्वानुसार मुख्यतः जनतेच्या जीवनाची काळजी वाहील अशी अभिनव लोकशाही निर्माण करण्यात यावी, असे कुङ चाङ ताङ नें सुचविले आहे आणि चीनमधील सर्व पक्षाचें समिश्र राष्ट्रीय सरकार निर्माण केल्यासच वरील हेतू साध्य होईल असा चीनी कम्युनिस्ट पार्टीचा दावा आहे.

डॉ. सन्यत्सेनचीं तीन तत्वें चिआङ्ग काई शेकप्रभृति कुओमिन्ताङ पक्षाच्या पुढाऱ्याना काहीं अशानें मान्य असलीं तरी ज्यात कम्यू-निस्ट पक्षाचें वजन राहील, असे समिश्र राष्ट्रीय सरकार मात्र त्याना नको आहे. कम्यूनिस्ट पक्षाला टाळून एका पक्षाच्या जोरावर चिनी राज्य-कारभाराचा गाडा हाकण्याचा कुओमिन्ताङमधील बड्या जमीनदाराचा व भाडवलदाराचा इरादा आहे.

चीनमधील यादवी संबधाच्या बातम्या अलीकडे रोजच्या रोज उलट सुलट येत असल्या तरी डॉ. सन्यत्सेनच्या तीन तत्वाप्रमाणें अभिनव लोकशा-हीचा पुरस्कार करणाऱ्या चीनी कम्यूनिस्टाचा विजय होत आहे, असें स्पष्ट दिसत आहे. चिआङ कायी शेकच्या लष्करानें चीनी कम्यूनिस्टाचा जिक-लेला प्रदेश पुन्हा माउ च तुङच्या लाल फौजेने परत जिंकला आहे. मॅन्च्यू रिया व बहुतेक सर्व वायव्य व उत्तर चीन कम्यूनिस्टाच्या ताब्यात गेला आहे व दक्षिण चीनच्या रोखाने कम्यूनिस्टाच्या लाल फौजा चाल करून येत आहेत. १४ कोटी लोकसख्या असलेला मुलूख चीनी कम्यूनिस्टाच्या ताब्यात असून सर्व प्रकारच्या युद्धसामुग्रीनें जय्यत असलेली ११,००,००० फौज आज त्याच्याजवळ आहे.

चीनी सरकारी फौजेनें कितीही जगजग पछाडले व अमेरिकेची सर्व प्रकारची मदत जरी चीनी सरकारला मिळाली तरी चीनी जनतेच्या पायावर उभारलेल्या या लाल फौजेचा ती पराभव करू शकत नाहीं, हे आता स्पष्ट झालें असून थोड्याच दिवसात डॉ. सन्यत्सेनचें चीनमध्ये जनताभिमुख शुद्ध लोकशाही स्थापण्याचे स्वप्न खरें ठरून आशियातील राष्ट्राना आदर्शभूत असा स्वयपूर्ण अभिनव चीन निर्माण होईल, यात मुळीच शका राहिलेली नाही.

---

